# महाराष्ट्रकविचरित्र.

भाग २ रा.

लेखक

जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर.

भरतपूरचा वेढा, कवनकुतूहल, नेपाळवर्णन, स० प्रणयानंद
नाटक, इसापनीति, महाराष्ट्रकविचरित्र भाग १ ला
व २ रा इ० पुस्तकाचा कर्ता.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंटस्, ठाकुरद्वार-मुंबई.

# प्रस्तावना.

महाराष्ट्र-कवि-चरित्राचा हा तिसरा भागही, पहिल्या दोन भागांप्रमाणेंच, आजपर्यंत उपलब्ध झालेल्या सर्व माहितीच्या आधारानें लिहिला आहे. गोराकुंभार, नरहरि सोनार, परिसा भागवत, भानुदास, सेना न्हावी, कान्हूपात्रा, जगमित्र नागा, प्रेमाबाई, निळोबा, व उद्धव चिद्धन यांचीं चरित्रें मुख्यत: महिपतिकृत संतचरित्रविषयक ग्रंथांच्या आधारानें लिहिलीं असून, उतारे देण्याच्या कामीं हस्तलिखित जुन्या वह्या व छापील गाथा यांचा उपयोग केला आहे. कचेश्वर कवीची माहिती रा. राजवाडे व रा. पारसनीस यांच्या लेखांवरून घेतली आहे; दिनकरबुवा रामदासी यांचें चरित्र माझे मित्र रा. अ बा. रसाळ यांनीं लिहून पाठविलें. शिवरामस्वामी कल्याणकर यांचें चरित्र भारतवर्षीय अर्वाचीन कोश व रा. राजवाडे यांचा लेख यांच्या आधारानें लिहिलें आहे. चिदानदस्वामी यांचें चरित्र रा. आनंदराव बाळकृष्ण रांगणेकर यांनीं पाठविले. शिवदिन केसरी ह्यांचें चरित्र रा ल. रा. पांगारकर यांच्या 'मुमुक्षु' पत्रांतून उतरून घेतलें आहे. विठोबा अण्णा दप्तरदार यांचें चरित्र जुन्या केरळकोकिळ मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झालें होतें, त्याच्या आधारानें प्रस्तुत ग्रंथांतील चरित्रलेख लिहिला आहे; व श्रीकृष्ण जगन्नाथ भट्ट बांदकर यांचें चरित्र रा. रामचंद्र त्रिविक्रम नाईक बांदिवडेकर या सद्गृहस्थांनीं लिहून पाठविलें. ह्या सर्व सद्गृहस्थाचा मी अत्यंत आभारी आहें, हे सांगावयास नकोच.

पहिल्या दोन भागांप्रमाणेंच या तिसऱ्या भागासही गगनबावडा संस्थानाधिपति श्रीमंत माधवराव मोरेश्वर ऊर्फ बाळासाहेब पंत

अमात्य यांनी द्रव्यरूपानें उत्तेजन दिलें, याबद्दल श्रीमंतांचा मी अत्यंत आभारी आहें. शेवटीं:—

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥ १ ॥
साळुंकी ते कैसी बोले मंजुळ वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ २ ॥
काय म्या पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलाविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायावीण ॥ ४ ॥

ह्या श्रीतुकाराममहाराजांच्या अमृतवाणीनें हा प्रस्ताव पूर्ण करितों.

मुंबई
२९–९–१४ } ज. र. आजगांवकर.




श्रीमंत राजश्री माधवराव मोरेश्वर

ऊर्फ

बाळासाहेब पंत अमात्य

हुकुमतपन्हा

संस्थान गगनबावडा

यांस

ह्या ग्रंथ अत्यंत कृतज्ञतापूर्वक

समर्पण करितों.

श्रीमंतांचा नम्र सेवक

ग्रंथकर्ता.

# अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-कवि-चरित्र.

## भाग तिसरा.

## गोरा कुंभार.

गोरा ज्या म्हणती त्यां स्मरुनि सुखी तू मना कुलाला हो ।
घे भक्तिचा जयाची मति संसारीं अनाकुला लाहो ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत

गोरा कुंभार हे नामांकित ' संत-परीक्षक ' ज्ञानदेव-नामदेवांचे समकालीन होत. यांचें चरित्र महिपति, उद्धवाचिद्धन आणि भीमस्वामी रामदासी यांनीं आपल्या ग्रंथांत दिलें आहे, त्याच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे. सत्यपुरी उर्फ तेर नामक गांवीं गोरोबा कुंभार राहत असत महिपतींनी या गांवाचें नाव ' तरढोकी ' असें लिहिलें आहे. हा गांव पंढरपुरानजीक आहे. गोरोबा कुंभार हे महाभगवद्भक्त होते. ' अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां । सदा देतां घेतां वदानें वदतां ग्रास गिळितां ॥ घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं । समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं ' ह्या पंडितोक्तीप्रमाणें गोरोबांचे वर्तन असे. ' संसारधंदा करिता रिकामा । होशील केव्हां भजशील रामा ॥ आता तरी तूं धरिं एक नेमा । कामांत कामा भज रामनामा ॥ ' ही समर्थोक्ति गोरोबाच्या नित्याचरणांत अगदीं प्रतिबिंबित झाली होती. कामधंदा करीत असतांही

पांडुरंगाचें नामस्मरण करावयाचें, हा यांचा नित्यक्रम. माती तुडवितांना प्रेमानंदानें नाचावें, हाच त्यांचा परमार्थ ! एके दिवशीं गोरोबा माती तुडवीत असतां, त्यांची स्त्री आपल्या लहान मुलास तेथें ठेवून पाणी आणण्यास गेली. इकडे तें मूल रांगत रांगत जाऊन मातीच्या आळ्यांत पडलें ' ब्रह्मानंदीं टाळी ' लागलेल्या गोरोबांनीं मातीबरोबर तें मूलही तुडविलें !

इकडे गोरोबांची पत्नी पाणवठ्यावरून येऊन पाहते, तों मूल कोठेंच दिसेना. उद्धवचिद्धन म्हणतात—

पाहे तों चिखलांत जावळ मांसास्थी दिसताती ।
' जळो भजन हें बाळक मारिलें ' वदन पिटी ती हातीं ' ॥

सगळा चिखल रक्तानें लाल झालेला पाहतांच गोरोबांनीं मूल मारिलें हें तिच्या लक्ष्यांत येऊन, तिनें रडून ओरडून आकांत केला; व ' आग लागो या भजनाला ' असें म्हणून गोरोबांस ती रागें भरली. भजनास विक्षेप झालला पाहतांच, हातीं चक्रदंड घेऊन गोरोबा आपल्या पत्नीस शिक्षा करण्यासाठीं तिच्या अंगावर धांवून गेले. आतां हे आपणास मारल्याशिवाय राहात नाहींत, असें पाहून, पुत्रविरहानें दुःखी झालेल्या संतीनें हें तिचें नांव होतें-' माझ्या अंगास हात लावाल तर तुम्हास विठोबाची आण आहे ' अशी शपथ गोरोबांस घातली. गोरोबांचें सर्वस्व म्हणजे विठोबा, त्याची आण ते कशी मोडतील? त्यांनीं हातींचा दंड फेंकून दिला व पुनः भजनानंदांत ते निमग्न झाले. बरेच दिवस गेले, तरी गोरोबा आपल्याशीं भाषणही करीत नाहींत, हें पाहून त्यांची स्त्री एके दिवशीं त्यांची पादसेवा करावयास गेली पण गोरोबांनीं तिला आपल्या अंगास स्पर्श करूं दिला नाहीं. ते म्हणाले, ' तूं मला विठोबाची आण घातली आहेस, ती मला पाळली पाहिजे.' यावर त्यांची पत्नी म्हणाली, ' अशानें संसार कसा होईल? मजकडून अपराध झाला

खरा; पण त्याची क्षमा करून आपण माझा अंगीकार करावा.' गोरोबांनीं तिला निक्षून सांगितलें कीं, 'माझा निश्चय आतां कांहीं ढळणार नाहीं.'

कांहीं दिवस गेल्यावर संती आपल्या माहेरीं गेली, व इत्थंभूत हकीकत तिनें आपल्या आई-बापांस कळविली. ती म्हणाली 'पतीनें माझा त्याग केल्यामुळें, आमचा वंश खुंटल्यासारखा झाला आहे. तरी माझी धाकटी बहीण माझ्या पतीस देऊन वंशवृद्धि होईल असें केलें पाहिजे.' मुलीची ही दशा पाहून आई-बापांस फार वाईट वाटलें. त्यांनीं आपली धाकटी मुलगी रामी गोरोबांस दिली व लग्न-समारंभ आटोपल्यावर मुलीच्या बापानें गोरोबांस विनंति केली कीं,

'हरिच दास तुह्मीं सज्जन तुम्हां लहान थोर नाहीं ।
दोघींचेंही समान पाळण कीजे, आण विठूची पाहीं ॥'

आपल्या श्वशुरानें घातलेली ही आण गोरोबांनीं शिरसा मान्य केली. ते आपल्या दोन्ही स्त्रियांसहवर्तमान तरढोकीस आले, व त्या दोघींसही अगदीं समभावानें वागवूं लागले. पहिलीप्रमाणेंच दुसरीच्या अंगासही त्यांनीं कधीं स्पर्श केला नाहीं. हें पाहून एके दिवशीं संती गोरोबांस म्हणाली, 'माझी अशी दशा झाली ती झालीच; पण माझी धाकटी बहीणही तुमच्या मनास कां येत नाहीं ? त्या बिचारीनें तुमचा काय अपराध केला आहे ?' गोरोबा म्हणाले, 'तुझ्या बापानें विठ्ठलाची शपथ घालून मला सांगितलें आहे कीं, दोन्ही स्त्रियांस सारख्या रीतीनें वागवा; त्याप्रमाणें तूं जशी मला अस्पर्श्य आहेस, तशीच तीही आहे. विठ्ठलाची शपथ मी कशी मोडूं ?' गोरोबांचें हें भाषण ऐकून बिचारी रामी रडूं लागली. मग संतीनें तिची समजूत केली व तिला सांगितलें कीं, आपण आज रात्रीं या गोष्टीचा विचार करूं.' मग रात्रीं, गोरोबांस झोंप लागली असें पाहून त्या दोघीही त्यांच्या शेजारीं जाऊन

निजल्या व गोरोबांचे हात त्यांनीं आपापल्या उरावर ठेविले. गोरोबा जागृत होऊन पहातात, तों आपले हात आपल्या स्त्रियांच्या उरावर आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. विठोबाची शपथ मोडल्याबद्दल त्यांस अतिशयित वाईट वाटलें. मग ज्या हातांनीं हें कर्म केलें, त्यांस शिक्षा करण्यासाठीं त्यांनीं आपले दोन्ही हात शस्त्रावर आपटून तोडून टाकिले ! आपल्या युक्तीचा हा भयंकर परिणाम झालेला पाहून रामी व संती रडूं लागल्या. त्या म्हणाल्या, ' संसार करावा असें आमच्या नशीबींच नाहीं ! वंशवृद्धि व्हावी म्हणून दुसरें लग्न केलें तों हें भलतेच विघ्न उपस्थित झालें. आमचें दुर्दैव म्हणून आम्हांवर देव कोपला, दुसरें काय ? ' आपल्या स्त्रिया फार कष्टी झालेल्या पाहून गोरोबांसही वाईट वाटलें. ते म्हणाले, ' तुम्ही आतां दु:ख करूं नका, स्वस्थ असा. श्रीपांडुरंग आपला पाठीराखा आहे, त्यास आपली सर्व काळजी आहे. सगळीं संकटें निवारण करून तोच आपणास सुख देईल. त्याचें निरंतर नामस्मरण करा.'

पुढें आषाढी एकादशी आली, तेव्हां गोरोबा आपल्या दोन्ही स्त्रियांसह पंढरीस आले. चंद्रभागेंत स्नान करून त्यांनीं पुंडलिकाचें दर्शन घेतलें व महाद्वारीं येऊन भगवंतास लोटांगण घातलें इकडे गरुडपारावर नामदेवांचें कीर्तन चाललें होतें. ज्ञानदेवादि भक्तमंडळी कीर्तन ऐकावयास बसली होती. कीर्तनांत ' विठ्ठल ' म्हणून टाळी देण्याचा प्रसंग येतांच सगळे श्रोते टाळ्या वाजवू लागले. नामदेवांच्या प्रासादिक वाणीनें तन्मयवृत्ति झालेल्या गोरोबांनींही टाळी वाजविण्यासाठीं आपले थोटे हात वर केले ! त्या वेळीं भगवंतानें गोरोबांचे हात पूर्ववत् केले व हा चमत्कार पाहून सगळ्या संतांस मोठें नवल वाटलें. त्यांनीं हरिनामाचा मोठा गजर केला. आपल्या पतींचे हात पूर्ववत् झाले, हें पाहून गोरोबांच्या ज्येष्ठ पत्नीनें हात

जोडून पांडुरंगाची प्रार्थना केली कीं, ' पंढरीनाथा ! आपल्या भक्ताकडे तूं कृपादृष्टीनें पाहतांच त्याचे हात पूर्ववत् झाले; पण मी माझ्या बालकाच्या वियोगानें कष्टी होत आहें, तर माझी आणि माझ्या बालकाची भेट करून देण्यास तूं समर्थ नाहींस काय ? ' असें बोलून संती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. ही तिची दुःस्थिति अवलोकन करून भक्तकामकल्पद्रुम भगवंतास तिची करुणा येऊन, त्यानें तिच्या मुलास रांगत रांगत तिजकडे पाठविलें ! उद्धव-चिद्धन म्हणतातः—

' रांगत बाळक धावुनि आलें, महिमा हा नामाचा ।
वेदशास्त्र पुराण वर्णी, कुंठित शेषवाचा ॥ '

मग धांवत जाऊन संतीनें आपल्या सुंदर बालकास उचलून कडेवर घेतलें व त्याच्या मुखाचें चुंबन केलें. हा देखावा पाहून त्या कोमल अंतःकरणाच्या साधुसंतांचे नेत्र अश्रुपूर्ण झाले. मग रुक्मिणीनें गोरोबांस सांगितलें कीं, ' आजपासून तुझी शपथ सुटली. आतां तूं आपल्या दोघी स्त्रियांचा अंगीकार करून सुखानें संसार चालव. ' जगन्मातेची ही आज्ञा ऐकतांच अखिल संतांनीं गोरोबांचा जयजयकार केला. गोरोबांनींही आपल्या स्त्रियांचा सप्रेम अंगीकार केला.

एकदां गोरोबांस असें वाटलें कीं, सगळ्या सत्पुरुषांस एके दिवशीं आपल्या घरीं बोलावावें. मग त्याप्रमाणें त्यांनीं प्रत्येक साधूच्या घरीं जाऊन ' आपल्या आगमनानें माझा आश्रम आपण पवित्र करावा ' अशी त्यांस विनंति केली. गोरोबांच्या विनंतीस मान देऊन सर्व साधु त्यांच्या घरीं आले. ' साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ' असें मानणाऱ्या गोरोबांस संतदर्शनानें मोठा आनंद झाला; त्यांनीं त्यांची षोडशोपचारें पूजा केली व त्यांस पंचपक्वान्नांचें भोजन घातलें. निवृत्ति, ज्ञानदेव, सांवता माळी, सोपानदेव,

नामदेव इत्यादि संत एकत्र बसले असतां, ज्ञानदेव म्हणाले "गोरोबा, आपल्या घरीं आज जे घट तुम्हीं जमविले आहेत, त्यांत पक्के घट कोणते व कच्चे कोणते याची परीक्षा करून, काय निकाल होईल तो मला सांगा.' ज्ञानदेवांच्या ह्या आज्ञेचा गर्भितार्थ गोरोबांनीं तत्काल जाणला; व आपली थापटी हातीं घेऊन प्रत्येक संताच्या मस्तकावर ती ते हाणीत चालले! थापटीचा आघात नामदेवां-शिवाय सर्व संतांनीं निमूटपणें सहन केला. गोरोबा नामदेवांपाशीं आले, तेव्हां नामदेव त्यांस म्हणाले, 'तूं हा काय उद्योग चालविला आहेस? लोकांस आपल्या घरीं जमवून थापटीनें त्यांचीं डोकीं फोडावीं, हा कोणत्या गांवचा आदरसत्कार?' नामदेवांचें हें भाषण ऐकतांच सगळे संत हांसले व गोरोबांनीं नामदेवांकडे बोट दाखवून ज्ञानदेवांस कळविलें कीं 'हा एवढा एक घट मात्र कच्चा आहे.' तेव्हां मुक्ताबाई गोरोबांस म्हणाली, 'तुम्हीं केलेली परीक्षा अगदीं बरोबर आहे.' हें ऐकतांच सगळे संत खदखदां हंसूं लागले व त्यामुळें नामदेव मनांत फार ओशाळे झाले.

पुढें नामदेव तेथून निघून पंढरपुरास आले, व गोरोबांच्या घरीं झालेल्या स्वतःच्या अपमानाची सविस्तर हकीकत त्यांनीं पांडुरंगास निवेदन केली. पांडुरंग म्हणाला, 'नाम्या! गोरोबांनीं जी परीक्षा केली, ती अगदीं खरी आहे; जो मनुष्य सद्गुरूला शरण गेला नाहीं, तो केवढाही मोठा व्युत्पन्न आणि भक्तिमान् असला, तरी तो कच्चाच आहे, असें म्हटलें पाहिजे.' ही भगवदुक्ति ऐकून नामदेव अगदीं विरघळून गेले. ते म्हणाले, 'देवा! माझ्या अपमानदुःखाचा तूं परिहार करशील अशा समजुतीनें मी तुजपाशीं आलों; पण तूंही गोरोबांच्याच म्हणण्याचा अनुवाद करितोस. आतां पुढें मीं करावें तरी काय?' देव म्हणाले, 'तूं आतां सद्गुरूस शरण जाऊन त्याचा

उपदेश घे, म्हणजे तुला अद्वैताचें खरें रहस्य काय आहे, हें कळून येईल.' त्याप्रमाणें पुढें नामदेवांनीं विसोबा खेचर यांजकडून उपदेश घेतला व इतर संतांच्या समुदायांत 'पक्का घट' म्हणून प्रवेश करण्याचा अधिकार संपादन केला. एकंदरींत, सत्पुरुष या नात्यानें तत्कालीन संतमंडळांत गोरोबांची योग्यता फार मोठी होती, हें वरील कथेवरून अगदीं स्पष्ट होत आहे. यासंबंधानें पंतांनीं म्हटलें आहे:—

## आर्या.

'सद्गुरुअनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पटणें ।
गोरा संत परीक्षी मस्तकिं हाणूनि सर्व थापटणें ॥ १ ॥'

गोरोबांचे ४१ अभंग 'सर्वसंग्रह गाथा' या ग्रंथांत दिले आहेत, पण त्यांतील बहुतेक अभंग प्रक्षिप्त दिसतात; उदाहरणार्थ, पुढील अभंग पहा:—

'पाहुनियां दोघी करितां रुदन । हात आपटोन रडताती ॥ १ ॥
कैसें या विठ्ठलें विपरीत केलें । जगामध्यें जालें हांसें आमुचें ॥ २ ॥
पूर्वीं यानें घरें बहुतांचीं बुडविलीं । नारद भीष्म बळी रुक्मांगद ॥ ३ ॥
प्रत्यक्ष कुरुमा पांगुळ तो जाणा । सूरदास नयनां हीन जगीं ॥ ४ ॥
कबीर नामयाचे घरीं नाहीं अन्न । ऐशी पैं निर्वाण भक्ति याची ॥५॥
संती आणि रामी उभयतां रडती । गोरा म्हणे खंती करूं नका ॥ ६ ॥

या अभंगाची भाषा ६०० वर्षांपूर्वींची जुनी दिसत नाहीं; पण ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी शिवाय करून, तत्कालीन इतर संतांचे म्हणून जे अभंग आज प्रसिद्ध आहेत, त्या सर्वांची भाषा कमी अधिक प्रमाणानें इतकीच सोपी असल्यामुळें, हा भाषेचा मुद्दा जरी सोडून दिला, तरी वरील अभंगांतील **कबीर** व **सूरदास**[1] हीं नांवें

---

१ सूरदास हे नामांकित साधु व कवि सुमारें ३०० वर्षांपूर्वी उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेले. हे जन्मांध होते. यांचा हिंदी भाषेंत 'सूरसागर' नामक ग्रंथ आहे. यांची वाणी अत्यंत रसवती, प्रौढ व कवित्वपूर्ण आहे.

त्या अभंगाचें अर्वाचीनत्व उघड सिद्ध करीत आहेत. कारण सूरदास हे शके १५०० च्या सुमारास, म्हणजे अकबर बादशहाच्या कारकीर्दींत होऊन गेले व गोरोबा शके १२९० च्या सुमारास होऊन गेले. अर्थात् सूरदासांचा उल्लेख गोरोबांच्या अभंगांत येणें केवळ असंभवनीय होय. त्याचप्रमाणें रा० राजवाडे यांनीं सरस्वती मंदिरांतल्या 'नाभाजीनें व महीपतीनें वर्णिलेले संत' या निबंधांत[1] शके १३७० व शके १५२० हा कबिरांचा काल दिला आहे; यांपैकीं कोणताही एक काल जरी खरा मानला, तरी कबिरांचें नांव गोरोबांस ठाऊक असणें मुळींच शक्य नाहीं, हें उघड आहे. अशा स्थितींत वरील अभंग प्रक्षिप्त आहे, असें म्हणण्यास बिलकूल प्रत्यवाय नाहीं. सर्वसंग्रह गाथेंतल्या गोरोबांच्या ४१ अभंगांपैकीं २१ अभंगांत खुद्द गोरोबा कुंभारांचें चरित्र दिलें असून, त्यांत ठिकठिकाणीं गोरोबांची फार स्तुति केली आहे. आतां, गोरोबांसारखा 'संतपरीक्षक' स्वतःच्या कवितेंत स्वतःचीच स्तुति करील, अशी कल्पना करणेंही

---

१ रा० राजवाडे यांचा सदर निबंध फार चांगला व उपयुक्त आहे. ह्या एकाच निबंधावरून राजवाड्यांची शोधकबुद्धि व श्रमसहिष्णुता हे गुण स्पष्टपणें दृश्यमान होतात. पण या निबंधांत थोडासा घोंटाळा झाला असावा असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. ह्या विधानाच्या समर्थनार्थ येथें एकच उदाहरण देतों. सदर निबंधाच्या १२ व्या पृष्ठावर रामानंदाचा काल शके १४९० दिला असून, त्यांच्या समकालीन शिष्यांत कबीरांचें नांव दिलें आहे. अर्थात्, या मानानें कबीरांचा काल शके १५०० हा येतो. पुढें, १४।१५ पृष्ठांवर कबीरांचे शिष्य पद्मनाभ, जीवा व तत्वा यांचा काल शके १३९० हा दिला आहे. आतां, शके १४९० त विद्यमान असलेल्या रामानंदांचे शिष्य कबीर यांचें शिष्यत्व, शके १३९० तल्या पद्मनाभाकडे कसें जाऊं शकेल, याचा विचार वाचकांनींच करावा.

कठीण आहे. अर्थात् हे अभंग पुढें कोणी तरी गोरोबांच्या नांवावर घुसडून दिले असले पाहिजेत हें उघड आहे. अशा प्रकारच्या अभंगांचा नमुना पहाः—

१

सकळ संतजनीं देखोनीं नयनीं । टाळिया पिटोनि गाती नाम ॥ १ ॥
म्हणती धन्य भक्त निधडा वैष्णव। ब्रह्मादिकां माव न कळे त्याची॥२॥
ऐशी स्तुति करितां बाळ आलें तेव्हां । गोरा म्हणे देवा पावन केलें ॥ ३ ॥

२

वैराग्याचा मेरु तो गोरा कुंभार । तोडियेले कर आणेसाठीं ॥ १ ॥
महाद्वारीं कथा श्रवण करितां । टाळी वाजवितां निघती नवे ॥ २ ॥
देवा तुम्हीं कृपादृष्टी अवलोकिला । हृदयीं धरिला प्रीति करीं ॥ ३ ॥
गोरा ह्मणे तुह्मां दासाचा अभिमान । अवतार ह्मणोन धरणें लागे ॥ ४ ॥

ह्या दोन अभंगांवरून, माझ्या वरील अनुमानाची सत्यता वाचकांच्या लक्ष्यांत येईल असें वाटतें. आतां खुद्द गोरोबांचे असे जे कांहीं अभंग आहेत, त्यांपैकीं कांहीं अभंग पुढें देतोंः—

१

वंदावें कवणासी निंदावें कवणासी । लिंपण गगनासि कैसें लिंपे ॥ १ ॥
नाहीं जया रूप नाहीं जया नाम । तेंची व्यापी वर्म सांगतसे ॥ २ ॥
जिवनीं चंद्रबिंब बिंबलें पैं साचा । परि नाहीं तयाचा लेप तेथें ॥ ३ ॥
ह्मणे गोरा कुंभार नामया जिवलगा । आलिंगन देगा मजलागीं ॥ ४ ॥

२

स्थूळ होतें तें सूक्ष्म पैं जहालें । मन हें बुडालें महाडोहीं ॥ १ ॥
माझें रूप माझ्या विरालेंसे डोळां । सामावलें बुबुळा ज्ञानें माझ्या ॥ २ ॥
म्हणे गोरा कुंभार नवल जाहलें नाम्या । भेटी तुम्हा आम्हा उरली नाहीं ॥३॥

३

निर्गुण रूपडें सगुणाचे बुंथी । विठ्ठल निवृत्ति प्रवृत्ति दिसे ॥ १ ॥
एक पुंडलीक जाणे तेथिल पंथ । तुम्हा आम्हा उचित भाग्ययोगें ॥ २ ॥
सभाग्य विरळे नामपाठीं गेले । अभागी ते ठेले मौनरूप ॥ ३ ॥
म्हणे गोरा कुंभार नामया भोगितां । उरल्या उचिता सेवूं सुखें ॥ ४ ॥

४

निर्गुणाचा संग धरिला जो आवडी । तेणें केलें देशधडी आपणियासी ॥ १ ॥
अनेकत्व नेलें अनेकत्व नेलें । एकलें सांडिलें निरंजनीं ॥ २ ॥
एकत्व पाहतां अवघें लटिकें । जें पाहे तितुकें रूप तुझें ॥ ३ ॥
म्हणे **गोरा** कुंभार सखया नामदेवा । तुम्हां आम्हां नांवा कैंचें कोणा ॥ ४ ॥

५

केशवाचे भेटी लागलेंसे पिसें । विसरलों कैसे देहभावा ॥ १ ॥
झाहली झडपणी जाहली झडपणी । संचरलें मनीं रूप आधीं ॥ २ ॥
न लिंपेचि कर्मीं न लिंपेचि धर्मीं । न लिंपे षडुर्मी पुण्यपापा ॥ ३ ॥
म्हणे **गोरा** कुंभार सहजी जीवन्मुक्त । सुखरूप अद्वैत नामदेवा ॥ ४ ॥

६

सरितेचा ओघ सागरीं आटला । विदेही भेटला मनामन ॥ १ ॥
कवणाची संगत पुसावया कवणातें । सांगतें ऐकतें तेथें कैचें ॥ २ ॥
नाहीं दिवसराती नाहीं कुलयाती । नाहीं माया भ्रांती अवघीच ॥ ३ ॥
म्हणे **गोरा** कुंभार परियेसीं नामदेवा । सांपडला ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

७

देवा तुझा मी कुंभार । नाशीं पापाचे डोंगर ॥ १ ॥
ऐशा संतापें हे जाती । घडे साधूंची संगती ॥ २ ॥
पूर्ण कृपा भगवंताची । कुंभार **गोरा** मागे हेंची ॥ ३ ॥

८

जोहरियाचे पुढें ठेवियलें रत्न । त्याचें मोल उणें होइल कैसें ॥ १ ॥
तैसे थापटणें पारखीया हातीं । आणिका न देती वायांवीण ॥ २ ॥
प्रथम थापटणें निवृत्तीचे डोक्या । डेरा जाहला निका परब्रह्म ॥ ३ ॥
तेंची थापटणें ज्ञानदेवावर । आतां कैचें कोरें नुरे येथें ॥ ४ ॥
तेंची थापटणें सोपानाच्या डोई । यांत लेश नाहीं कोरें कोठें ॥ ५ ॥
तेंची थापटणें मुक्ताबाईसी हाणीं । अमृतसंजीवनी भरलीसे ॥ ६ ॥
तेंची थापटणें नामदेवावर । चोळीत समोर रहूं लागे ॥ ७ ॥
**गोरा** म्हणे कोरा राहिला गे बाई । शून्यामार नाहीं भाजियेला ॥ ८ ॥

९

ब्रह्म मूर्तिमत जगीं अवतरलें । उद्धरावया आलें दीन जना ॥
ब्रह्मादिक ज्याचें वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती ॥ २ ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपे त्वरित उद्धरती ॥ ३ ॥
अखंडित गोरा त्याची वास पाहे । निशिदिनीं ध्याये संतसंग ॥ ४ ॥

१०

मुकिया साखरे चाखाया दिधली । बोलतां ती बोली बोलवेना ॥ १ ॥
तो काय शब्द खुंटला संवाद । आपुला आनंद अवधाराया ॥ २ ॥
आनंदीं आनद गिळोनी राहणें । अखंडित होणें न होउनियां ॥ ३ ॥
म्हणे गोरा कुंभार जीवन्मुक्त होणें । जग हें करणें शहाणें बापा ॥ ४ ॥

११

कासयासी बहु घालसी मळण । तुज येणेंविण काय काज ॥ १ ॥
एकपणें एक एकपणे एक । एकाचे अनेक विस्तारले ॥ २ ॥
एकत्व पाहतां शिणलें अवधारा । न चुके येरझारा चौऱ्यांशीच्या ॥ ३ ॥
म्हणे गोरा कुंभार कोणी नाहीं दुजें । विश्वरूप तुझें नामदेवा ! ॥ ४ ॥

गोरोबांचे कित्येक अभंग नामदेवांस उपदेश करण्यासाठीं रचलेले दिसतात. गोरोबांनी केलेल्या संतपरीक्षेत उत्तीर्ण न झाल्यामुळें नामदेव रुसून गेले होते, तेव्हां त्यांची समजूत करण्यासाठीं काकांनी—तत्कालीन संत गोरोबांस काका म्हणत असत—हे अभंग रचले असावेत असें दिसतें.



# नरहरि सोनार.

नरहरिनामा पावे संत न सोनार दास मान कसा ।
तरला करुनि भवाचा अंत नसो नारदासमान कसा ॥ १ ॥

सन्मणिमाला–मोरोपंत.

नरहरि सोनार हे प्रसिद्ध साधु शा० वा० शके १२३५ च्या सुमारास पंढपुर येथें होऊन गेले. ते मोठे शिवभक्त होते. पंढरपुरीं राहत असूनही ते पांडुरंगाच्या दर्शनास कधीं जात नसत. मल्लिकार्जुनाचें पूजन व भजन यांतच ते सदा निमग्न असत. पंढरपुरच्या श्रीविठ्ठलास एका सावकारानें असा नवस केला होता कीं, ‘ जर मला पुत्र झाला, तर मी तुला सुवर्णाचा करगोटा वाहीन.’ पुढें त्याला पुत्र झाला व पांडुरंगाचा नवस फेडण्यासाठीं तो पंढरपुरास आला. तेथें, सुवर्णाचा करगोटा करून त्याजवर हिरे–माणकें जडवील असा चांगला कुशल सोनार कोण आहे, याबद्दल त्यानें चौकशी केली. तेव्हां पुजाऱ्यानीं त्यास नरहरि सोनाराचें नांव सांगितलें. सावकार नरहरीच्या घरीं गेला व त्यानें त्यांस सुवर्णाचा रत्नखचित करगोटा करून देण्यास सांगितलें. नरहरि म्हणाले, ‘ तुम्हीं श्रीविठ्ठलाच्या कंबरेचें मोज घेऊन या, म्हणजे त्याप्रमाणें मी करगोटा तयार करून देतों.’ ‘ ठीक आहे ’ म्हणून सावकार देवळांत गेला व मोज आणून त्यानें तें नरहरि सोनारास दिलें. त्याप्रमाणें त्यांनीं करगोटा तयार करून सावकारास दिला. मग सावकारानें विठ्ठलाची षोडशोपचारें पूजा केली व देवाच्या कंबरेस करगोटा बांधिला. पण तो थोडासा आंखूड आहे असें आढळून आलें. सावकार पुनः नरहरीकडे गेला व त्यांजकडून त्यानें तो करगोटा वाढवून घेतला. पुनः देवळांत येऊन सावकारानें करगोटा देवाच्या कंबरेस बांधला,

पण तो सैल होतो असें त्यास दिसून आलें. तेव्हां नरहरीकडे जाऊन ‘ तुम्हीच देवळांत या व तेथल्या तेथें करगोटा नीट करून तो देवाच्या कंबरेस बरोबर बसेल, अशी व्यवस्था करा ’ अशी सावकारानें त्यांस विनंति केली. नरहरि म्हणाले ‘ मी व्रतस्थ आहें, एका शंकराशिवाय अन्य देवाचें दर्शन मी घेत नाहीं.’ परंतु सावकारानें फारच आग्रह केल्यामुळें आपले डोळे बांधून नरहरि सोनार विठ्ठलमंदिरांत गेले. त्यांचे डोळे बांधलेले पाहून क्षेत्रवासी लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्यांचा फार उपहास केला.

नरहरि सोनार देवळांत गेले व विठ्ठलमूर्तीस हातांनीं चांचपूं लागले. तों असा चमत्कार झाला कीं, ती मूर्ति शंकराची आहे असें त्यांस वाटलें. दहा हात, पांच तोंडें, गळ्यांत सर्पाचे अलंकार, मस्तकीं जटाजूट असा शंकराचा थाट त्यांच्या हातास लागला. ते म्हणाले, हें तर माझेंच आराध्य दैवत आहे. मग त्यांनीं आपले डोळे बांधले होते ते सोडले व मूर्तीकडे पाहिलें, तों ती शंकरमूर्ति नसून विठ्ठलमूर्ति आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांनीं पुनः डोळे झांकले व हातांनीं मूर्तीस चांचपून पाहिलें, तों पुनः दशभुज पंचवदन शिवमूर्ति त्यांच्या हातास लागली. पण डोळे उघडून पाहतात तों श्रीविठ्ठल पुढें उभा ! मग मात्र नरहरींस पश्चात्ताप झाला. त्यांनीं सद्गदित अंतःकरणानें पांडुरंगास साष्टांग नमस्कार घातला व त्याची प्रार्थना केली कीं, ‘हे देवा, पंढरिनाथा ! मीं अज्ञानानें द्वैतभाव मनांत धरला होता; पण तुझ्या कृपेनें त्या द्वैताचा आज निरास होऊन, ‘ सर्वदेवनमस्कारं केशवं प्रतिगच्छति ’ या सिद्धांताची सत्यता पूर्णपणें माझ्या अनुभवास आली. मी तुला शरण आलों आहें; मजवर तुझी कृपा असूं दे.’ मग भगवंतांनीं नरहरींची समजूत

केली व त्या दिवसापासून नरहरि सोनारांनीं आपलें शेष आयुष्य भगवद्भजनांत वेंचिलें.

नरहरि सोनारांचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत; त्यांपैकीं बारा निवडक अभंग पुढें दिले आहेत. ही सत्पुरुषांची वाणी आहे; ती भाविकपणानेंच ऐकली पाहिजे.

१

निगम हा वेल प्रकाशमान जाहला । भक्ति फुलें आला शोभताती ॥ १ ॥
निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताई । घनदाट पाहा फळें आलीं ॥ २ ॥
तयांचिया चरणीं सोनार नरहरि । झाडलोट करी तया द्वारीं ॥ ३ ॥

२

संवगडे निवृत्ति सोपान मुक्ताई । ज्ञानदेवापायीं भाव माझा ॥ १ ॥
धन्य ते वैष्णव मिळाले सकळो । जीवभाव ओंवाळीं तयां चरणीं ॥ २ ॥
अखंड ध्यानीं ध्यातो हृदयीं साचार । नरहरि सोनार कायामनें ॥ ३ ॥

३

कटीं दोनी कर दिव्य तें रूपडें । सनकादिक वेडे जयासाठीं ॥ १ ॥
तें हें बाळरूप उभें चंद्रभागेचे तीरीं । चतुर्भुज हरी शोभतसे ॥ २ ॥
वैजयंती माळा किरीट कुंडलें । हृदय शोभलें द्विजपदें ॥ ३ ॥
कासे पीतांबर शोभत मेखळा । ध्यानीं लक्षी त्याला नरहरी ॥ ४ ॥

४

पाहतां पाहतां वेधलेंसे मन । जाहलें ते उन्मन दृष्टीभरी ॥ १ ॥
आनंदें आनंद नित्य परमानंद । ध्याती चरणारविंद शिवादिक ॥ २ ॥
तोचि उभा हरी पंढरीनायक । पाहतां सम्यक सुख वाटे ॥ ३ ॥
सोनार नरहरि तयाचिया घरीं । झाडलोट करी जीवें भावें ॥ ४ ॥

५.

नव्हे तें सगुण नव्हे तें निर्गुण । जाणती ते खूण तत्त्वज्ञानी ॥ १ ॥
नव्हे तें अंबर निःशब्द निराळ । अद्वैत केवळ जैसे तैसें ॥ २ ॥
म्हणे नरहरी सोनार क्षराहूनी क्षर । परेहूनी परब्रह्म विटेवरी ॥ ३ ॥

६

पहा पहा तुम्ही डोळां । माझा भोळा शंकर ॥ १ ॥
ज्याचें देणें अवघ्यां सम । नाहीं विषम कोणांसी ॥ २ ॥
भावें तोषे कर्पूरगौर । हर हर वदतां ॥ ३ ॥
ध्यान धरुनी स्मशानीं । जपे रामनाम मनीं ॥ ४ ॥
शंभूचे चरणावरी । लोळे सोनार नरहरी ॥ ५ ॥

७

सुखाची विश्रांती सुख आलें भेटी । प्रेम दुणावे पोटीं वोसंडलें ॥ १ ॥
सांवळें सगुण साजिरें निर्गुण । पाहतां आनंद पूर्ण मना होय ॥ २ ॥
अलक्ष्य अपरंपार नकळे विचार । नरहरी सोनार ध्यात चित्तीं ॥ ३ ॥

८

कारण महाकारण यांच्याही परता । भरुनी पुरता उरलासे ॥ १ ॥
तें हें विटेवरी समचरण साजिरें । पाहतां गोजिरें नीळवर्ण ॥ २ ॥
उदंडें वार्णिलें उदंडें ध्याइलें । उदंडें गाइलें परी नसरेचि ॥ ३ ॥
म्हणे नरहरि सोनार अलक्ष्या वेगळें । पाहतां नकळे भक्तीविण ॥ ४ ॥

९

चरणाचा महिमा ब्रह्मयासी आवडे । येरांसी थोकडें निरुपम ॥ १ ॥
पायवणी वंदी शिव तो हृदयीं । सर्व सुख पाहीं तेणें लाभे ॥ २ ॥
सोनार नरहरी वंदी माथां पाय । आणिक न पाहे वास दुजी ॥ ३ ॥

१०

शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा सदोदित ॥
धन्य ते संसारीं नर आणि नारी । वाचे हर हरी उच्चारित ॥ २ ॥
नाहीं पैं भेद अवघा मनीं अभेद । द्वेषाद्वेष संबंध उरी नुरे ॥ ३ ॥
सोनार नरहरि न देखे द्वैत । अवघा मूर्तिमंत एकरूप ॥ ४ ॥

११

नामाची आवडी जिव्हेसी तो चाळा । तेणें कळिकाळा भय त्रास ॥ १ ॥
गोमटें गोजिरें नाम हें विठ्ठल । बोला वाचा बोल प्रेमभरें ॥ २ ॥
न सरे कल्पना न निवारेचि भ्रांति । नामें होय प्राप्ती नित्यानंद ॥ ३ ॥
सोनार नरहरि प्रेमाचा भुकेला । म्हणोनी छंद त्याला नामस्मरणीं ॥ ४ ॥

१२

माझें प्रेम तुझे पायीं । राहो ऐसें करीं कांहीं ॥ १ ॥
मागणें तें हेंचि मागों । आणिका न लागों छंदासी ॥ २ ॥
काया वाचा आणि मन । केलें समर्पण तव चरणीं ॥ ३ ॥
हाचि माझा निर्धार । म्हणे नरहरी सोनार ॥ ४ ॥

नरहरि सोनाराची मृत्युतिथि समजली नाहीं. त्याचप्रमाणें त्यांच्या गुरुपरंपरेसंबंधानेंही कांहींच माहिती मिळाली नाहीं. महिपतींनीं आपल्या भक्तविजयाच्या २० व्या अध्यायांत नरहरि सोनाराचें चरित्र फार प्रेमळ भाषेंत वर्णिलें आहे, तें वाचण्याची वाचकांस आम्ही शिफारस करितों.

---

## परिसा भागवत.

‘ परिसा भागवत ’ ह्मणे, तेंचि वदति नाम परिसते ज्याचे ।
तम पुनरपि न उरों दे बळ मिरवी भानुपरिस तेजाचें ॥ १ ॥

**सन्मणिमाला, मोरोपंत.**

परिसा भागवत यांची कथा महिपतींनी भक्तविजयांत वर्णिली आहे. हे पंढरपुर येथें राहत असत. त्यांनीं अनुष्ठान करून देवीची आराधना केली, तेव्हां देवी प्रसन्न होऊन ‘ वर माग ’ असें म्हणाली. ‘ माझें चित्त तुझ्या भजनीं निरंतर रत असावें व माझा संसार सुखानें चालावा ’ असा वर परिसा भागवत यांनीं मागून घेतला. रुक्मिणीनें त्यांस एक परीस दिला व तो जिवापलीकडे जपून ठेव असें सांगून ती अदृश्य झाली. भागवतांनीं तो परीस आपल्या ‘ कमलजा ’ नामक स्त्रीपाशीं देऊन, त्याच्यासंबंधानें फार काळजी घे, असें तिला बजावून सांगितलें. परीस पाहून कमलजेस फार आनंद झाला.

एके दिवशीं कमलजा चंद्रभागेचें पाणी घेऊन घरीं येत असतां वाटेंत तिला नामदेवांची पत्नी राजाई भेटली. बोलतां बोलतां कमलजेनें परिसाची गोष्ट राजाईस सांगितली. 'तुमचा परीस घटकाभर मला द्याल तर मजवर तुमचे मोठे उपकार होतील' अशी राजाईनें विनंति केल्यावरून कमलजेनें आपला परीस तिच्या हातीं दिला. परीस घेऊन राजाई घरीं आली व घरांतील लोखंडी सामानाचें सोनें करून व तें विकून, पुष्कळशी सामग्री घेऊन आली. नामदेव घरीं आले, तेव्हां तो पक्वान्नांचा थाट पाहून त्यांस मोठेंच आश्चर्य वाटलें. मग त्यांनीं राजाईकडून सगळी हकीकत विचारून घेतली व 'या द्रव्याचा विटाळ आम्हास नको' असें म्हणून तो परीस त्यांनीं चंद्रभागेंत फेंकून दिला!

इकडे परिसा भागवत घरीं येऊन पाहतात, तों परीस कोठें दृष्टीस पडेना. कमळजेस विचारल्यावर, आपण राजाईस परीस दिला आहे, ती तो लवकरच आणून देईल असें तिनें सांगितलें. दुसऱ्याच्या हातीं परीस गेला, हें ऐकतांच भागवतांस मोठी काळजी पडली. मग तीं नवरा—बायको नामदेवांच्या घरीं आलीं. नामदेव चंद्रभागेवर होते, तेथें त्यांस राजाईनें नेऊन पोंचविलें. तेथें भागवतांनीं परिसासाठीं मोठा आकांत मांडला! दुसऱ्याची वस्तु घेऊन ती चंद्रभागेंत फेंकून दिल्याबद्दल इतर लोकही नामदेवांस फार बोलले. मग नामदेवांनीं चंद्रभागेंतून एक ओंजळभर खडे काढले व 'यांतून तुमचा परीस कोणता तो ओळखून घ्या' असें त्यांनीं भागवतांस सांगितलें. भागवतांनीं त्यांतील प्रत्येक खड्यास लोखंड लावून पाहिलें, तेव्हां ते सगळेच खडे परीस आहेत, असें त्यांस आढळून आलें. भागवतांस मोठें आश्चर्य वाटलें व लोकही चकित झाले. भगवद्भक्तीचें सामर्थ्य पाहून भागवतांस मोठा

पश्चात्ताप झाला. ते तात्काल नामदेवांस शरण गेले व त्यांजकडून उपदेश घेऊन कृतार्थ झाले. भागवतांनीं पुढें आपलें आयुष्य विरक्त-पणानें घालविलें. ते लोकांस ‘ परिसा भागवत ’ ( भागवत ऐका ) असें सांगत असत, यामुळें त्याच नांवानें लोक त्यांस संबोधूं लागले. मोरोपंतांनींही या लेखाच्या प्रारंभीं दिलेल्या आर्येंत या गोष्टीचा उल्लेख केला आहे. कित्येकांच्या मतें, त्यांज-पाशीं परीस होता, म्हणून त्यांचें नांव परिसा भागवत असें पडलें असावें. असो.

भागवतांचे कांहीं अभंग वारकरी लोकांत प्रसिद्ध आहेत, ते फार प्रेमळ आहेत. पुढील अभंग पहा:—

१

अणुमाजी राम रेणूमाजी राम । तृणकाष्ठीं राम वर्ततसे ॥ १ ॥
बाहीजुं भीतरीं राम चराचरीं । विश्वीं विश्वाकारीं व्यापलासे ॥ २ ॥
रामेंवीण स्थळ रितेंचि पै नाहीं । वर्ते सर्वांठायीं राम राम ॥ ३ ॥
परिसा भागवत कायावाचामनें । श्रीरामावांचून आन नेणें ॥ ४ ॥

२

पैल मेळा रे कवणाचा । नामा येतो केशवाचा ॥ १ ॥
ब्रीद दीसतें अंबरीं । गरुडटकियांच्या हारी ॥ २ ॥
परिसा येतो लोटांगणीं । नामा लागे त्याचे चरणीं ॥ ३ ॥

३

आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठोबासी ।
आज्ञा द्यावी हो मजशीं । समाधि विश्रांतीलागीं ॥ १ ॥
आयुष्य कळसासी आलें । अभंग त्वां सिद्धी नेले ।
ज्ञानेश्वरसंगतीं घडलें । तीर्थमीस जगदोद्धार ॥ २ ॥
जन्मा आलियाचें कृत्य । जन लावावें सुपंथें ।
विठ्ठलमंत्र त्रिभुवनातें । जग जाणत महिमा हा ॥ ३ ॥
सर्व सिद्धी मनोरथ । तुझे कृपें पावलों सत्य ।
म्हणे परिसा भागवत । नामा नाम जपतसे ॥ ४ ॥

४

वैष्णवांचा थाट पताकांचे भार । करिती जयजयकार नामघोष ॥ १ ॥
पुष्पांचा वरुषाव विमानांची दाटी । नामघोष सृष्टीं न समाये ॥ २ ॥
ऋषिगण गंधर्व इंद्र प्रजापती । धन्य धन्य म्हणती नामयासी ॥ ३ ॥
देव वेळाईत केला सेवाऋणें । अनन्या अनन्य भक्ती याची ॥ ४ ॥
अळंकारा ज्ञानिया इंद्रनीळीं सोपान । निवृत्तीसी जाण त्र्यंबकेश्वरीं ॥ ५ ॥
नामा महाद्वारीं श्रेष्ठ हे पंढरी । प्रत्यक्ष भूमीवरी वैकुंठ हें ॥ ६ ॥
देवें नामयासी पोटासी धरियेलें । नेत्रोदकें क्षाळिलें सर्व अंग ॥ ७ ॥
जन्मोनी सार्थक त्वां बरवें केलें । वनीं मोकलीलें मजलागीं ॥ ८ ॥
राही रखुमाई सत्यभामादि प्रवृत्ती । नामया आलिंगिती प्रेमें करुनी ॥ ९ ॥
धन्य दिन सुखाचा वेदघोष विप्रांचा । वैष्णवीं नामाचा गजर केला ॥ १० ॥
तेथें पूजा पुनस्कार परिसियानें केली । हृदयीं धरिलीं चरणकमळें ॥ ११ ॥

५

नामदेव नामदेव । धरा भाव दृढ हा ॥ १ ॥
देव सांगे वैष्णवांसी । नका यासी विसंबूं ॥ २ ॥
रिद्धी सिद्धी लोटांगणी । निशिदिनीं तिष्ठती ॥ ३ ॥
म्हणे परिसा भागवत । देवें मात सांगितली ॥ ४ ॥

---

## भानुदास.

झाले वंद्य शतमखा ते गेले शरण भानुदासा जे ।
यांशीं साम्य पहातां न उदारा रत्नसानुदा साजे ॥ १ ॥

**सन्मणिमाला–मोरोपंत.**

भानुदास हे प्रसिद्ध सत्पुरुष एकनाथस्वामी पैठणकर यांचे प्रपितामह होत. यांचा काल, भारतवर्षीय अर्वाचीन कोशकर्ते, काव्यसंग्रहकर्ते व रा. राजवाडे यांनीं शके १४३६ हा दिला आहे; पण तो बरोबर नसावा असें वाटतें. भानुदासांचें चरित्र महिपतींनीं आपल्या भक्तविजय व भक्तलीलामृतांत साकल्येंकरून वर्णिलें आहे, त्याच्याच आधारानें प्रस्तुत लेख मी लिहीत आहें.

भानुदास हा सूर्याचा अवतार होय, अशी भाविक जनांची समजूत आहे. पैठण येथें एक सूर्योपासक ब्राह्मण राहत असे, त्याच्या पत्नीच्या उदरीं भानुदास जन्मले. महिपतींनीं भक्तलीलामृताच्या १८ व्या अध्यायांत, ज्ञानदेव-नामदेवादि संत भानुदासांचे समकालीन होते, असें म्हटलें आहे व त्यावरून भानुदासांचा काल शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकाची अखेर व चौदाव्या शतकाचा प्रारंभ हा ठरतो. एकनाथांनीं आपलें भागवत शके १४९५ त लिहिलें, त्यावेळीं त्यांचें वय ४५ वर्षांचें होतें; अर्थात् शके १४५० च्या सुमारास जन्मलेल्या एकनाथांचे प्रपितामह भानुदास हे १४३६ सालीं विद्यमान होते हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं. प्रत्येक पिढी ५० वर्षांची धरली, तरी भानुदासांस शालिवाहन शकाच्या तेराव्या किंवा चौदाव्या शतकांत घातल्याशिवाय गत्यंतर नाहीं. शिवाय, अनागोंदीच्या रामराजानें जी विठ्ठलमूर्ति आपल्या राजधानीस नेली होती, ती भानुदासांनीं परत आणली, अशी कथा आहे, व ज्ञानेश्वरीच्या शेवटीं या रामराजाचा उल्लेख ज्ञानदेवांनीं स्पष्ट शब्दांनीं केला आहे. अशा स्थितींत भारतवर्षीय अर्वाचीन कोशकर्ते, काव्यसंग्रहकर्ते व रा. राजवाडे यांनीं शके १४३६ हा भानुदासांचा काल कोणत्या पुराव्याच्या आधारानें दिला आहे, हें कळत नाहीं.

रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपल्या एकनाथचरित्रांत भानुदास यांचा जन्म शके १३७० च्या सुमारास पैठण क्षेत्रीं झाला, असें म्हटलें आहे; व ज्या राजाकडून पांडुरंगाची मूर्ति भानुदासांनीं परत आणली त्या राजाचें नांव ‘ कृष्णराय ’ असें दिलें आहे. परंतु हें विधान त्यांनीं कोणत्या पुराव्याच्या आधारानें

केलें आहे, हें समजत नाहीं. भक्तविजय व भक्तलीलामृत या दोन्ही ग्रंथांत वरील राजाचें नांव ‘ रामराजा ’ असें दिलें आहे. पुढील ओंव्या पहा:—

“ ब्राह्मणास देखोनी रामराजा । नमन करोनि केली पूजा ॥ ”

**भक्तविजय, अ० ४३.**

“ रामराजा विद्यानगरीं । परिवारेंसी राज्य करी ॥ ”

**भक्तलीलामृत, अ० १८.**

भानुदासांवर त्यांच्या आईबापांची फार प्रीति होती. भानुदासांचा व्रतबंध झाल्यावर एके दिवशीं कांहीं कारणानें त्यांचे तीर्थरूप त्यांना रागें भरले. त्यामुळें खिन्न होऊन भानुदास घरांतून निघाले व एका देवालयांत जाऊन बसले. हें देवालय भुईंत असल्यामुळें, लोकांस फारसें माहीत नव्हतें. देवालयांत श्रीसूर्यनारायणाची पुरातन मूर्ति होती, तिला नमस्कार करून भानुदासांनीं तिची फार स्तुति केली, तेणेंकरून प्रसन्न झालेल्या सूर्यनारायणानें मनुष्यरूपानें प्रगट होऊन भानुदासांस दूध पाजिलें; व सांगितलें कीं, ‘ तूं सर्वकाळ भगवंताचें स्मरण करीत बैस; तुजवर कांहीं संकट आलें, तर तें मी निवारण करीन. ’

इकडे, सात दिवस भानुदासांचे तीर्थरूप त्यांचा शोध करीत फिरत होते. मुलाच्या वियोगानें ते अतिशयित दुःखी झाले होते. पुढें एके दिवशीं भानुदास देवळांतून सहज बाहेर आले असतां, ते एका ब्राह्मणाच्या दृष्टीस पडले. ब्राह्मणानें त्यांस हाक मारली, पण तिकडे लक्ष्य न देतां ते देवळांत शिरले. मग त्या ब्राह्मणानें ही हकीकत भानुदासांच्या तीर्थरूपांस कळविली. त्यांनीं पुष्कळ लोकांसह देवळांत जाऊन पाहिलें, तों तेथें सगळा काळोख दृष्टीस पडला. मग दिवट्या पाजळून ती सगळी मंडळी आंत गेली. तेथें सूर्यनारायणाची मूर्ति होती तिच्या पायांवर आपलें मस्तक ठेवून भानुदास

निजले होते. त्यांच्या आई-बापांनीं त्यांस जागृत करून पोटाशीं धरिलें, व ' जेवणाची व्यवस्था कोणीं ठेविली ? ' असें विचारलें. भानुदास म्हणाले, ' एक मोठा तेजस्वी ब्राह्मण येथें येऊन मला दूध पाजितो. ' हा तेजस्वी ब्राह्मण सूर्यनारायण असावा, अशा समजुतीनें सगळे लोक, तेव्हांपासून, त्यांस ' भानुदास ' या नांवानें संबोधूं लागले.

भानुदासांस त्यांच्या आई-बापांनीं घरीं नेलें व त्यांस पुनः कधींही कठोर शब्द न बोलण्याचा निश्चय केला. पुढें एक चांगलीशी मुलगी पाहून, तिच्याशीं भानुदासांचें त्यांनीं लग्न करून दिलें. कांहीं दिवसांनीं आई-बाप मरण पावले, तरी भानुदासांचें चित्त हरिभजनावरून ढळलें नाहीं. त्यांस मुलेंबाळें झालीं होतीं, त्यांस धड अन्नवस्त्रही मिळेना, मग दागिन्यांची गोष्ट तर लांबच राहिली. ह्या दुःस्थितीबद्दल त्यांच्या पत्नीस फार वाईट वाटे, पण ती बिचारी काय करणार ? मग कांहीं लोक भानुदासांस म्हणाले, ' तुझे आई बाप जिवंत होते, तोंपर्यंत तुझें पालन-पोषण त्यांनीं केलें; पण आतां तुझीं बायकोपोरें उपास काढतात, त्यांची काळजी तुला घेतली पाहिजे. आम्ही तुला शंभर रुपयांचें कापड देतों, त्याचा व्यापार करून, त्यांत जो नफा राहील, त्याजवर तुला आपल्या कुटुंबाचा चरितार्थ सहज चालवितां येईल. ' भानुदासांनीं ही गोष्ट कबूल केली व लोकांनीं दिलेल्या कापडाचा ते व्यापार करूं लागले. त्यांनीं सचोटीनें व्यापार केल्यामुळें, त्यांस गिऱ्हाईक चांगलें मिळालें व बराच फायदा होऊं लागला. भानुदासांचा हा उत्कर्ष इतर व्यापाऱ्यांस सहन झाला नाहीं.

एके दिवशीं सगळे व्यापारी बाजारास गेले, त्यांत भानुदासही होते. अस्तमान झाल्यावर भानुदास कीर्तनास गेले, इतर व्यापारी

देवळांत निजले. भानुदासांचें नुकसान करण्यास ही संधि चांगली आहे, असें पाहून व्यापाऱ्यांनीं त्यांचें घोडें सोडून दिलें व कापडाचें दिंड एका खांचेंत लपवून ठेविलें. पण भक्ताची काळजी ईश्वर घेतो; तो त्या ठिकाणीं विप्रवेषानें प्रगट होऊन, भानुदासांचा घोडा धरून बसला. इतक्यांत, निजलेल्या व्यापाऱ्यांवर चोरांनीं हल्ला केला व त्यांस हाणमार करून, त्यांचाच सगळा माल लुटून नेला.

कीर्तन संपल्यावर भानुदास बिऱ्हाडीं येण्यास निघाले असतां, वाटेंत आपला घोडा धरून एक ब्राह्मण बसला आहे, असें त्यांनीं पाहिलें. भानुदासांस पाहतांच ब्राह्मण निघून गेला. भानुदास घोडा घेऊन देवळांत आल्यावर व्यापाऱ्यांनीं सर्व हकीकत त्यांस सांगितली. तेव्हां, ज्या धंद्यामुळें देवास श्रम झाले, तो धंदाच करावयाचा नाहीं, अशा निश्चयानें भानुदासांनीं आपलें सगळें कापड त्या व्यापाऱ्यांस वांटून दिलें व आपण निरिच्छपणानें भजन करूं लागले. भानुदास दर आषाढी-कार्तिकी एकादशीस पंढरपुरास जात असत.

पंढरपुरचा एक गृहस्थ चरितार्थ-संपादनासाठीं फिरत असतां, विद्यानगरास गेला. तेथें रामराजा राज्य करीत होता, त्याची त्यानें भेट घेतली. राजानें त्याचा चांगला आदरसत्कार करून, त्याच्या आगमनाचें कारण विचारलें. गृहस्थ म्हणाला. ' मी पढंरपुरचा रहिवासी; आपली कीर्ति ऐकून येथें आलों. ' तेव्हां राजानें त्यास सांगितलें कीं, ' मी स्नान करून देवीची पूजा केल्यावर, तुम्हांस काय द्यावयाचें तें देईन. ' मग राजानें स्नान केलें व त्या गृहस्थास घेऊन तो देवीच्या देवळांत गेला. तेथें, देवीची षोडशोपचारें पूजा करून, प्रसाद वांटल्यावर राजा गृहस्थास म्हणाला, ' या राजाईसारखें

त्रिभुवनांत दुसरें दैवत नाहीं. पंढरीच्या पांडुरंगाचाही असा इतमाम नसेल. पांडुरंगाचे सगळे भक्त भिकारी, त्यांजकडून त्यास काय मिळणार ?' राजाचें हें भाषण ऐकून त्या गृहस्थास फार संताप आला. तो म्हणाला 'राजा, तूं अद्याप पंढरपूर पाहिलें नाहींस. तें नगर स्वतः विश्वकर्म्यानें सुवर्ण आणि रत्नें यांनीं शृंगारलें आहे; तुझ्या देवीचें वैभव त्याच्या पासंगासही पुरणार नाहीं. ही तुझी देवी तर रात्रंदिवस पांडुरंगाच्या देवळांत झाडलोट करीत असते.' आपल्या दैवताची ही निंदा ऐकून अत्यंत क्रोधायमान झालेला राजा त्या गृहस्थास म्हणाला, 'राजाईची निंदा करितोस काय ? ठीक आहे. पंढरपुर ही सुवर्णनगरी आहे, असल्या अवास्तव गप्पा मारण्याचा परिणाम काय होतो, हें तुला आतांच दाखवितों.' गृहस्थानें राजास विनंति केली कीं, 'स्वतः पंढरपुरास जाऊन माझ्या विधानाची सत्यता प्रत्यक्ष पहावी.' 'ठीक आहे' असें म्हणून राजा पंढरपुरीं जाण्यास निघाला. इकडे त्या गृहस्थानें पांडुरंगाची प्रार्थना केली, 'हे भगवंता ! तुझ्या ऐश्वर्याचें राजापाशीं मीं यथार्थ वर्णन केलें आहे; आतां माझी लाज राखून, माझ्या वचनाची सत्यता राजाच्या अनुभवास आणून देण्यास तूंच समर्थ आहेस.'

आपली महती वर्णन करणाऱ्या गृहस्थावर असत्यतेचा आरोप येऊं नये म्हणून पांडुरंगानें लक्ष्मीरूप रुक्मिणीच्या साहाय्यानें सगळें पंढरपुर एका क्षणांत सुवर्णमय करून टाकिलें.

इकडे, रामराजा जसजसा पंढरपुरानजीक येत चालला, तसतसा त्या गृहस्थास, त्यानें केलेल्या वर्णनाची तो पुनः पुनः आठवण करूं लागला. शेवटीं पंढरपुर दिसूं लागलें, त्यांतील इमारतींची तीं रत्नखचित सुवर्णशिखरें दृष्टीस पडतांच राजाचे डोळे दिपून

गेले. तो त्या ब्राह्मणास म्हणाला ‘ तूं वर्णन केल्याप्रमाणें पंढरीचें वैभव मोठें आहे, यांत संशय नाहीं !’ बिचारा ब्राह्मण भगवंतानें आपली लाज राखली म्हणून मोठ्या भक्तीनें त्याचे गुणानुवाद गाऊं लागला. इंद्रादि देव पांडुरंगाच्या मंदिरांत हात जोडून उभे आहेत, अष्टसिद्धि दासींचीं कामें करीत आहेत, त्यांतच आपली राजाई देवीही झाडलोट करीत आहे, हें पाहून राजास अत्यंत आश्चर्य वाटलें. तो राजाईस म्हणाला ‘ देवी ! विद्यानगर सोडून तूं इकडे कां आलीस ? ’ देवीनें उत्तर दिलें ‘ राजा, जेथें इंद्रादि देव आणि ऋद्धिसिद्धीसारख्या असंख्य दासी रात्रंदिवस राबत आहेत, तेथें माझी कथा काय ? ’ मग, राजानें पांडुरंगाचें दर्शन घेऊन त्यास सप्रेम आलिंगिलें. तो ब्राह्मणास म्हणाला ‘ तूं आज मला साक्षात् परमेश्वर भेटविलास, तुझे उपकार मजकडून कसे फिटणार ? इद्रादि देव बद्धपरिकर होऊन सेवेस सर्वदा तयार; माझी राजाई देवी तर हातीं केरसुणी घेऊन अंगणें झाडीत बसली आहे; त्यापक्षीं पांडुरंगासारखें वरिष्ठ दैवत आणि चंद्रभागेसारखें वरिष्ठ तीर्थ सगळ्या त्रिभुवनांत दुसरें नाहीं ! ’ इतक्यांत पंढरपुराचें सुवर्णरूप नष्ट होऊन तें पूर्वीप्रमाणें दिसूं लागलेलें पाहून राजास मोठा चमत्कार वाटला. तो पांडुरंगास म्हणाला, ‘ हे पंढरीनाथा ! तुला विद्यानगरास घेऊन जावें, अशी माझी इच्छा आहे; तर या गोष्टीस तुझें अनुमोदन असावें. ’ भगवान् म्हणाले ‘ ठीक आहे, मी येतों, पण तुझ्या हातून जर कांहीं अन्याय घडला, तर मी तत्क्षणीं पंढरपुरास परत येईन.’ मग राजानें दुतर्फा लष्कर उभें करून, कोणाचें कांहीं चालूं न देतां, पांडुरंग–मूर्ति विद्यानगरास नेली व तेथें तिची स्थापना करून तो तिची पूजा–अर्चा करूं लागला. पांडुरंग विद्यानगरास गेल्यापासून पंढरपूर उदास दिसूं लागलें; संत खेद करूं लागले.

मग ' पांडुरंगास मी घेऊन येतों, ' अशी प्रतिज्ञा करून संत-शिरोमणि भानुदास विद्यानगरास गेले.

विद्यानगरांत भानुदासांनीं विठ्ठल-मूर्तीसंबंधानें शोध केला; तेव्हां त्यांस असें समजलें कीं, राजानें ती मूर्ति आपल्या मंदिरांत ठेविली असून तो तिची एकांतांत पूजा करितो; मंदिरांत कोणी जाऊं नये म्हणून, मंदिराचीं दारें बंद करून सभोंवतीं रक्षकही ठेविले आहेत. इतकी बातमी लागल्यावर, मध्यरात्रीच्या सुमारास सगळे द्वारपाल निजले आहेत अशा वेळीं भानुदास त्या ठिकाणीं गेले; तोंच आपोआप कुलप उघडून मंदिराचीं दारें खुलीं झालीं. भानुदास एकदम आंत शिरले व देवास साष्टांग नमस्कार घालून म्हणाले, ' पंढरीनाथा, आम्हां गरिबांस सोडून राजाच्या समागमांत राहण्यांत तुला आनंद वाटतो काय? ' तुजजवळून कधींही हालणार नाहीं ' असें पुंडलिकास जें तूं वचन दिलें होतेंस, त्याची आठवण तुला राहिली नाहीं ?' भानुदासांचें हें मर्म-भेदी भाषण ऐकून देव हांसून म्हणाले, ' अरे, तुम्हां भक्तांस मी चारी मुक्ति देऊन टाकल्या, तरी तुम्हीं समाधान न पावतां, सारखे भजन करीत बसतां. ह्या तुमच्या कामगिरीबद्दल तुम्हांस देण्या-सारखें मजपाशीं आतां कांहींच नसल्यामुळें, मी आपला येथें येऊन राहिलों ! ' इतकें बोलून, पुनः दुसऱ्या दिवशीं दर्शनास येण्यास सांगून व आपला हार भानुदासांच्या गळयांत घालून देवानें त्यांस निरोप दिला. भानुदास मंदिरांतून बाहेर पडतांच सगळीं दारें आपोआप बंद झालीं !

प्रातःकाळीं राजा काकड-आरतीसाठीं मंदिरांत आला, तों देवा-च्या गळयांतला हार नाहींसा झाला आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. मग, सगळ्या पुजाऱ्यांस शिक्षा करून, तो अमूल्य रत्नहार शोधून

काढण्याची त्यानें त्यांस आज्ञा केली. पुजारी हाराच्या शोधांत असतां, भानुदासांच्या गळ्यांत तो हार असलेला त्यांनीं पाहिला. तत्काल भानुदासांस राजापुढें नेऊन उभें केलें; लोकांनींही भानुदासांवर चोरीचा आरोप करून, त्यांची फार निर्भर्त्सना केली. तो सगळा प्रकार निमूटपणें सहन करून, भानुदास हरिनामस्मरण करीत स्वस्थ होते. राजानें चोरीचा अपराध शाबीत धरून भानुदासांस सुळीं देण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें राजदूतांनीं भानुदासांस वधस्थानाकडे चालविलें असतां, त्यांनीं ‘ आपली व पांडुरंगाची एकदां भेट करवा ’ अशी विनंति केल्यावरून, राजाज्ञेनें दूतांनीं त्यांस मंदिरांत नेलें. तेथें, भानुदासांनीं करुणस्वरानें सगळी हकीकत देवास निवेदन केली. ते म्हणाले, ‘ भगवंता ! तुला पंढरीस नेण्याच्या उद्देशानें मी येथें आलों असतां, मला अशा शोचनीय रीतीनें मृत्यु आलेला तुझ्यानें कसा बघवतो, याचें मला आश्चर्य वाटतें ! ’

शेवटीं शूलारोपणाची सगळी तयारी झाली. हजारों लोक ती मौज पाहण्यास जमले होते. सुळावर चढण्यापूर्वी भानुदासांनीं देवाची प्रार्थना केली कीं, ‘ देवा ! तुझ्यासाठीं माझा प्राण गेला तरी बेहत्तर; पण तुझें भजन मी सोडणार नाहीं. हा नश्वर देह तुजवरून मी ओंवाळून टाकला. ’

भानुदासांच्या तोंडांतून इतके शब्द बाहेर पडले नाहींत तोंच त्या सुळाचा सुंदर फलपुष्पयुक्त असा वृक्ष झालेला सगळ्या प्रेक्षकांच्या दृष्टीस पडला. राजदूतांनीं नगरांत जाऊन हा चमत्कार राजास कळविला. अत्यंत विस्मित झालेल्या राजानें मोठ्या लगबगीनें वधस्थानीं येऊन पाहिलें, तों दूतांनीं सांगितलेली हकीकत खरी आहे असें त्याच्या अनुभवास आलें. महिपति म्हणतातः—

## ओव्या.

ऐसें देखोनी नृपवर । घालीत साष्टांग नमस्कार ।
म्हणे ' तूं निधडा वैष्णव वीर । मी नेणेंचि पामर मूढमती ॥ १७३ ॥
भानुदास पाहे उघडोनि नेत्र । तों सुळाचा वृक्ष जाहला थोर ।
म्हणे ' मज पावला रुक्मिणीवर । अघटित विचार हा झाला ॥ १७४ ॥ '
भानुदासासी धरोनि हातीं । राउळासी घेऊनि येत भूपती ।
तों म्लानमुख पांडुरंगमूर्ती । अश्रु वाहती नेत्रांतुनी ॥ १७५ ॥
ऐसें देखोनि नृपवर । घातला साष्टांग नमस्कार ।
हात जोडोनि देवासमोर । मधुरोत्तरें विनवीतसे ॥ १७६ ॥
म्हणे ' मी अपराधी नाना । तुझ्या भक्तांचा केली छळणा ।
रामरायाची ऐकूनि करुणा । पंढरिराणा काय वदे ॥ १७७ ॥
' आतां माझें रूप आठवूनि अंतरीं । सुखें राहावें आपुले नगरीं ।
आम्ही भानुदासाच्या बरोबरी । जातों पंढरी पाहावया ॥ १७८ ॥
यावरी आग्रह करिसील जर । तरी अनर्थ होईल थोर ' ।
ऐसें वदतां शार्ङ्गधर । निवांत नृपवर राहिला ॥ १७९ ॥
भानुदास म्हणे ' रुक्मिणीकांता । कैसा उपाय करावा आतां ।
माझी तों नाहीं राजसत्ता । कीं मेळवूनि बहुतां तुज नेऊं ' ॥ १८० ॥
ऐशीं ऐकोनि वचनोक्ती । लाघव करीत रुक्मिणीपती ।
तत्काल लहान जाली मूर्ती । विस्मित चित्तीं नृपनाथ ॥ १८१ ॥
भानुदास संतोष पावूनि मना । संबळींत घातला पंढरिराणा ।
' जय श्रीविठ्ठल ' बोलोनि वचना । रुक्मिणीरमणा उचलिलें ॥ १८२ ॥
संबळी आडोनि जगजेठी । भानुदासासी बोले गुजगोष्टी ।
' आज परमानंदें भरली सृष्टी । होतील भेटी संतांच्या ' ॥ १८३ ॥

**भक्तलीलामृत**, अध्याय १८.

मग पंढरपुरांतील सगळ्या संतांनीं, मोठ्या थाटानें वाजत गाजत, भजन करीत, पताका फडकावित, भानुदासांसह श्रीपांडुरंग-मूर्ति मंदिरांत नेली व तेथें तिची स्थापना करून भानुदासांचा मोठा जयजयकार केला. येथें भानुदासांचें चरित्र संपलें. हें प्रेमळ

चरित्र फार ‘ चमत्कारिक ’ आहे; तें महिपतींनीं व भीमस्वामींनीं जसें वर्णिलें आहे, तसेंच मीं येथें उतरून घेतलें आहे. ज्यांची चमत्कारासंबंधानें उपहासवृत्ति आहे, त्यांस हें चरित्र वाचून घटकाभर मौज वाटेल; पण ज्या लोकांची सत्पुरुषांच्या अलौकिक इच्छाशक्तीविषयीं श्रद्धायुक्त विश्वासबुद्धि असेल, त्यांच्या परमार्थ-बुद्धीच्या दृढीकरणास हें प्रेमळ चरित्र साधनीभूत होईल, याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाहीं.

भानुदास हे एकनाथस्वामींचे प्रपितामह होते, हें या लेखाच्या आरंभीं सांगितलेंच आहे. एकनाथांस या आपल्या पूज्य प्रपिता-महांचा मोठा अभिमान वाटत असे, हें त्यांनीं भानुदासांवर जे कित्येक अभंग केले आहेत त्यांवरून व त्यांच्या इतर ग्रंथांतील उल्लेखावरून स्पष्ट होतें.

भानुदासांचे बरेच अभंग उपलब्ध आहेत, त्यांतील कांहीं छापले आहेत; कांहीं अद्याप अप्रकाशित आहेत. दाभाडयांच्या तळेगांवीं संताजी तेली जगनाडे यांच्या हातची, त्यांच्या वंशजांच्या संग्रहीं एक वही आहे, तींत भानुदासांचे कांहीं अभंग आहेत. भानु-दासांची वाणी किती प्रेमळ व साधी आणि प्रासादिक आहे, हें पुढील अभंगांवरून समजेल.

विद्यानगरांतील मंदिरांत विठ्ठलाची भेट झाली, त्यावेळीं भानु-दासांनीं पुढील अभंग म्हटला, असें महिपतींनी लिहिलें आहेः—

१

चंद्रभागेतीरीं उभा विटेवरी । विठो राज्य करी पंढरीचें ॥ १ ॥
ऋद्धिसिद्धी वोळंगती परिवार । न लाहाती अवसर ब्रह्मादिकां ॥ २ ॥
सांडूनि इतुकें येथें बिजे केलें । कवणें चाळाविलें कानडिया ॥ ३ ॥
शंख भेरी मृदंग वाजती काहळा । उपवड राऊळा होत असे ॥ ४ ॥

चांपेल मार्जन सुगंधचर्चन । भिंवरा चंदनपाट वाहे ॥ ५ ॥
रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनिका । कामिनी अनेका येती सर्वे ॥ ६ ॥
कनकाचे पर्यकीं रत्नाचे दीपक । सुंदर श्रीमुख वोवाळिती ॥ ७ ॥
रखुमाई आई ते जाहली उदास । पुंडलिका कैसें पडिलें मौन ॥ ८ ॥
भक्त भागवत सकळ पां रूसले । निःशब्दचि ठेले तुजवीण ॥ ९ ॥
धन्य पंढरपुर विश्वाचें माहेर । धन्य भीमातीर वाळुवंट ॥ १० ॥
भानुदास म्हणे चालें आम्हांसवें । वाचाकृण देवें आठवावें ॥ ११ ॥

शूळारोपणाचे वेळीं म्हटलेला अभंगः—

२

जें आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये ॥
वडवानळ त्रिभुवन खाये । परि मी तुझीच वास पाहें गा विठोबा ॥ १ ॥
न करीं आणिकांचा पांगिला । नामधारक तुझाची अंकिला ॥ ध्रु० ॥
सप्तहि समुद्र  समरस होती । जै हे विरुनी जाय क्षिती ॥
पंचभूतें प्रळय पावती । तरि मी तुझाचि सांगाती गा विठोबा ॥ २ ॥
भलतैसें जड पडो भारी । नाम न संडों निर्धारीं ॥
जैशी पतिव्रता प्राणेश्वरी । भानुदास म्हणे अवधारी गा विठोबा ॥ ३ ॥

देवासंबंधानें ज्याची इतकी उत्कट भक्ति, त्याच्यासाठीं देवानें जें काय केलें तें थोडेंच होतें असें म्हणण्यास काय हरकत आहे ?

३

इहीं श्रवणीं तुझें गुणनाम ऐकेन । इहीं चरणीं तीर्थपंथें चालेन ॥
नाशिवंत देह कवणिये काजा । ऐशी प्रेमभक्ति देईं बा सहजा ॥ १ ॥
अखंड तुझें नाम उच्चारीं । तेणें संसारीं होये उजरीं ॥ ध्रु० ॥
शालिग्राम तीर्थ करीन आंघोळी । हरिदासाचे चरणरज लावीन कपाळीं ॥
कंठ मंडित तुळसीमाळीं । तनुमनुप्राणें तुमतें वोवाळीं ॥ २ ॥
उदरव्यथेलागीं मी न करीं धंदा । उच्छिष्टप्रसादें हरावी हे क्षुधा ॥
आपुली स्तुति आणि परावी निंदा । हीं दोन्ही आतळों नेदीं गोविंदा ॥ ३ ॥
सर्वांभूतीं रामा तुमतेंचि देखें । तुमचेनि प्रसादें सदा संतोषें ॥
देवा भानुदास मागे इतुकें । चाड नाहीं आम्हां वैकुंठलोकें ॥ ४ ॥

४

परदेशींचा वस्तु पंढरीसी आली । ती दैवें फावली पुंडलिका ॥ १ ॥
देतां घेतां लाभ बहुतांसि जाहला । विसावा जोडला पांडुरंग ॥ २ ॥
न करितां सायास वस्तूचि आइती । वैष्णवीं बहुतीं वेंटाळिली ॥ ३ ॥
भानुदासस्वामी कृपेचा सागरू । विठ्ठल कल्पतरु वोळला आम्हां ॥ ४ ॥

५

जैसा उपनिषदाचा गाभा । तैसा विटेवरी उभा ।
अंगींचीया दिव्य प्रभा । धवळलें विश्व ॥ १ ॥
उगवतीया सुरुज्या । नवरत्नें बांधूं पूजा ।
मुकुटीं भाव पैं दुजा । उपमा नाहीं ॥ २ ॥
दोन्ही कर कटीं तटीं । पीतांबर माळगांठी ।
शोभे वैजयंती कंठीं । कौस्तुभ झळके ॥ ३ ॥
कल्पद्रुम छत्राकार । तळीं त्रिभंगी बिढार ।
वेणु वाजवी मधुर । श्रुति अनुरागें ॥ ४ ॥
वेणूचेनी गोडपणें । पवनु पांगुळला तेणें ।
तोही निवे एके गुणें । अमृतधारीं ॥ ५ ॥
अहो लेणियाचें लेणें । नादसुखासी पै पेणें ।
विश्व प्रबोधिलें येणें । गोपवेषें ॥ ६ ॥
पुंडलिकाचे भावें । श्रीविठ्ठल येणें नांवें ॥
भानुदास म्हणे दैवें । जोडला आम्हां ॥ ७ ॥

६

न मागतां कांहीं न करितां सेवा । आलासी गा देवा पंढरीये ॥ १ ॥
तूं मायबाप विश्वासी तारक । तुवां पुंडलिक सुखी केला ॥ २ ॥
चारितां गोधनें आलास बा पायां । पुंडलिक कांहीं न बोलेची ॥ ३ ॥
चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम जाहलें॥४॥

७

उद्भवला ॐकार त्रिमातृकांसहित । अर्ध मातृकेपरतें प्रणवबीज ॥ १ ॥
माया महत्तत्त्व जाहले तिन्ही गुण । चौं देहांची खूण वोळखावी ॥ २ ॥
अंतःकरणीं जाहला तत्त्वांचा प्रसव । पंचतत्त्वें सर्व रूपा आलीं ॥ ३ ॥
पांचही गुण जाहले पंचवीस । पारे भानुदास वेगळाची ॥ ४ ॥

८

अवतारादिक जाहाले कर्मभूमी आले । विश्वजनीं देखिले आपुले डोळां ॥१॥
देखिल्या स्वरूप नुद्धरे काय जन । तें काय म्हणोन सांगों स्वामी ॥२॥
उद्धरत काय नाहीं आत्मज्ञान । देखिलें तें जाण सर्व वाव ॥ ३ ॥
वाव म्हणो तरी कोंदलें स्वरूप । लाविलीया माप मोजवेना ॥ ४ ॥
देखत देखत वेडावलें मन । रूप डोळेंवीण पाहूं जातां ॥ ५ ॥
भानुदास म्हणे सद्गुरूच्या लोभें । आहेचि तें उभें वीटेवरी ॥ ६ ॥

९

अवघ्या सोडीयल्या मोटा । आजींचा दहींकाला गोमटा ॥ १ ॥
घ्यारे घ्यारे दहींभात । आम्हां देतो पंढरिनाथ ॥ २ ॥
मुदा घेऊनियां करीं । पेंधा वाटितो शिदोरी ॥ ३ ॥
भानुदास गीतीं गात । प्रसाद देतो पंढरिनाथ ॥ ४ ॥

१०

गुढीयेसी सांगूं आले । कंसचाणूर मर्दिले ॥ १ ॥
हर्षे नाचताती भोजें । जिंकियेलें यादवराजें ॥ २ ॥
गुढी आली वृंदावना । मथुरा दिली उग्रसेना ॥ ३ ॥
झाला त्रिभुवनीं उल्हास । ललित गाय भानुदास ॥ ४ ॥

---

# सेना न्हावी.

जो भक्तिसरित्पूरीं षडरींची सर्व वाहवी सेना ।
रुचला मनास बहुतचि, तो भगवद्भक्त नाहवी सेना ॥१॥

**सन्मणिमाला, मोरोपंत.**

ह्या प्रसिद्ध सत्पुरुषाची कथा महिपतींनीं आपल्या भक्तविजयाच्या ३४ व्या अध्यायांत वर्णिली आहे. सेना न्हाव्याचा काल निश्चित करण्यास मुख्य साधन म्हटलें म्हणजे त्यांचे स्वतःचे अभंग होत. त्यांत त्यांनीं ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान व मुक्ताबाई यांचा

ठिकठिकाणीं उल्लेख केला आहे; त्यावरून असें दिसतें कीं, वरील चारी भावंडें समाधिस्थ झाल्यावर सेना न्हावी होऊन गेले. शालिवाहन शकाच्या १३ व्या शतकाच्या उत्तरार्धांत ते विद्यमान होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सेना न्हावी यांस हरिभजनाचा फार छंद असे. ते एका बादशहाचे आश्रित होते, असें महिपतींनीं लिहिलें आहे. नाभाजीकृत भक्तमाला ग्रंथांत सेना न्हावी बांधोगडच्या राजाचे आश्रित होते, असें म्हटलें आहे. असो. एके दिवशीं ते स्नान करून देवपूजा करण्यांत गुंतले असतां बादशहाची हजामत करण्यासाठीं त्यांस तीन चार बोलावणीं आलीं, व प्रत्येक खेपेस, सेना घरांत नाहीं, असें त्यांच्या बायकोनें सांगितलें; परंतु, त्यांच्या एका दुष्ट शेजाऱ्यानें राजवाड्यांत जाऊन, सेना घरांत नाहीं, असें त्याच्या बायकोनें सांगितलें तें खोटें आहे, असें बादशहास कळविलें. बादशहा अत्यंत क्रोधायमान झाला. ‘ सेना न्हाव्याची मोट बांधून त्यास नदींत फेंकून द्या. ’ अशी त्यानें आपल्या सेवकांस आज्ञा केली. आपल्या भक्तावर हा भयंकर प्रसंग गुदरलेला पाहून, भगवंतानें सेना न्हाव्याचें रूप धारण करून बादशहास मुजरा केला व मोठ्या कुशलतेनें त्याची श्मश्रु करून त्यास खुष केलें. सेना न्हाव्याच्या रूपानें आलेल्या पांडुरंगास पहातांच, बादशहाचा सगळा राग निघून जाऊन तो अगदीं शांत झाला. श्मश्रू करीत असतां भगवंतानें आपली श्यामसुंदर चतुर्भुज मूर्ति बादशहास दाखविल्यामुळें, त्यास एक प्रकारचा मोह पडल्यासारखा झाला. तो सेना न्हाव्यास घरीं जाऊं देईना ! श्मश्रूसाठीं ठेवलेल्या मोगरेल तेलाच्या वाटींत देवाचें मनोहर ध्यान दिसावें, व बाहेर पहावें तों सेना न्हावी दृष्टीस पडावा; असा प्रकार झाल्यामुळें बादशहा मोठ्या बुचकळ्यांत पडला. शेवटीं, बादशहानें त्यास ओंजळभर होन दिले व त्याचा निरोप घेतला.

देवानें ते होन धोकटींत घालून, ती धोकटी सेना न्हाव्याच्या घरांत नेऊन ठेविली व आपण गुप्त झाला.

दोन प्रहरीं, बादशहानें सेना न्हाव्यास पुनः बोलावणें पाठविलें. सेना बादशहाकडे गेल्यावर, बादशहानें ती सकाळची तेलाची वाटी आणवून, तींत तें चतुर्भुज रूप दाखविण्यास त्यांस सांगितलें. बादशहाचें भाषण ऐकून सेना न्हावी विस्मित झाले. प्रातःकाळीं दिसलेलें रूप दोन प्रहरीं दिसेना. मग बादशहाच्या मुखानें प्रातःकाळची हकीकत ऐकतांच, हा आपल्या रूपानें देवच आला होता, हें सेना न्हावी यांच्या तत्काल लक्ष्यात आलें. त्यांनीं मुक्त कंठानें देवाची स्तुति केली. त्यांनीं आपल्या धोकटींत पाहिलें, तों होन दृष्टीस पडले; ते तेथल्या तेथें त्यांनीं ब्राह्मणांस देऊन टाकिले. त्या दिवसापासून बादशहाही विरक्त होऊन ईश्वरभक्ति करूं लागला. महिपतींनीं दिलेली सेना न्हाव्याची कथा येथें संपली. श्रावण वद्य द्वादशीस आपण समाधिस्थ झालों, असें पुढील अभंगांत सेना न्हावी यांनीं सांगितलें आहे; पण स्वतःचा समाधिशक त्यांनीं दिलेला नाहीं:—

१

स्वहिताकारणें सांगतसें तुज । अंतरींचें गुज होतें कांहीं ॥ १ ॥
करा हरिभजन तराल भवसागर । उतरील पार पांडुरंग ॥ २ ॥
कृपा नारायणें केली मजवरी । तुम्हांलागीं हरी विसंबेना ॥ ३ ॥
**सेना सांगोनियां जातो वैकुंठासी ।**
**तिथी पैं द्वादशी श्रावणमास ॥ ४ ॥**

२

माझें जाहलें स्वहित । तुम्हां सांगतों निश्चित ॥ १ ॥
करा हरीचें चिंतन । गावे उत्तम हे गुण ॥ २ ॥
व्रत एकादशी । भजन करा अहर्निशीं ॥ ३ ॥
**श्रावण वद्य द्वादशी । सेना बैसे समाधीसी ॥ ४ ॥**

सेना न्हावी यांचे थोडेसे—सुमारें १५० अभंग मात्र प्रसिद्ध आहेत. ज्यांचें सगळें आयुष्य हरिगुणगायनांत गेलें, त्यांनीं इतकीच कविता रचिली असेल, हें असंभवनीय होय. परंतु कालाच्या भयंकर उदरांत त्यांची बहुतेक कविता गडप होऊन गेली आहे. सेना न्हावी यांची उपलब्ध असलेली कविता 'सन्मणिमाला कवितासंग्रह' व 'सर्वसंग्रह गाथा' या ग्रंथांत दिली आहे, ती वाचकांनीं अवश्य पहावी. त्यांच्या कवितेवर अभिप्राय देण्याचा अधिकार माझा नाहीं; ती कविता आमच्या इतर जुन्या साधुसंतांच्या कवितेइतकीच प्रसादपूर्ण आहे, एवढेंच मी सांगतों. सेना न्हावी हे सुमारें ६०० वर्षांपूर्वी होऊन गेले असतां, त्यांच्या अभंगांची भाषा अतिशय सोपी व सरळ आहे, हें पाहून मोठें आश्चर्य वाटतें. ज्ञानदेवांचे ग्रंथ व त्यांच्या भावंडांचे कांहीं अभंग शिवायकरून, तत्कालीन इतर कर्त्यांची कविताही अशीच सुलभ आणि सरळ आहे. शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकांतले कवि नामदेव, चोखामेळा, जनी, परिसाभागवत, सावंतामाळी, गोराकुंभार, भानुदास, जगमित्र नागा, नरहरि सोनार, विसोबा खेचर व नामदेवाच्या कुटुंबांतली मंडळी यांच्या अभंगांची भाषा व त्याच शकाच्या सोळाव्या शतकांतले कवि तुकाराम, निळोबा, कान्होबा यांच्या अभंगांची भाषा, यांत सौलभ्याच्या दृष्टीनें फारसें अंतर दिसत नाहीं, हें कबूल करणें भाग आहे; मग त्याचें कारण काय असेल तें असो.

सेना न्हावी यांची, ज्ञानदेव व त्यांचीं भांवडें यांच्यासंबंधानें अत्यंत पूज्यबुद्धि होती. त्यांपैकीं प्रत्येकाच्या समाधीचें त्यांनीं दर्शन घेतलें होतें. सेना यांचे कांहीं निवडक अभंग येथें देतों:—

१

श्रीगुरु निवृत्तिनाथें सांप्रदाय दाविला ।
अळंकापुरनिवासी अधिकार तया दिधला ॥ १ ॥

आदिनाथें मूळ गुप्त होतें ठेविलें ।
निवृत्तिकृपेनें ज्ञानदेवे प्रगट केलें ॥ २ ॥
बुडतां भवसागरीं जग काढिलें बाहेरी ।
दावियेला तारू विठ्ठल त्रि-अक्षरी ॥ ३ ॥
विटेवरी उभा वैकुंठींचा राणा ।
दाविली खूण म्हणे नाहावियाचा सेना ॥ ४ ॥

२

वाचे म्हणतां निवृत्ति । अवघी निरसली भ्रांती ॥ १ ॥
हें तों माझ्या अनुभवा । आलें जीवा प्रत्यया ॥ २ ॥
गुंतलों होतों मोह आशा । स्मरणें नाशा पावलों ॥ ३ ॥
ऐसा अनुभव नामाचा । सेना न्हावी स्मरे वाचा ॥ ४ ॥

३

महा विष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
चला चला अळंकापुरा । संत सज्जनाच्या माहेरा ॥ २ ॥
करितां स्नान इंद्रायणी । मुक्ती लागती चरणीं ॥ ३ ॥
ज्ञानदेवाचे चरणीं । सेना आला लोटांगणीं ॥ ४ ॥

४

सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार ॥ १ ॥
तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ २ ॥
पुढें शोभे कैलासराणा । मागें गंगा ओघ जाणा ॥ ३ ॥
सेना घाली लोटांगण । वंदी निवृत्तीचे चरण ॥ ४ ॥

ह्या अभंगांत त्र्यंबकेश्वरीं निवृत्तिनाथांची समाधि आहे, त्या स्थळाचें वर्णन केलें आहे. 'तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ' हा चरण, तुकारामाचा दत्तात्रयावर एक अभंग आहे, त्यांतील एका चरणाशीं अगदीं सारखा आहे. प्रस्तावनेंत सांगितल्याप्रमाणें आमच्या जुन्या साधुसंतांच्या कवितेंत शब्द व विचारसादृश्यामुळें आणि लेखकप्रमादानें बराच घोटाळा झालेला आढळतो. नाम-

देवाचे कांहीं अभंग तुकारामाच्या गाथ्यांत सांपडतात. परंतु या प्रकरणाचा अगदीं समाधानकारक रीतीनें निकाल लावणें आतां जवळ जवळ अशक्यच झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

५

सिद्धांमाजी अग्रगणी । भोळा तो हा शूळपाणी ॥ १ ॥
धन्य धन्य त्र्यंबक राजा । तया नमस्कार माझा ॥ २ ॥
जटीं गंगा वाहे । त्रिगुणात्मक तो पाहें ॥ ३ ॥
भोवतीं वेढा ब्रह्मगिरी । मध्यें शोभे त्रिपुरारी ॥ ४ ॥
सेना घाली लोटांगण । उभा राहे कर जोडोन ॥ ५ ॥

६

स्मरतां निवृत्ति । अलभ्य लाभ आतुडे हातीं ॥ १ ॥
ज्ञानदेव म्हणतां वाचे । तया पेणें वैकुंठींचें ॥ २ ॥
स्मरण करितां सोपाना । मुक्ती वंदिती चरणा ॥ ३ ॥
मुक्ताबाई वाचे म्हणतां । तुटे संसाराची वार्ता ॥ ४ ॥
घ्या रे अनुभव नामाचा । सेना न्हावी स्मरे वाचा ॥ ५ ॥

७

अलंकापुर निवासिनी । ज्ञानाबाई मायबहिणी ॥ १ ॥
आम्हां लेंकुरांची चिंता । वागवावी कृपावंता ॥ २ ॥
मी तों आहें यातीहीन । माझा राखा अभिमान ॥ ३ ॥
करुनी दिनवाणी । सेना लागतो चरणीं ॥ ४ ॥

ज्ञानदेवांवर सेना न्हावी यांचे बरेच अभंग आहेत, व ते सगळे आळंदी येथें ज्ञानदेवांच्या समाधीपाशीं बसून रचले असावेत, असें वाटतें. ज्ञानदेवांचा जो संप्रदाय तोच आपलाही संप्रदाय, असें सेना न्हावी यांनीं म्हटलें आहे, यावरून ते नाथ सांप्रदायी होते, हें उघड दिसतें. सेनाच्या अभंगांत ज्ञानदेव व त्यांचीं भावंडें यांच्याशिवाय, तत्कालीन साधुसंतांचा बिलकुल उल्लेख आढळत नाहीं; कदाचित् ते अभंग गहाळ झाले असतील.

८

वाचे सोपान म्हणतां । चुके जन्ममरण वार्ता ॥ १ ॥
वस्ती केली कऱ्हा तीरीं । पुढें शोभे त्रिपुरारी ॥ २
सोपानदेव सोपानदेव । नाहीं भेव काळाचें ॥ ३ ॥
सोपानचरणी ठेवुनि माथा । सेना होय विनविता ॥ ४ ॥

हा अभंग सासवड येथें सोपानदेवांच्या समाधिदर्शनास सेना न्हावी गेले होते, त्या वेळीं त्यांनीं रचला असावा.

९

आजी सोनियाचा दिवस । दृष्टीं देखिलें संतांस ॥ १ ॥
जीवा सुख थोर जाहले । माझे माहेर भेटले ॥ २ ॥
अवघा निरसला शीण । संतचरण देखतां ॥ ३ ॥
आजी दिवाळी दसरा । सेना म्हणे आले घरा ॥ ४ ॥

१०

ही माझी मिरासी । पांडुरंग पायापाशीं ॥ १ ॥
करीन आपुलें जतन । वागवितों अभिमान ॥ २ ॥
जुनाट जुगादीचें । वडिली साधियेले साचें ॥ ३ ॥
सेना म्हणे कमळापती । पुरातन ही माझी भक्ती ॥ ४ ॥

११

चिंतन चित्ताला । लावीं मनाचें मनाला ॥ १ ॥
उन्मनीच्या सुखाआंत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥
ऐसा आहे श्रेष्ठाचार । वेदशास्त्रींचा निर्धार ॥ ३ ॥
कौटाळुनी पोटीं । सेना म्हणे सांगूं गोष्टी ॥ ४ ॥

१२

तुम्ही संत कृपानिधी । सांभाळावा हा दुर्बुद्धी ॥ १ ॥
तुम्हा आहें शरणागत । तरी तारावा पतित ॥ २ ॥
अधिकार नाही । न कळे भक्तिभाव तोही ॥ ३ ॥
वागवा अभिमान । सेना न्हावी यातीहीन ॥ ४ ॥

१३

जन्मासी येवोनी पहा रे पंढरी । नाचा महाद्वारीं देवापुढें ॥ १ ॥
चंद्रभागेतीरीं करा रे स्नान । घ्या रे दरशन पुंडलिकाचें ॥ २ ॥
सेना म्हणे माझा पुरलासे हेत । दृष्टी भरुनी पहात विठोबासी ॥ ३ ॥

१४

पुण्यभूमी येथें उभा पांडुरंग । दोषाचा विभाग नाहीं कोणा ॥ १ ॥
ऐसियाचे पाय जाऊनियां धरा । चुकतसे फेरा चौऱ्याशींचा ॥ २ ॥
सेना म्हणे धन्य विठोबाचे दरुशनें । तुटली बंधनें बहुतांचीं ॥ ३ ॥

१५

नाम हें अमृत भक्तासी दिधलें । ठेवणें ठेविलें होतें गुप्त ॥ १ ॥
प्रत्यक्ष अवतार धरिला अलंकापुरीं । मार्ग हा निर्धारीं दाखविला ॥ २ ॥
कृतयुगामाजीं वसिष्ठ जाणता । नाम जपती तत्त्वतां नारदादि ॥ ३ ॥
कलियुगामाजी न घडे साधन । जातील बुडोन महाडोहीं ॥ ४ ॥
रामकृष्णहरि गोविंद गोपाळ । स्मरा वेळोवेळ सेना म्हणे ॥ ५ ॥

---

## कान्हूपात्रा.

कान्हूपात्रा श्रीमद्विठ्ठलरूपीं समानता पावे ।
तापत्रयें जन यशा या पिउनि अमृतसमा न तापावे ॥ १ ॥

**सन्मणिमाला—मोरोपंत.**

रा० रा० विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं कान्हूपात्रेचा काल शके १३९० हा दिला आहे व तो बरोबर असावा असें वाटतें. पंढरपुरापासून सुमारें सात कोसांवर मंगळवेढें म्हणून एक गांव आहे, तेथें शामा नामक एक वेश्या राहत होती, तिची कन्या कान्हूपात्रा होय. प्रसिद्ध सत्पुरुष दामाजीपंत व चोखामेळा, हे मंगळवेढें तेथेंच होऊन गेले. कान्होपात्रा रूपानें इतकी सुंदर होती कीं, तिच्या इतकी सुंदर स्त्री त्यावेळीं त्या

प्रांतांत दुसरी नव्हती. तिच्या मातेनें एके दिवशीं तिला म्हटलें कीं, आपण राजवाड्यांत जाऊन राजाची भेट घेऊं. तूं चांगली सुंदर आहेस; राजा तुला पुष्कळ द्रव्य देईल. कान्हूपात्रा म्हणाली, ‘ आई गे, माझ्या योग्य असा पुरुष कोणी दिसत नाहीं, हें तूं जाणतच आहेस. माझ्याहून जो पुरुष रूपवान् असेल, त्यालाच मी वरीन ’

पुढें एके दिवशीं, मंगळवेढ्यांतून वारकरी लोक टाळमृदंग वाजवीत व भजन करीत पंढरपुरास चालले होते. कान्होपात्रेनें त्या संतांस नमस्कार केला व ‘तुम्ही कोठें जात आहां?’ म्हणून विचारलें. ‘ आम्हीं पंढरपुरास जातों ’ असें संतांनीं सांगितलें. तिची भाविक व प्रेमळ वृत्ति पाहून, त्यांनीं तिजपाशीं श्रीविठ्ठलाचे पुष्कळ गुणानुवाद गायिले. कान्होपात्रेस वाटलें कीं आपणही पंढरपुरास जावें. ती वारकऱ्यांस म्हणाली, ‘ मी पंढरपुरास आल्यें, तर पंढरिनाथ माझा अंगीकार करील काय?’ संत म्हणाले, ‘पांडुरंग भक्तीचा भुकेला आहे, तो तुझा अंगीकार खचित करील.’ मग आपल्या मातेची आज्ञा घेऊन कान्होपात्रा पंढरपुरास गेली आणि महाद्वारीं बसून पांडुरंगाची स्तुति करूं लागली. ती म्हणाली, ‘ देवा! तुझी विमल कीर्ति श्रवण करून, मी तुला शरण आल्यें आहें, मला पदरीं घे. ’ असें म्हणून तिनें भगवंताच्या चरणीं मस्तक ठेविलें. पुढें ती पंढरीसच राहिली. नित्य पांडुरंगाचें दर्शन घेऊन त्याच्या भजनपूजनांत आपलें आयुष्य घालविण्याचा तिनें निश्चय केला व तो शेवटपर्यंत पाळिला.

एके दिवशीं, कोणी गृहस्थानें बेदरच्या बादशहाजवळ कान्होपात्रेच्या सौंदर्याची अतिशय तारीफ केली. तेव्हां, तिला बेदरास आणण्यासाठीं बादशहानें आपले शिपाई पाठविले. ते पंढरपुराजवळ येऊन दाखल झाले तेव्हां ती हकीकत कान्होपात्रेस समजली.

त्यावेळीं तिनें पांडुरंगाचा धावा केला. इतक्यांत बादशहाचे शिपाई महाद्वारीं येऊन, त्यांनीं बादशहाचा निरोप कान्होपात्रेस सांगितला. ते म्हणाले 'तूं जर सुखासमाधानानें येत नसलीस, तर तुला जबरदस्तीनें बेदरास आणण्याचा बादशहानें आम्हांस हुकूम केला आहे.' कान्होपात्रा त्यांस म्हणाली, 'ठीक आहे, तुम्ही येथेंच असा. मी आंत जाऊन भगवंताचा निरोप घेऊन येत्यें.' मग कान्होपात्रा पांडुरंगाजवळ गेली व हात जोडून तिनें प्रार्थना केली:—

## अभंग.

१

पुरविली पाठ न सोडी खळ । अधम चांडाळ पापराशी ॥ १ ॥
वारितां नायके दुष्ट दुराचार । काय करूं विचार पांडुरंगे ॥ २ ॥
तूं माय माउली जगाची जननी । म्हणवोनी मिठी चरणीं घालीतसें ॥३॥
विनवी कान्होपात्रा जोडोनियां हात । आतां देह अंतसमय आला ॥४॥

२

आपुल्या निढळीं लिहिलीं अक्षरे । तुम्हां खाटें खरें कोण म्हणे ॥ १ ॥
वायांच म्यां देवा धरिली आवडी । न पावे जोडी कांहीं केल्या ॥ २ ॥
आतां पंढरिनाथा नका पाहूं अंत । आला तो आघात निवारावा ॥ ३ ॥
म्हणोनि कान्होपात्रा येत लोटांगणीं । वारंवार विनवणी करीतसें ॥ ४॥

३

संचित माझें खोटें मज असे ग्वाही । तुझा बोल नाहीं देवराया ॥ १ ॥
मानिला भरंवसा परी जाहली निरास । आतां पाहूं वास कवणाची ॥ २ ॥
लागला तो पाठीं काळाचा दरारा । सोडवी दुसरा ऐसा कोण ॥ ३ ॥
तुझें म्हणविल्या शरण जाऊं कोणा । कान्होपात्रा म्हणे मना आणीं देवा ॥ ४॥

४

अखंड वासना तुमचे ते पाय । दिन निशीं राहे हृदयांत ॥ १ ॥
हेचि माझी आस हेचि माझें मागणें । नको दुजें पेणें विठाबाई ॥ २ ॥
तुजवांचोनियां दुजा नको ठाव । भाकीतसें कींव विठाबाई ॥ ३ ॥
म्हणे पात्रा कान्होपात्रा पंढरीनिवासा । सोडवीं हा फांसा पडिला गळां ॥४॥

५

नको देवराया अंत पाहूं आतां । प्राण हा सर्वथा फुटों पाहे ॥ १ ॥
हरिणीचें पाडस व्याघ्रें धरियेलें । मजलागीं जाहलें तैसें देवा ॥ २ ॥
तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं । धांवें वो जननी विठाबाई ॥ ३ ॥
मोकलोनी आस जाहलें मी उदास । घेई कान्होपात्रेस हृदयांत ॥ ४ ॥

ही कान्हूपात्रेची प्रार्थना देवानें तत्काल मान्य केली. तिचे प्राण भगवंतानें आपल्या स्वरूपांत मिळवून टाकिले. साधुसंतांनीं त्या साध्वीचें प्रेत देवालयाच्या दक्षिणद्वारीं नेऊन पुरलें; त्या ठिकाणीं तरटीचा वृक्ष उगवला, तो पंढरपुरीं अद्याप दृष्टीस पडतो

इकडे बादशहाचे शिपाई महाद्वारीं बसले होते, त्यांनीं कान्हूपात्रा अद्याप येत नाहीं असें पाहून, ती आंत काय करीत आहे म्हणून पुजाऱ्यांस विचारलें. झालेली हकीकत पुजाऱ्यांनीं त्यांस निवेदन केली; पण ती त्या शिपायांस खरी वाटली नाहीं. मग, त्यांनीं त्या बिचाऱ्या पुजाऱ्यांवर कान्होपात्रेस पळविल्याचा आरोप ठेवून, त्यांस बेदर येथें बादशहापाशीं नेऊन उभें केलें. पुजाऱ्यांनीं नारळ, बुका वगैरे प्रसाद बादशहापुढें ठेविला. बादशहानें प्रसाद घेतला, तों त्यांत एक केंस निघाला. हा प्रकार पाहून बादशहास मोठा क्रोध आला. ‘ केंस देवाचा आहे, ’ असें पुजाऱ्यांनीं त्यास सांगितलें व ‘ हें खोटें ठरल्यास आम्हांस वाटल ती शिक्षा करा ’ असेंही ते म्हणाले. मग एकंदर प्रकरणाचा खुलासा करून घेण्यासाठीं बादशहा स्वतः पंढरपुरास गेला. पांडुरंग कसेंही करून आपलें रक्षण करील, या भावनेनें पुजारीही स्वस्थ राहिले.

बादशहा पंढरपुरीं आल्यावर त्यानें जेव्हां श्रीपांडुरंगाचें तें मनोहर ध्यान पाहिलें, तेव्हां त्याच्या मनांतला सगळा संशय फिटून, तो फार संतोष पावला. त्यानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला

व त्या पूजाऱ्यांस आलिंगन दिलें. असो. याप्रमाणें कान्हूपात्रा आपल्या निस्सीम भक्तीच्या योगानें स्वानंदपद पावली.

कान्होपात्रेचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं पांच अभंग पूर्वीं दिलेच आहेत; आणखी थोडे अभंग देऊन हा लेख पूर्ण करूं.

१

देहींचीये आशा विठ्ठलाचे पाय । आणिक न गमे माय दुजा हेत ॥ १ ॥
येई वो विठ्ठले येई वो विठ्ठले । कृपेने वहिलें आलिंगावें ॥ २ ॥
निर्दय पामर बोलताती फार । न कळे विचार तुझा देवा ॥ ३ ॥
म्हणे कान्होपात्रा पंढरीच्या राया । धांवण्या सखया धांव वेगीं ॥ ४ ॥

२

पतितपावन ब्रीद बांधिलें आधीं । तरी कां उपाधी भक्तापाठीं ॥ १ ॥
तुझें म्हणविल्या दुजा अंगसंग । उणेंपण सांग कोणाकडे ॥ २ ॥
सिंहाचें भातुकें जंबुकें नेतां । थोराचिये माथां लाज लागे ॥ ३ ॥
कान्होपात्रेचा देह तंव जाण । रक्षावा आपण ब्रीदासाठीं ॥ ४ ॥

३

दंभ प्रपंच भजिन्नलें तुमतें । आमुतें पंढरीनाथें न विसरीजे ॥ १ ॥
ज्ञान वैराग्यें भजिन्नलें तुमतें । आमुतें पंढरिनाथें न विसरिजे ॥ २ ॥
विनवी कान्होपात्रा पंढरीरायातें । आमुतें पंढरीनाथें न विसरिजे ॥ ३ ॥

४

शांति आणि क्षमा हे तुमचे उपाय । दंभ प्रपंच भय निवारावें ॥ १ ॥
ज्ञान वैराग्य श्रद्धायुक्त हें भजन । हेंचि मज प्रमाण देई देवा ॥ २ ॥
विनवी कान्होपात्रा अहो दीनानाथा । चरणीं असो माथा सर्व काळ ॥ ३ ॥

५

नलगे भुक्तिमुक्ति नलगे स्वर्गवास । नको जाणें वैकुंठास देवराया ॥ १ ॥
न लगे योग याग अष्टांग साधन । न चुके बंधन येणें कांहीं ॥ २ ॥
न लगे इष्ट-मित्र सोईरे संबंधी । नको हे उपाधी पाठीं लावूं ॥ ३ ॥
कान्होपात्रा म्हणे विठोबा दयाळा । दे गा प्रेमकळा नाम तुझें ॥ ४ ॥

६

द्रौपदी संकट पडतां जडभारी । धांवसी सत्वरीं देवराया ॥ १ ॥
तैसें मज करीं कृपेचें धावणें । सोडवीं वचनें अभयाच्या ॥ २ ॥
तिही लोकीं ब्रीद गाजतसे देवा । अव्हेरिता केशवा लाज कोणा ॥ ३ ॥
म्हणे कान्होपात्रा अहो कृपानिधि । तोडीं हे उपाधी लिगाडाची ॥ ४ ॥

७

जगाच्या कैवारा । कैसा धांवसी तूं त्वरा ॥ १ ॥
अबऋषीसाठीं । गर्भवास तुज जगजेठी ॥ २ ॥
अर्जुनाकारणें । सारथीपणा येथें करणें ॥ ३ ॥
वरुषतां जळधर । उचलीला गिरीवर ॥ ४ ॥
ऐसा भक्ताचा अंकिला । अंकित अंकिलाचे ठेला ॥ ५ ॥
ही एकोनियां मात । कान्होपात्रा हृदयीं ध्यात ॥ ६ ॥

८

तूं उदार म्हणुनी भाकीतसें कींव । सोडवीं हा जीव पाशांतुनी ॥ १ ॥
गुंतलासे मीन लिगाडाचे गळीं । तैसा तळमळी देह माझा ॥ २ ॥
आशा मनशा तृष्णा तोडीं यांचे जाळें । काढीं उतावेळें कडिये मज ॥ ३ ॥
तुझाचि भरंवसा जगीं हा विख्यात । बुडतें भवडोहांत विठाबाई ॥ ४ ॥
सर्वभावें तुज आले मी शरण । कान्होपात्रेचें निर्वाण पाहूं नका ॥ ५ ॥



# जगमित्र नागा.

'जगमैत्र नागा ऐका कथा त्याची ।
मैत्री ज्याची साची भूतमात्रीं ॥ '

भीमस्वामी रामदासी.

जगमित्र नागा हे एक मोठे सत्पुरुष ब्राह्मणी राज्यांत होऊन गेले. यांचें चरित्र महिपति व भीमस्वामी रामदासी यांनीं वर्णिलें आहे, पण यांचा कालनिर्देश त्यांनीं केला नाहीं. रा० राजवाडे यांनीं प्रस्तुत साधूचा काल शके १२५२ हा दिला आहे; पण तो बरोबर नाहीं असें वाटतें. कारण, जगमित्र हे परळी वैजनाथाचे रहिवासी, व त्यांच्या चरित्राचा मुसलमानी राज्याशीं संबंध आला असून, शके १२९२ ( इ० स० १३३० ) मध्यें परळी वैजनाथ हें ठिकाण मुसलमानी राज्यांत सामील झालें होतें, असें मानण्यास ऐतिहासिक पुरावा नाहीं. तेव्हां प्रस्तुत साधूचा काल, एकनाथ व तुकाराम यांच्या कालाच्या दरम्यानचा असावा, असें धरून चालणें मला अधिक प्रशस्त वाटतें. कदाचित् एकनाथस्वामीच्या पूर्वीं, सावंतामाळी, गोराकुमार, चोखामेळा इत्यादि जे संत होऊन गेले, त्या सर्वांत हे 'जगमित्र' वयानें कनिष्ठ होते, असेंही मानण्यास हरकत नाहीं. यांची जी थोडीशी कविता उपलब्ध आहे, तींत मुसलमानी शब्द फारसे आढळत नाहींत; पण एकंदर भाषा फारशी प्राचीन आहे, असेंही वाटत नाहीं. असो.

जगमित्र नागा हे परळी वैजनाथ येथें गांवांत भिक्षा मागून राहत असत. ते रात्रीच्या वेळीं कीर्तन करीत असत, तें ऐकण्यास लोकांची फार गर्दी होत असे. गांवांतले कित्येक लोक त्यांस वंदन करीत असत, कित्येक त्यांची निंदा करीत असत, पण ते तिकडे मुळींच

लक्ष्य देत नसत. एके दिवशी रात्रीं, जगमित्र आपल्या घरांत निद्रित असतां, कांहीं दुष्ट लाकांनीं त्यांच्या घरास आग लाविली ! एकदम मोठा उजेड झाल्यामुळें, जगमित्र जागृत होऊन पाहतात तों खोंपट जळत आहे ! त्यांचीं मुलेंमाणसें आंत निजलीं होतीं, तीं आतां सुरक्षित कशीं राहतात, या काळजीनें त्यांनीं पंढरिनाथाची आठवण केली. भगवंतानें तत्काळ प्रगट होऊन अग्नीपासून त्यांच्या कुटुंबाचें रक्षण केलें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ही बातमी सर्व गांवभर पसरली. जगमित्र नागासारख्या सत्पुरुषाचें घर जळालें, याबद्दल गांवांतल्या पुष्कळ लोकांस फार वाईट वाटून ते चौकशी करण्यासाठीं त्यांच्या घरीं आले. पण, खोपट वरच्यावर जळून गेलें, तरी आंतील माणसांस बिलकूल धोका पोंचला नसून, तीं आनंदानें भजन करीत बसलीं आहेत; असा देखावा पाहतांच लोक फार आश्चर्यचकित झाले. मग, जगमित्रांस नमस्कार करून ते म्हणाले, ‘ तुमच्या साधुत्वासंबंधानें आज आमची अगदीं पुरी खात्री झाली. ’ पुढें जगमित्रांस कांहीं जमीन इनाम करून द्यावी, असें ठरवून, त्यांनीं ती गोष्ट जगमित्रापाशीं काढली. तेव्हां ते म्हणाले, ‘ मला जमीन काय करावयाची आहे ? या गांवांत भिक्षा मागतों, तिजवर माझ्या कुटुंबाचा निर्वाह चालतो मग आणखी जमिनीच्या लोभांत मी कशास पडूं ? ’ जगमित्रांचें हें स्पष्टोत्तर ऐकून, त्यांच्यासंबंधानें लोकांची पूज्यबुद्धि वाढत चालली; पण त्यांस जमीन इनाम करून देण्याचा विचार त्यांनीं सोडून दिला नाहीं. ते जगमित्रांस म्हणाले, ‘ आम्ही तुमच्या नांवानें इनामपत्र लिहून देतों, मग जमिनीचें उत्पन्न कोणीही खावो ! ’ इतकें बोलून, लोकांनीं लागलीच सनद लिहून दिली, ती अशी कीं, ‘ परळी वैजनाथ या गांवीं एक चाहूर जमीन जगमित्र नागनाथ यांस इनाम दिली आहे. ’ इतकें झालें तरी जगमित्रांनीं

त्या जमिनींचा स्वीकार न केल्यामुळें, गांवांतील शेतकरी लोक त्या जमिनींत धान्य पिकवून तें जगमित्रांच्या नांवानें दानधर्माकडे खर्च करीत असत.

पुढें, परळी वैजनाथ येथें एक नवा हवालदार आला. तो यवन होता. त्यानें जगमित्रांची इनाम जमीन जप्त केली; त्यावेळीं 'धर्म-कार्याच्या आड तुम्हीं येऊं नका' असें गांवांतील लोकांनीं त्यांस सांगितलें; परंतु त्यानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. पुढें, एके दिवशीं, तो हवालदार जगमित्रांच्या घरीं जाऊन त्यांस म्हणाला, 'आमच्या घरीं लग्नांत देवप्रतिष्ठेस वाघाचें दैवत लागतें, तरी आज संध्या-काळपर्यंत वाघास घेऊन ये, नाहींतर जप्त केलेली इनाम जमीन खालसा करीन.' जगमित्रांनीं वाघ आणण्याचें कबूल करून ते अरण्यांत गेले व तेथें त्यांनीं परमेश्वराचा धांवा केला, 'हे पंढरिनाथा! हवाल-दाराच्या कन्येचें लग्न आहे, देवप्रतिष्ठेस त्याला वाघ लागत असतो, तो आणून देण्याचें मी त्यास वचन दिलें आहे; तर आतां तूं हें संकट निवारण कर.' जगमित्राचे हे शद्ब ऐकून भगवं-ताचें निसर्गकोमल हृदय द्रवलें. त्यानें वाघाचें स्वरूप धारण केलें व त्यास घेऊन जगमित्र गांवांत आले. एक भयंकर वाघ घेऊन जगमित्र चालले आहेत, हें पाहतांच गांवांतील लोकांची पांचावर धारण बसली. बायकापोरें भयानें लपून बसलीं व पुरुष वाट फुटेल तिकडे पळून गेले! कित्येकांनी हवालदाराच्या घरीं जाऊन त्याची कानउघाडणी केली कीं, तुझ्या दुष्टपणामुळें सगळा गांव मोठ्या संकटांत पडला आहे. याप्रमाणें गडबड चालू आहे, तोंच जगमित्र वेशीवर आले; पण गांवाच्या वेशी लोकांनीं पूर्वींच बंद केल्या होत्या यामुळें त्यांस प्रतिबंध झाला. हा प्रकार पाहतांच व्याघ्ररूपी भग-वंतानें एक मोठी डरकाळी फोडली, त्या बरोबर एकदम दरवाजे उघडले. हें पाहून बायकामुलांनीं रडून ओरडून एकच आकांत केला.

तेव्हां जगमित्रानीं सर्वांस अभय देऊन सांगितलें कीं, " ज्याचें कर्म तो भोगील, इतरांस भिण्याचें कारण नाहीं. तुम्हीं निर्भयपणें ईश्वराचें भजन करा."

मग, जगमित्र वाघास घेऊन हवालदाराकडे आले व त्यास हाक मारून म्हणाले, ' तुमचें दैवत मी घेऊन आलों आहें; हें आपल्या ताब्यांत घ्या. भयानें लपून बसूं नका. ' दुष्ट लोकांचा नाश करावा म्हणून व्याघ्र मोठमोठ्यानें डुरकण्या फोडीत होता, पण जगमित्रांनीं त्यास आपल्या ताब्यांत ठेविलें होतें. मग ' तुमच्या-मुळें सर्वांचा नाश होतो ' असें आपल्या स्त्रीचें भाषण ऐकून हवालदार बाहेर आला व हात जोडून, अन्यायाची क्षमा मागून ' जीवदान द्या ' अशी जगमित्रांस त्यानें विनंति केली. मग त्यास अभय देऊन, व्याघ्रासह जगमित्र रानांत निघून गेले. तेथें भगवंतानें श्यामसुंदर चतुर्भुजरूप धारण करून जगमित्रांस प्रेमालिंगन दिलें व त्यांचा निरोप घेतला. एकंदरींत, ' चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र ते न खाती सर्प तया ॥ ' ह्या तुकारामाच्या सिद्धांतरूप उक्तीची सत्यता जगमित्रांच्या चरित्रांत अगदीं स्पष्टपणें व्यक्त होत आहे.

वारकरी लोकांत जगमित्रांचे थोडेसे अभंग मात्र प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं दहा अभंग येथें देतों:––

१

भक्तासाठीं रूपें धरी । त्याचें काम अंगें करी ॥ १ ॥
आला पुंडलिकासाठीं । अकस्मात जगजेठी ॥ २ ॥
अनंत ब्रह्मांडें रचिलीं । नानापरी क्रीडा केली ॥ ३ ॥
हें तंव नकळे कोणासी । जगमित्र नागा ध्याय मानसीं ॥ ४ ॥

२

शुक-व्यासादिक भुलले । लीळा गातां वेडावले ॥ १ ॥
उपनिषद श्रुतिशास्त्रें । गातां शिणली स्तुतिस्तोत्रें ॥ २ ॥

तो हरिकीर्तनाचे रंगीं । नाचे देहभाव विसरुनि अंगीं ॥ ३ ॥
कीर्तनाची आवडी गाढी । जगमित्र नागा उभवी गुढी ॥ ४ ॥

३

सकळ भूषणाचें भूषण । कंठी धरा नारायण ॥ १ ॥
तेणें तुटती यातना । चुकती यमाच्या पतना ॥ २ ॥
शिव मस्तकीं धरिला । भेद भक्तांचा काढिला ॥ ३ ॥
अवघ्या देवांचें हें ध्यान । जगमित्र नागा वंदी चरण ॥ ४ ॥

४

हीच उपासना धरा । नरदेहीं सार्थक करा ॥ १ ॥
भक्ति देवाची करावी । भेददृष्टी हे सोडावी ॥ २ ॥
आत्मा आहे हा भूतात । भूतें आहेती आत्म्यांत ॥ ३ ॥
ऐसा धरा दृढभाव । जगमित्र नाग्याचा हा ठाव ॥ ४ ॥

५

भक्ताचिया काजा । रूप धरिलें सहजा ॥ १ ॥
वैजयंती कुंडल माळा । पीतांबर घनसावळा ॥ २ ॥
शंखचक्रपद्मगदा । कौस्तुभ शोभतसे गोविंदा ॥ ३ ॥
वस्त्रभूषण अलंकार । जगमित्र नाग्याचा दातार ॥ ४ ॥

६

कृष्ण लोणी खाया गेला । येउनि गोपीनें धरिला ॥ १ ॥
मायेपाशीं घेउनि आली । तेथें कृष्णा पाहती जाली ॥ २ ॥
येथे कृष्ण तेथें कृष्ण । जिकडे तिकडे अवघा कृष्ण ॥ ३ ॥
ऐसें आश्चर्य गे माये । जगमित्र नागा पाहुनि धाय ॥ ४ ॥

७

हरिजागरासी जावें । माझ्या विठोबासी पहावें ॥ १ ॥
देवऋषी सर्व येती । नभीं विमानें दाटती ॥ २ ॥
कांकड आरति दृष्टीं पडे । उठाउठी पाप झडे ॥ ३ ॥
ऐसा आनंदसोहळा । जगमित्र नागा पाहे डोळां ॥ ४ ॥

८

आई बहु कृपावंत । विश्वजनासी पोषीत ॥ १ ॥
रुक्मादेवीस भजती । मनोरथ त्यांचे पूर्ण होती ॥ २ ॥
दिव्यवस्त्रकुंकुम ल्याली । रत्नाभरणें ती शोभली ॥ ३ ॥
रुक्मादेवीवराच्या चरणीं । जगमित्र नागा लोटांगणीं ॥ ४४ ॥

९

मंगळ आरती मंगळस्नान । पाहतां शुद्ध अंतःकरण ॥ १ ॥
दूध देवावर घालिती । लोणी मुखासी लाविती ॥ २ ॥
वर दहीं पडे जेव्हां । पाहतां वंशा उद्धार तेव्हां ॥ ३ ॥
घृत मधु साखर वर । लावुनि वोवाळिति श्रीधर ॥ ४ ॥
अवघे आनंदें पाहती । जगमित्र नागा ध्याये चित्तीं ॥ ५ ॥

१०

पाहतां पंढरीच्या सुखा । त्याचा कांहीं नोहे लेखा ॥ १ ॥
नामघोष घरोघरीं । गाती नर आणि नारी ॥ २ ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे । जन्मसार्थक जाहलें साचें ॥ ३ ॥
पाय जोडोनि उभा समकरकटी । नागा जगमित्रा आनंद पोटीं ॥ ४ ॥



# जनी जनार्दन.

' ज्यातें **जनीजनार्दन*** ऐसें बहु साधु जाणते म्हणती
त्या कारणें असोत, श्रीकृष्णा कारणें जशा प्रणती ' ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

हे सत्पुरुष एकनाथस्वामींचे समकालीन होत; पण त्यांचा उल्लेख महिपतिकृत संतचरित्रविषयक ग्रंथांत कोठें आढळत नाहीं. कवि या नात्यानें जनीजनार्दनांची विशेष प्रसिद्धी नाहीं, पण त्यांनीं केलेलीं सुमारें १५० पदें रा० राजवाडे यांस हल्लीं उपलब्ध झाल्यामुळें, त्यांच्या चरित्राचा समावेश, महाराष्ट्र-कविचरित्रांत होण्यास कांहीं हरकत नाहीं, असें वाटल्यावरून हा प्रयत्न केला आहे. रा० राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत प्रस्तुत कवीवर एक लहानसा लेख लिहिला आहे; तोच थोड्याशा फेरफारानें येथें उतरून घेतला आहे.

बालेघाटीं बीड शहरीं ' पाटांगण ' नामक एक देवस्थान आहे. पाटांगण म्हणजे पाटे ठेवण्याची कचेरी. मुसलमानांचें राज्य देवगिरीस इ० स० १३१८ त झाल्यावर कांहीं वर्षे बालाघाटांत बीड व जोगाईचें आंबें या दोन शहरीं स्वतंत्र संस्थानिक राज्य करीत होते. या संस्थानिकांचें सार्वजनिक कागदपत्रांचें दफ्तर ठेवण्याच्या कचेरीस पाटांगण अशी संज्ञा असे. बीड येथील पाटांगणांचे

---

* काव्यसंग्रहकर्त्यांनीं ' जनीजनार्दन ' असा पाठ देऊन, ' लोक ज्याला ' **जनार्दन** ' म्हणतात,' असा त्याचा अर्थ केला आहे; पण हा पाठ चुकीचा आहे, कारण एकनाथांचे गुरु जे जनार्दनस्वामी त्यांच्यावर एक स्वतंत्र आर्या पंतांनीं सन्मणिमालेंत घातलीच आहे.

प्रस्तुतचे अधिकारी ह० भ० प० मथुरानाथ गोसावी हे जनी जनार्दन यांचे वंशज होत. ह्यांची वंशावळ येणेंप्रमाणें:—




जनीजनार्दनाचें आडनांव गोसावी. हे विजापुरच्या पातशाहींत कमावीसदार होते. एकदां दुष्काळ पडला असतां, ह्यांनीं सरकारी

कोठारें गरिबांकडून लुटविलीं. ह्या बेकायदेशीर व बेसनदशीर कृत्याबद्दल बादशाहानें त्यांस विजापुरास धरून नेलें व त्यांच्या कृत्याचा त्यांस जाब विचारला. त्या वेळीं जनीजनार्दन यांनीं ताबडतोब उत्तर दिलें कीं, ' मी, माझी स्त्री व कन्या यांच्या चरितार्थासाटीं जें द्रव्य मीं खर्च केलें, त्याची जबाबदारी माझ्याकडे, इतर द्रव्य दानधर्मात खर्च केलें, त्याचें पुण्य आपणास मिळणार, अर्थात् त्याची जबाबदारी मजवर नाहीं ! ' बादशहास ह्या उत्तरामुळें इतका राग आला कीं, जनीजनार्दनास हत्तीच्या पायाखालीं तुडवून मारण्याची त्यानें शिक्षा दिली. परंतु चमत्कार असा झाला कीं, ह्या सत्पुरुषाच्या शांत मूर्तीला नुसता स्पर्श करण्यासही त्या मत्त पशूस धैर्य झालें नाहीं. हा प्रकार पाहून, बादशहानें जनीजनार्दनास सोडून दिलें व पुनः नोकरीवर रुजू होण्याचा हुकूम फर्माविला. परंतु जनार्दनपंतांची वृत्ति ह्या वेळीं पूर्ण विरक्त झाली होती; त्यांनीं ' यापुढें यवनाची सेवा प्राणांतींही करावयाची नाहीं ' असा निश्चय केला. इतकेंच नव्हे, तर ' ह्यापुढें जो कोणी आपल्या वंशांत यवनाची सेवा करील, तो कुलबाह्य समजला जाईल. ' अशी आपल्या वंशजांस शपथ घातली. ही शपथ बीड येथील पाटांगणांत अद्याप पाळली जाते.

ह्यानंतर जनीजनार्दन यांनीं आपलें शेष आयुष्य ईश्वरभजन व लोकोपदेश यांत खर्चिलें. ह्यांचें उपास्य दैवत गणपति; त्याची स्थापना त्यांनीं गंगामसले या गांवीं केली. पुढें, अडीचशें वर्षांनीं, पेशवाईंतले प्रसिद्ध मुत्सद्दी हरिपंत फडके यांनीं या स्थळाचा उद्धार केला. गंगामसलें हें गांव पैठणाजवळ आहे. जनीजनार्दन हे पंढरपुरची वारी करीत असत. शके १५२३ श्रावण वद्य ७, अभिजित् मुहूर्तीं ( इ० स० १६०१ ) त हे समाधिस्थ झाले. त्यांच्या शिष्यशाखेंतील एका अर्वाचीन गृहस्थानें त्यांचें एक ओंवीबद्ध चरित्र

लिहिलें आहे, तें बीड येथें असल्याचें समजतें. जनीजनार्दनांची समाधि मोंगलाईंत ' भूमक ' नामक गांवीं आहे.

जनीजनार्दन यांचा एकच ओवीबद्ध ग्रंथ आढळतो, तो ' उद्धवबोध ' हा होय. हा ग्रंथ अद्याप अप्रकाशित असून, त्याची हस्तलिखित प्रत रा. पांगारकर यांच्या संग्रहीं आहे. जनीजनार्दनाच्या कवितेची भाषा दासोपंतांच्या भाषेसारखी आहे. ह्यांनीं हिंदी भाषेंतही कांहीं पदें केलीं आहेत. जनीजनार्दन हे मोठे सत्पुरुष होते; त्यांची वाणी किती सरस आहे, हें पुढील पद्यांवरून समजेल:—

पद १

तळह्यानांचे केस विंचरिले गोरी । वांझेचिया सुतें धरिलिसे करीं ॥ ध्रु० ।
परता परता, मी वंध्येची सुता । पतिव्रता मी माझी रे माता ॥ १ ॥
आजी पणजी निपणजी तिजी । तिघी वांझा, आई तुझी आणि माझी ॥२॥
विचारितां तुम्ही आम्ही भावंडें । न घडे संगु नवल दिसे कुडें ॥ ३ ॥
तूं माझा पिता, तुझी मी माता । येवढी आण आतां न बोलें तत्वतां ॥४॥
तूं माझा नातू कीं मी तुझी नाती । जनार्दनु म्हणे भ्रांति हो भ्रांती ॥ ५ ॥

२

अरे अरे आळया तूं पाहिलें पाहो रे ॥ ध्रु० ॥
अझुनु काय निदसुरा तुज जाहाले काई रे ॥ १ ॥
होईं ठीक आसनीं तूं ठायींच्या ठायीं रे ॥ २ ॥
फिरे बुद्धि मागुता तं हंसवाईं राहीं रे ॥ ३ ॥

अभंग.

धरणी रक्षावया परब्रह्म हरी । गौळियाचा घरीं प्रगटला ॥ १ ॥
तिहीं लोकीं जाला परम आनंदु । आनंदाचा कंदु गोपीनाथु ॥ २ ॥
संपूर्ण अवतारु नंदाचा नंदनु । म्हणत जनार्दनु भक्तिप्रियु ॥ ३ ॥

एकनाथस्वामीचे गुरु जनार्दनस्वामी हे जनीजनार्दनाचे गुरु असून एकनाथ व रामाजनार्दन हे त्यांचे गुरुबंधु होत, असें भारतवर्षीय अर्वाचीन कोशांत लिहिलें आहे.

---

# श्रीनाथदास ऊर्फ हरिदास.

' रामचंद्र नाहिं घरीं काय मी करूं ' या चरणानें प्रारंभित होणारें जें एक प्रसिद्ध पद आहे, तें याच कवीचें होय. या कवीचा काल, वास्तव्यस्थान, जात किंवा गुरुपरंपरा यासंबंधाची कांहींएक माहिती उपलब्ध नाहीं. फक्त, ' **मनश्चंद्रबोध** ' नामक एक ओवीबद्ध ग्रंथ व एक दोन पदें याशिवाय या कवीची आणखी कांहीं कविता उपलब्ध नाहीं. ' विक्रमचरित्र ' या नांवाचा एक ग्रंथ उपलब्ध झाला आहे तोही ' हरिदास ' नामक कवीनेंच लिहिलेला आहे; परंतु या दोन्ही व्यक्ति एकच होत्या कीं भिन्न होत्या याचा उलगडा होत नाहीं. मनश्चंद्रबोध ग्रंथाच्या आरंभीं किंवा शेवटीं कवीनें आत्मवृत्ताचा बिलकूल उल्लेख केलेला नाहीं, इतकेंच नव्हे, तर ग्रंथसमाप्तीचा कालही नमूद केलेला नाहीं. या मनश्चंद्रबोध ग्रंथाचे अध्याय ११ असून ओंवीसंख्या ९२४ आहे. ग्रंथाची भाषा व प्रतिपाद्य विषय पाहतां, हा कवि जितका पारमार्थिक अधिकारी दिसतो, तितका विद्वान् किंवा भाषापंडित दिसत नाहीं. तथापि त्याची वाणी प्रासादिक, गोड आणि सुलभ अशी आहे. ग्रंथाचा विषय अगदीं स्वतंत्र असून, तो रूपकालंकारानें प्रतिपादन केला आहे. मन हा कायानगरीचा राजा कल्पून प्रवृत्ति व निवृत्ति या दोघी त्याच्या स्त्रिया कल्पिल्या आहेत. पैकीं निवृत्तीस त्यानें टाकून दिलें असतां, प्रवृत्तीनें आपल्या पक्षाचे अहंकार, अज्ञान आणि भ्रम हे तीन प्रधान नेमून व आपला पुत्र जो मोह त्यास राज्य देऊन मन राजास केवळ नामधारी राजा करून ठेविलें ! पुढें या दुष्ट मंडळीशीं, निवृत्तिपक्षाचा वीर विवेक यानें तुमुल युद्ध करून, निवृत्तीचा पुत्र ' बोध ' यास सिंहासनावर बसविलें व निवृत्तीस मन राजाची पट्टराणी

करून, प्रवृत्तीस तिची दासी केली; इत्यादि कथाभाग कवीनें मोठ्या मार्मिकपणानें प्रस्तुत ग्रंथांत वर्णिला आहे. एकंदरींत ग्रंथ वाचनीय असून, तो वाचीत असतां, कवीच्या परमार्थज्ञाना-संबंधानें मोठें कौतुक वाटतें. कवीनें ग्रंथसमाप्तीचा काल दिला नाहीं, हें वर सांगितलेंच आहे; परंतु ग्रंथाच्या भाषेवरून पाहतां, तो सुमारें २५० वर्षांपूर्वी लिहिण्यांत आला असावा असें वाटतें.

आतां मनश्चंद्रबोध ग्रंथांतल्या कांहीं ओव्या येथें देऊन हा अति संक्षिप्त लेख पूर्ण करितों. प्रथमाध्यायांत श्रीगुरूस वंदन करितांना श्रीनाथदास म्हणतातः—

**ओव्या.**

"आतां नमूं तो सद्‌गुरु । जेणें मस्तकीं ठेविला कृपाकरु ।
तेणें हा संसारसागरु । सरता साचारु पैं झाला ॥ ९ ॥
जयजयाजी श्रीगुरुमूर्ति । सगुण व्यापक श्रीपति ।
तुज वर्णितां वेदश्रुति । मौन निश्चिती राहिल्या ॥ १० ॥
जयजयाजी अव्यक्ता । पूर्णबोधा सदोदिता ।
तुझे गुणानुवाद वर्णितां । शेषा स्तवितां नातुडे ॥ ११ ॥
ब्रह्मादिक पुरंदर । निर्जर नेणती तुझा पार ।
मग जोडोडियां कर । नमिते झाले पायांसी ॥ १२ ॥
ऐसियांची मति टेंगणी । जाहली श्रीगुरु चूडामणि ।
तेथें मी प्राकृत वाणी । काय बोलणों बोलों पां ? ॥ १३ ॥
आतां बहु स्तुति करणें । करितां वाटे लाजिरवाणें ।
सूर्याचिया अंगा उटणें । काय लावणें घडेल ? ॥ १४ ॥
ना तरी तो सुवर्णमेरु । रक्तयुक्त दिसे सुंदरु ।
त्यासीं गुंजांचा शृंगारु । हा विचारु केवीं घडे ? ॥ १५ ॥
अथवा तो क्षीरसिंधु । अमृतें भरला अगाधु ।
त्यासी शर्करा नैवेद्यु । हें विशद केवीं घडे ॥ १६ ॥
ना तरी ते जान्हवी वारी । त्रैलोक्य पातकें निवारी ।
तयासी न्हाणावें थिल्लरीं । ऐसें विचारीं केवीं घडे ? ॥ १७ ॥

खद्योत सूर्यतेज मिरवी । विरोळा शेषातें शिकवी ।
उपजत बाळातें रांगवी । ऐसी कुसरी केवीं घडे ? ॥ १८ ॥
या गगनासी गवसणी । वारियाची मोट बांधिजे कवणीं ।
डोळियां सामावे धरणी । ऐसी करणी केवीं घडे ? ॥ १९ ॥
मशक मेरूतें कवटाळी । टिटवी सागरातें गिळी ।
मुंगी पृथ्वी पायांतळीं । हे भूमंडळीं केवीं घडे ॥ २० ॥
पांगुळ धांवे पवनापाठीं । आंधळें वोवी नक्षत्रगांठी ।
ना तरी बधिराच्या श्रवणपुटीं । शास्त्रगोष्ठी ऐकणें ॥ २१ ॥
हेंही घडो शके एके रीतीं । परी करितां नये तुझी स्तुति ।
या लागीं मौनेंचि पडती । नमन निश्चितीं पायांसी ॥ २२ ॥
परी स्तुति करावया कारण एक । पुरविसी वाचा कौतुक ।
तूं दाता श्रीगुरु नायक । उदार देख म्हणोनी ॥ २३ ॥
तरी हे माझी वाग्वल्ली । वाढवीं आपुल्या कृपाजळीं ।
तेणे फळरसाळी । प्रेमकल्लोळीं अक्षर ॥ २४ ॥
तुझा पद्महस्त तोची मंडप । अमृतदृष्टि छायारूप ।
तेणें वाग्वल्ली आपोआप । नादरूपें विस्तारली ॥ २५ ॥
ऐसी वाग्वल्ली अदभुत । ज्ञानफळीं फळे सतत ।
त्या फळांचे भोक्ते संत । सादरें सुख सेविती ॥ २६ ॥

प्रवृत्तीचा ज्येष्ठ पुत्र मोह यास सिंहासनावर बसवावें, हा अहंकारादि प्रधानाचा विचार मन राजास पसंत पडला:—

' प्रधानाचिया बोला । मन राजा संतोषला ।
घावो निशाणा दिधला । फोडिता जाला भांडार ॥ ५५ ॥
ते विषय भांडारें अगाध । शब्दस्पर्शरूपरसगंध ।
उचित दिधले प्रसिद्ध । मनें विविध जनांतें ॥ ५६ ॥
पुनरपि प्रवृत्ति अनुवादत । म्हणे ' राया ? सांगतसें हित ।
विवाह करावा जी ! त्वरित । जाण नेमस्त मोहाचा ॥ ५७ ॥
तें ऐकोनी नृपवर । प्रपंच पाचारिला शीघ्र ।
तयाची कन्या भुली सुंदर । ते सत्वर आणविली ॥ ५८ ॥

मग पाहुनि सुमुहूर्त । मुली प्रपंच हातीं धरित ।
अज्ञान उभय सत्तेंत । मोहो तेथें त्यापाठीं ॥ ५९ ॥
भ्रमें अक्षता घेतालिया । दोघान्या अंजुळी सुदलिया ।
ॐ पुण्याहं म्हणोनि घातालिया । अविवेकें मस्तकीं ॥ ६० ॥
प्रपंचाची स्त्री स्मृति । ते धार घाली यथा निगुती ।
आशा तृष्णादि समस्ती । वोवाळिती कुरवडी ॥ ६१ ॥
ऐसें लग्न लागलें । दिसती वधुवरें चांगलें ।
मग बोहल्यावरी बैसविलें । तें बळ हव्यासाचें ॥ ६२ ॥
अवक्रियेचें ककण । अवनतीचें लोण ।
त्याच्या पालवी सपूर्ण । बाधी जाण दुर्बुद्धि ॥ ६३ ॥
तया मोहा भुली ऐसपाट । भरी प्रवृत्ति मन सुभट ।
मग प्रपच धरूनियां नेट । राजबिदी नीट मिरविली ॥ ६४ ॥
लौकिक चांग राजबिदी । मेळवुनी मेदाची मांदी ।
जाली गृहप्रवेशासिद्धि । कुबुद्धि कुतर्क त्यापाशीं ॥ ६५ ॥
त्यानतरें प्रवृत्ति मन तेथ । पाहोनिया सुमुहूर्त ।
मोहा राज्यीं बैसवित । आनंदला ते काळीं ॥ ६६ ॥
तेथें वाजती मगळतुरें । शब्द अशब्दांचीं गंहिरें ।
तेणे नादें चराचर भरे । अति गजरें परियेसा ॥ ६७ ॥

अध्याय २.

वरील ओंव्यावरून मनश्चंद्रबोध ग्रथाच्या स्वरूपाची कांहींशी कल्पना वाचकांस होईल असे वाटते, तथापि तो ग्रथ समग्र वाचल्याशिवाय त्यातील कथाभागाचे स्वारस्य पूर्णपणे कळून येणें शक्य नाही; तरी ज्या रसिकास सवड असेल त्यानीं हा लहानसा ग्रंथ एकवार अवश्य वाचावा, अशी विनंति करितो.

---

# प्रेमाबाई.

' नाठवे आपुलें आणि परावें । सम विषम नाहींच ठावें ॥
सर्वां भूतीं सारिखाचि भाव । एकचि जीव मानीतसे ॥ '

महिपति.

ह्या प्रेमळ कवयित्रीच्या प्रेमळ चरित्राचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत करण्यास मला मोठा आनंद वाटतो. प्रेमाबाईचें वास्तव्यस्थान, काल किंवा संप्रदाय यांच्यासंबंधानें कांहींच माहिती उपलब्ध नाहीं; तथापि संतचरित्रकार महिपति यांनी आपल्या भक्तलीलामृताच्या ४२ व्या अध्यायांत, ह्या साध्वीचें चरित्र अत्यंत रसाळ भाषेंत लिहिलें आहे व त्याच्याच आधारानें प्रस्तुत लेख मी लिहीत आहें.

प्रेमाबाई या नांवाची एक विधवा स्त्री अत्यंत सत्त्वसपन्न होती. तिला ज्ञान, वैराग्य इत्यादि परमार्थमार्गासंबंधानें कांहीं एक माहिती नव्हती. पण तिची भक्ति अवर्णनीय होती व त्याच भक्तीच्या जोरावर तिनें भगवंतास आपलासा करून घेतला. हें आपलें आणि तें दुसऱ्याचें, असला भेदभाव तिला ठाऊक नव्हता; सर्वांभूतीं एकच परमात्मा वास करीत आहे, अशी तिची पूर्ण श्रद्धा असल्यामुळें, भूतमात्राचे ठायीं ती अत्यंत दयाशील असे. नित्य गंगा ( गोदा ) स्नान, भागवतश्रवण आणि हरिकीर्तन करावें, संतसाधु आणि प्रेमळ वैष्णव येतील त्यांस आपल्या घरीं आणून त्यांस भोजन घालावें आणि सदांसर्वदां नामस्मरण करावें, हा तिचा नित्यक्रम होता. ती पुराणश्रवणास बसली म्हणजे प्रेमानें तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात असत; हा तिचा प्रेमळपणा पाहून साधुसंतांनीं तिचें नांव ' प्रेमाबाई ' ठेविलें. एके दिवशीं प्रेमाबाई पुराणश्रवणास जाणार तोंच कित्येक साधुसंत तिच्या घरीं आले; ते उपवासी होते. प्रेमाबाईनें विचार केला कीं, आपण जर

आतां कीर्तनास जावें, तर हे साधुसंत उपाशींच राहतील; तर कीर्तनास न जातां आपण यांची सेवाचाकरी करवी, हेंच युक्त होय. असा विचार करून त्या संतांच्या भोजनाच्या व्यवस्थेस ती लागली. पण तिचें चित्त पुराणाकडे लागलें होतें; मंदिरांत पुराणिकबुवांनी इतक्यांत पुराण सुरू केलें असेल, पण तें आज आपणास चुकणार, हा विचार मनांत येऊन प्रेमाबाईला फार वाईट वाटलें. मग तिनें आपल्या दहा वर्षांच्या मुलास ' पुराणास जाऊन सगळी कथा ऐक व ती मला येऊन सांग' अशी आज्ञा केली, व त्याप्रमाणें तो मुलगा निघून गेला इकडे प्रेमाबाई संतांच्या सेवेस लागली;पण डोंगरावर चरणाऱ्या गाईचें लक्ष्य जसें वत्साकडे लागलेलें असतें, त्याप्रमाणें प्रेमाबाईचें लक्ष्य मुलगा पुराणाहून कधीं येईल व आपण सगळी कथा कधीं ऐकूं, या विचारांत गुंतलें होतें. पाकनिष्पत्ती झाल्यावर ते साधु नदीवर स्नान करून आले; त्यांचें पादप्रक्षालन करून, तें तीर्थ प्रेमाबाईनें प्राशन केलें. तिनें आपल्या हातानें पात्रें वाढलीं, व ' श्रीकृष्णार्पण ' म्हणून संकल्प सोडिला. सगळे संत भोजन करून तृप्त झाले. इतक्यांत प्रेमाबाईचा मुलगा पुराणास गेला होता तोही घरीं आला. प्रेमाबाईनें पुत्रासह भोजन केलें व नंतर पुराणिकांनीं सांगितलेली कथा ऐकण्यासाठीं ती आपल्या पुत्रापाशीं येऊन बसली. ते साधूही कथाश्रवण करीत होते. प्रेमाबाईच्या पुत्रानें जी कथा सांगितली ती महिपतिबुवांनीं इतक्या प्रेमळ आणि कवित्वपूर्ण वाणीनें वर्णिली आहे कीं, त्या सगळ्याच ओंव्या येथें उतरून घेण्याचा मोह मला आवरतां येत नाहीं:—

नंद यशोदेचे घरीं । श्रीकृष्ण अवतरला गोकुळीं ।
यशोदा स्वयें दधि घुसळी । तों जवळ वनमाळी पातला ॥॥ ३९ ॥
स्फुंदस्फुंदोनि रडे जगज्जीवन । म्हणे मज देईं स्तनपान ।
यशोदेनें ठेवूनि घुसळण । आडवा श्रीकृष्ण घेतला ॥ ४० ॥

मुखीं घालोनि एक स्तन । आवडीनें चोखीत जगज्जीवन ।
दुसरा हातीं धरोनि जाण । मातेचें वदन पाहत ॥ ४१ ॥
यशोदेचें भाग्य परम । मायातीत परब्रह्म ।
तो सगुणरूपें पुरुषोत्तम । प्रेमें स्तनपान करीतसे ॥ ४२ ॥
ऐसे समयीं ते अवसरीं । मनांत विचार करी श्रीहरी ।
म्हणे मातेची प्रीत मजवरी । किंवा संसारीं हें पाहूं ॥ ४३ ॥
ऐसें चित्तीं विचारून । अग्नीसि आज्ञा केली कृष्णें ।
म्हणे तुवा प्रदीप्त होऊन । दूध उतव सत्वर ॥ ४४ ॥
ऐसें इच्छितां जगन्निवास । तों जातवेद चेतला विशेष ।
दूध उतलें निःशेष । घ्राणासि वास पातला ॥ ४५ ॥
कर्पट दुधाची येतां घाणी । तों यशोदेसी कळलें मनीं ।
मग स्तन काढितां मुखांतूनी । चक्रपाणी रडतसे ॥ ४६ ॥
तैसाचि टाकोनि घननीळ । यशोदा गेली चुलीजवळ ।
तों दुध उतोनि गेलें सकळ । म्हणवोनि तळमळ करीतसे ॥ ४७ ॥
गांठीचा परीस टाकोनि पाहें । किमया करूं गेली माय ।
तों तेथें नास्तिकवाद होय । तैसीच सोय ते झाली ॥ ४८ ॥
क्षीरसमुद्र सांडोनि जाण । शेळीसि घातलें मेळवण ।
स्तनासि हात घालितां जाण । तो दुहोनि नेली आणिकेंचि ॥ ४९ ॥
जवळी सुरतरु सांडूनि । सिंदीसि घालूं गेली पाणी ।
तों तिचीं पत्रें नेलीं कोणी । केरसुणी करावया ॥ ५० ॥
मुक्ताफळाचा सांडोनि हार । रानांत वेचूं गेली गार ।
तों तेथेंहि न दिसती साचार । व्यर्थचि येरझार पडियेली ॥ ५१ ॥
तैसें श्रीकृष्ण परब्रह्म टाकोनि । प्रपंचाकडे गेली जननी ।
तों दुधाणे रितें देखोनी । तळमळ मनीं करीतसे ॥ ५२ ॥
असो, इकडे श्रीकृष्ण । चित्तीं जाहला क्रोधायमान ।
म्हणे मजपरीस जननीचें मन । प्रपंचीं निमग्न असे कीं ॥ ५३ ॥
प्रेमपान्हा पाजितां पाहें । प्रपंचाकडे गेली माय ।
तरी ईस जेणें शिक्षा होय । तैसा उपाय करावा ॥ ५४ ॥

ऐसें म्हणोनि त्या अवसरा । कृष्णें लवंडिला घुसळण डेरा ।
शिशु बाळकें आणीत सत्वरा । आपुल्या घरा श्रीहरी ॥ ५५ ॥
संचित लोणी होतें कांहीं । तें गडियांना वांटिलें सर्वही ।
आपुल्या हातें शेषशायी । भाजनें सर्वही फोडित ॥ ५६ ॥
इतुका अन्याय केला कृष्णें । तों यशोदा आली घरांतून ।
तों दहीं लवंडिलें जगज्जीवनें । वांटिलें माखण पोरांसी ॥ ५७ ॥
हें यशोदनें देखोनि नयनीं । परम संताप वाटला मनीं ।
म्हणे याज ऐसा अगोचर कोणी । त्रिभुवनींही दिसेना ॥ ५८ ॥
लेंकुरें असती घरोघरीं । परी हा अनिवार सर्वांपरी ।
सांगती गान्हाणीं गांविंच्या नारी । तीं यथार्थ अंतरीं मज वाटे ॥ ५९ ॥
ऐसें म्हणोनि यशोमती । हातीं घेतली वेताटी ।
देखोनि पळतसे जगजेठी । माता पाठीं धांवतसे ॥ ६० ॥
क्षण एक हरि दिसे नयनीं । तयासि धरूं पाहे जननी ।
तों अदृश्य होय चक्रपाणी । सर्वेचि ते क्षणीं दिसत ॥ ६१ ॥
यशोदा पाहे लवडसवड । तो हरि लपे भिंती आड ।
गवळणी म्हणती दीधला लाड । तेव्हां कोड वाटलें ॥ ६२ ॥
आम्हीं नित्य सांगूं गान्हाणीं । कीं खोडी करितो चक्रपाणी ।
तें असत्य वाटे तुजलागोनी । आतां अनुभव मनीं आला कीं ॥ ६३ ॥
यशोदा पाहे बिदोबिदीं । तंव कृष्ण लपे सांदोसांदीं ।
गौळणींची मिळाली मांदी । परी कृष्ण त्रिशुद्धी नातुडे ॥ ६४ ॥
मातेचें भय वागवोनि थोर । भयें पळतसे सारंगधर ।
दोन प्रहर आला दिनकर । उष्ण तीव्र जाहलें ॥ ६५ ॥
धांवत पळतां साचार । जननीसी श्रम जाहला फार ।
घर्में करूनि निथळे सुंदर । कैसा विचार करावा ॥ ६६ ॥
म्हणे एकदां लागता माझ्या हातीं । मग त्यासी न सोडीं कल्पांतीं ।
हृदयमंदिरीं निश्चितीं । बांधोनि श्रीपती टाकितें ॥ ६७ ॥
ऐसें मातेचें अंतर । जाणोनियां करुणाकर ।
म्हणे जननीसी श्रम झाला फार । आतां स्थिर असावें ॥ ६८ ॥

यशोदा पाहे चपळ दृष्टीं । तों पुढें देखिला जगजेठी ।
मग सत्वर धरिताहे मनगटी । क्रोध पोटीं न समाये ॥ ६९ ॥
मग फरफरा ओढीत चक्रपाणी । यशोदा घेऊनि आली सदनीं ।
मंदिरीं मिळोनि सकळ गौळणी । नंदराणी गोफाटिती ॥ ७० ॥
मग होऊनि यशोदेसमोर । म्हणती तुझा कृष्ण चोर जार ।
आम्हीं सांगों निरंतर । तें असत्य उत्तर तुज वाटे ॥ ७१ ॥
आज घरीं लवंडिला गोरस । यास्तव धरिलें कृष्णास ।
आता उखळा बांधोनि टाकीं यास । शिक्षा नसे आन कांहीं ॥ ७२ ॥
ऐसें बोलतां व्रजनारी । तों स्फुंदस्फुदोनि रडे मुरारी ।
अश्रुपात वाहती नेत्रीं । परी मातेसि अंतरीं कींव नये ॥ ७३ ॥
दावें सोडोनि लवलाहें । यशोदा कृष्णासी बांधों जाय ।
तंव तें वीतभर उणें राहे । गाठ नये सर्वथा ॥ ७४ ॥
मग दुसरें दावें ते अवसरीं । यशोदा आणोनि लावी सत्वरीं ।
तों आणिक पाहिजे वीतभरी । म्हणे कैशी परी करावी ॥ ७५ ॥
एकमेकांसी लावितां दोर । परी कदा न पुरती साचार ।
दावीं लाविलीं नवलक्षवर । परी उणें वीतभर येतसे ॥ ७६ ॥
गौळणी आपुलाल्या सदनीं जाउनी । चऱ्हाटें देताति आणोनि ।
म्हणती कृष्णासी उखळीं बांधोनि । शिक्षा जननी लावीं वो ॥ ७७ ॥
घरचीं नवलक्ष असतां दावीं । आणि घरोघरचीं आणिलीं सर्वही ।
एकएकासी यशोदा लावी । परी तीं कदाही न पुरती ॥ ७८ ॥
वैष्णवी मायेनें भुलविल्या गौळणी । तैशाच रीतीं यशोदा जननी ।
जो कां विश्वंभर चक्रपाणी । अवतरे सदनीं नंदाच्या ॥ ७९ ॥
ज्याच्या रोमरंध्रीं ब्रह्मांडें । मातील येवढें प्रचंड धेंड ।
तयासी यशोदा बांधूं पाहे कोडें । नवल चोखडें हेंच कीं ॥ ८० ॥
अरूप अनाम साचार । ब्रह्मादिकांसि नकळे पार ।
त्यासि बांधावया न पुरे दोर । हें साचार कळेना ॥ ८१ ॥
आकाश थोर वाडपणीं । गोचर सर्वांसि दिसतसे नयनीं ।
त्यासी घालावया गवसणी । आणावी कोठुनी कळेना ॥ ८२ ॥

क्षीरसागरासी सांडवा । कोणत्या पापाणें मांडावा ।
अमृतासी पाहुणेर करावा । कोणत्या पदार्थे कळेना ॥ ८३ ॥
पृथ्वीचें वजन करावें कोडें । तरी येवढें विस्तीर्ण नाहीं पारडें ।
समीर कोणते ठायीं कोंडे । ऐसें रोकडें कळेना ॥ ८४ ॥
तैशाच रीतीं यशोदा माय । कृष्णासि दोर बांधों जाय ।
परी तो अपार अनंत आहे । यालागीं न समाये चन्द्रहाटीं ॥ ८५ ॥
परी यशोदा म्हणे माझा कुमर । गौळणी भाविती नंदकिशोर ।
म्हणवोनी नवलक्ष लावोनि दोर । सारंगधर बांधिती ॥ ८६ ॥
परी वीतभर उणें दिसतसे दिठीं । पदरीं सर्वथा नये गांठी ।
म्हणोनि यशोदा होतसे कष्टी । म्हणे कैसी गोष्टी करूं आतां ॥ ८७ ॥
एकदां बंधनामाजी येता । मग मी न सोडितें कृष्णनाथा ।
जाणोनि मातेच्या मनोगता । कृपा भगवंता उपजली ॥ ८८ ॥
म्हणे मज बांधावया निश्चिती । कष्टी होतसे यशोदा सती ।
आतां यांची जी मनोवृत्ती । तैसीच निश्चिती हो सुखें ॥ ८९ ॥
ऐसें चिंतितां चक्रपाणी । तों दोर पुरला तेच क्षणीं ।
सत्वर गांठ देतसे जननी । हांसती गौळणी सर्वत्र ॥ ९० ॥
उखळीं बांधितां जगज्जीवन । मातेसी विलोकी दीनपणें ।
म्हणे खोडी न करीं मी आजपासून । मुक्त बंधन करीं कां ॥ ९१ ॥
ऐसें म्हणोनि पूतनारी । टपटपां आंसुवें गाळीत नेत्रीं ।
माता टाकोनि तैसेच परी । लागे मंदिरीं निज कार्या ॥ ९२ ॥

भक्तलीलामृत—अध्याय ४२.

हा कथाभाग श्रवण करीत असतां प्रेमाबाईची चित्तवृत्ति अगदीं तल्लीन झाली होती; कथेंतला सगळा प्रकार आपल्या डोळ्यांदेखत घडत आहे, असें तिला वाटलें. श्रीकृष्णास बंधन केलें असून तो रडत आहे हें ऐकताच, यशोदेची आणि कृष्णाची स्थिति पाहून हांसणाऱ्या गौळणीची प्रेमाबाईनें निर्भर्त्सना केली. भगवंतास कोणी बंधमुक्त करीत नाहीं, हें पाहून त्या प्रेमळ साध्वीस अत्यंत दुःख

झालें; गहिंवरानें तिचा कंठ दाटून आला, डोळ्यांतून अश्रूंच्या सारख्या धारा चालल्या. मग प्रेमाबाई आपल्या पुत्रास म्हणाली, ' बाळा, हा संसाराचा सगळा व्याप मी आतां तुजकडे सोंपवितें व सत्वर गोकुळांत जाऊन भगवंतास मुक्त करितें. ' इतके शब्द बोलतांच, प्रेमाबाईचा आत्मा तिच्या नाशवंत देहाचा त्याग करून चित्स्वरूपीं जाऊन मिळाला ! तिच्या घरीं आलेल्या साधुसंतांस तिच्या त्या उत्कट कृष्णभक्तीचें मोठें आश्चर्य वाटलें. प्रेमाबाईच्या प्रेतावर अकस्मात् परिमळद्रव्यें आणि तुळसीदळें येऊन पडलीं ! तो चमत्कार पाहून त्या सत्पुरुषांनीं प्रेमाबाईचा जयजयकार केला. येथें प्रेमाबाईचें चरित्रही संपलें.

प्रेमाबाईची कविता बरीच असावी असा तर्क आहे; परंतु तिचीं दोन तीन पदेंच काय तीं प्रसिद्ध आहेत. इतर कविता उपलब्ध नाहीं तथापि पुढें दिलेल्या पद्यांवरून प्रेमाबाईच्या प्रेमळ कवित्वाची साक्ष वाचकांस पटल्याशिवाय राहणार नाहीं, अशी माझी खात्री आहे.

१

गडे हो कृष्णगडी आपुला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ध्रु० ॥
कालिया डसेल जरि हरिला । होइल विषबाधा त्याला ।
हाका मारिल आपुल्याला । तुम्हि तरि स्वस्थपणें बसलां ।
आतां कोण काढिल रे त्याला । यमुनाडोहीं बुडाला ॥ १ ॥
गाई त्याविणें हंबरती । वासरें स्तनपान न करिती ।
यापरी गोप सर्व रडती । मुखानें कृष्ण कृष्ण म्हणती ।
आतां काय भेटेल आपुल्याला । यमुनाडोहीं बुडाला ॥ २ ॥
यशोदा पुसेल जरि हरिला । सांगों काय तरी तिजला ।
नंद म्हणेल त्वां नेला । हलधर मारिल तो मजला ।
आतां काय जावें गोकुळाला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ३ ॥

दहिं दुध लोणी ग्यां हरिलें । हरिला ताक बळें दिधलें ।
घेइना म्हणोनि करिं धरिलें । वृक्षा बळकट बांधिलें ।
म्हणोनी तो मजवरि रुसला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ४ ॥
पेंदा धांवुनियां आला । बळकट वृक्षाला डसला ।
त्याचे पाठीवर बसला । ओझें झालें बहु त्याला ।
म्हणुनियां पळत पळत आला । भेटला **प्रेमाबाईला** ॥ ५ ॥

२

गडे हो कृष्ण गडी आपुला । राजा मथुरेचा झाला ॥ ध्रु० ॥
टाकुनि काळा कांबळा । कासे पीतांबर कसिला ।
टाकी मयूरपिच्छांला । जडित मुकुट घातला ।
आतां काय ओळखिल आपुल्याला । राजा मथुरेचा झाला ॥ १ ॥
टाकुनि गुंजांची दाटी । घातला कौस्तुभ श्रीकंठीं ।
टाकुनि मुरली वेताटी । करिं घे आयुधें गोमटीं ।
आतां काय बागुलभय त्याला । राजा मथुरेचा झाला ॥ २ ॥
गोधनें चारूं विसरला । आतां तो नृपांमधें शिरला ।
नारीनें उरीं धरुनि चुरला । आतां तो कुब्जेनें वरिला ।
देतसे निजपद **प्रेमेला** । राजा मथुरेचा झाला ॥ ३ ॥

वरील कविता म्हणजे एका भाविक स्त्रीची साधी आणि प्रेमळ अशी वाणी आहे. तिच्या साधेपणामुळेंच तिला एक प्रकारचें मनोहर स्वरूप प्राप्त झालें असून, कवित्व तर तींत अगदीं पूर्णपणें भरून राहिलें आहे; शिवाय मनुष्यस्वभावाचें सहज सुंदर वर्णन तींत किती उत्तम प्रकारें ग्रथित झालें आहे, हें रसिकांस तरी सांगावयास नकोच वरील दोन्ही पदें पुनः पुनः वाचूनही मनाची तृप्ति होत नाहीं; त्यांतला प्रेमळपणा वाचकांच्या मनांत संचरतो व त्यामुळें दुप्पट प्रेमानें तीं पुनः वाचावींशीं वाटतात. साधुसंतांनीं त्या साध्वीस दिलेलें ‘ प्रेमाबाई ’ हें नांव अगदीं अन्वर्थक होतें; यांत शंका नाहीं. वरील पदांच्या चाली तर इतक्या लोकप्रिय झाल्या

आहेत कीं, सुप्रसिद्ध अर्वाचीन कवि विठोबा अण्णा दप्तरदार व बळवंत पांडुरंग किर्लोस्कर यानीही आपली कित्येक पदे त्याच चालीवर रचलीं आहेत. पुढे दिलेल्या पदाचा शेवटचा चरण उपलब्ध नसल्यामुळें तें पद अमक्याच कवीचें आहे, हें समजण्यास मार्ग नाहीं परंतु त्या पदाची चाल व एकंदर रचना पाहिली म्हणजे ते प्रेमाबाईचेच असावे, असे वाटल्याशिवाय राहत नाहीं:–

**पद.**

गड्यानों आपुल्या कृष्णाला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ ध्रु० ॥
दोघे रथावरी बसती । यशोदा नंद गोप रडती ।
अक्रुरासी सर्व नमिती । त्याच्या दया नये चित्तीं ।
म्हणवुनि जाउं मारुं त्याला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ १ ॥
गोपी फारचि तळमळती । कराने वक्ष भाळ पिटिति ।
हरिला जाउ नको म्हणती । अश्रुने सर्वांग भिजती ।
पुढें तो गेला यमुनेला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ २ ॥
ऐकुनि सर्व गोप न्याले । धावुनि हरिजवळी आले ।
मूर्च्छित रथाजवळि पडले । हरिनें हृदयीं कवळीले ।
देव मग फारचि गहिंवरला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ ३ ॥
तुजविण आम्हां नाहिं कोणी । म्हणुनि सर्व जाउं मरुनी ।
परि ये चिंता एक मनीं । कोण तुज नेइल बा धरुनी ।
तेथे कुणी नाहीं बा तुजला । अक्रुर नेतो मथुरेला ॥ ४ ॥

'माझा भरत देखिला काय' हे सुप्रसिद्ध पदही प्रेमाबाईचेच होय. रा० वि० का० राजवाडे यांनीं प्रेमाबाईचा काल शके १५८० दिला आहे, परंतु तो कशाच्या आधारानें दिला आहे, हें कळत नाहीं.

## निळोबा.



नमनोंच जसा सत्पथदर्शक झाला भला निळोबा हो ।
मज तों प्रसाद त्याचा प्रणता ज्या लाभला मिळो बा हो ॥ १ ॥

सन्मणिमाला-मोरोपंत.

**निळोबा** हे अहमदनगर जिल्ह्यांत पिंपळनेर गांव आहे, तेथील कुळकर्णी होत. पिंपळनेर गांव यांनींच वसविलें, असें महिपतींच्या ग्रंथांत सांगितलें आहे. हे जातीचे आश्वलायन शाखेचे ब्राह्मण. तुकाराममहाराजांच्या चौदा टाळकरी शिष्यांपैकीं निळोबा हे एक होत व त्या सर्वांच्या कवितेपेक्षां निळोबांचीच कविता विशेष प्रसिद्ध आहे. शके १५८० च्या सुमारास हे विद्यमान होते. ह्यांच्या जन्मतिथी-निदान जन्मशक-संबंधानें कांहींच माहिती मिळत नाहीं; तथापि ते पिंपळनेर गांवीं फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस समाधिस्थ झाले अशी माहिती मिळते व त्या दिवशीं पिंपळनेर गांवीं मोठा उत्सवही होतो. तुकारामबुवांसंबंधानें निळोबांच्या ठायीं अत्यंत पूज्यभाव होता व स्वतः ब्रह्मकुलोत्पन्न असतां तुकारामांचें शिष्यत्व पतकरण्यास त्यांस लवमात्र शंका वाटली नाही, यावरून ते चांगले गुणज्ञ व खरे मुमुक्षु होते, हें उघड होतें. समर्थांनीं आपल्या दासबोधांत 'नीच यातीचा गुरु करूं नये' अशी मर्यादा घालून ठेविली आहे, पण समर्थांशींच समकालीन असलेले **निळोबा, रामेश्वरभट्ट** व **जयरामस्वामी** वडगांवकर हे प्रसिद्ध सत्पुरुष नीच यातींच्या गुरूंकडूनच उपदेश घेऊन सायुज्याचे अधिकारी झाले, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे; व वारकरी संप्रदाय व इतर संप्रदाय यांच्यांत जो मुख्य भेद आहे, तो येथेंच आहे. अस्तु

एके दिवशीं निळोबांनीं आपल्यावर अनुग्रह करण्याविषयीं तुकारामास विनंति केली असतां त्यांनीं उत्तर दिलें कीं, 'तुमच्या-

वर अनुग्रह केल्यावांचून मी निजधामास जाणार नाहीं.' पण, पुढें तसा योग न येतां तुकाराम महाराज वैकुंठवासी झाले. त्यावेळी निळोबा पिंपळनेरास होते. पुढें, ते देहूस आल्यावर तुकारामाच्या निर्वाणाची वार्ता त्यांस समजली; त्यामुळें तुकारामाच्या विरहानें ते फार दु:खी झाले. आपल्यावर अनुग्रह न करितां, आपले सद्गुरु निजधामास गेले, तस्मात् आपला जन्म व्यर्थ आहे; सद्गुरु पुन: अवतीर्ण होऊन जर आपणास उपदेश करणार नाहींत, तर आपण अन्नपाणी वर्ज्य करून देहत्याग करूं, अशा दृढ निश्चयानें निळोबा हे बेचाळीस दिवस इंद्रायणी-तीरीं पडून राहिले. हें त्यांचें निर्वाण पाहून, साक्षात् पंढरिनाथ त्या ठिकाणीं आले व निळोबांस हालवून म्हणाले कीं,'मजकडे पहा; मी कोण आहें?' त्या वेळीं निळोबांची अशी स्थिति झाली होती कीं, त्यांचे प्राण अगदीं कंठांत येऊन राहिले होते. तथापि आपले गुरु तुकाराम महाराज हेच आपणांस भेट देण्यासाठीं आले असावेत, अशा समजुतीनें त्यांनीं डोळे उघडले, तों साक्षात् पांडुरंग पुढें उभे असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. त्यावेळीं निळोबा म्हणाले,'देवा! तूं येथें कां आलास? मीं हें निर्वाण तुझ्याकरितां मांडलें नाहीं; तूं जा.' हें ऐकतांच देव अंतर्धान पावले. शेवटीं, निळोबांचा दृढ निश्चय पाहून वैकुंठाहून तुकाराम महाराज त्या ठिकाणीं प्रविष्ट झाले व निळोबांस त्यांनी सावध केलें तुकारामास पाहतांच निळोबांच्या ठायीं सात्त्विक अष्ट भाव उत्पन्न होऊन परमानंदाच्या भरांत त्यांनीं त्यांजपुढें साष्टांग नमस्कार घातला; व म्हणाले कीं, 'आश्वासन दिल्याप्रमाणें मला अनुग्रह न देतां आपण वैकुंठास गेलां. आतां तरी मज दीनावर कृपा करावी.' शिष्योत्तमाची ही उत्कट भक्ति अवलोकन करून तुकाराम महाराज अत्यंत संतुष्ट झाले; निळोबांचे मस्तकीं आपला वरद हस्त ठेवून त्यांनीं त्यांस अनुग्रह दिला व जडमूढोद्धारार्थ

कवित्व करण्याची आज्ञा करून ते अंतर्धान पावले. यासंबंधानें खुद्द निळोबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे:—

## अभंग.

येवोनियां कृपावंतें । तुकयास्वामी सद्गुरुनाथें ॥ १ ॥
हात ठेविला मस्तकीं । देउनि प्रसाद केलें सुखी ॥ २ ।
माझी वाढविली मती । गुण वर्णावया स्फूर्ति ॥ ३ ॥
निळा म्हणे मी बोलता । दिसे, परी त्यांची सत्ता ॥ ४ ॥

पुढें तुकाराम महाराजांचा अधिकार संप्रदाय-पद्धतीनें निळोबांकडे आला. निळोबांचे शिष्य शंकरस्वामी हे मोगलाईंतील शिऊर गांवचे रहिवासी. हे मोठे अधिकारी असल्यामुळें निळोबांनीं त्यांस अनुग्रह दिला. शंकरस्वामीचे शिष्य मल्लाप्पा आप्पा हे जातीचे लिंगाईत वाणी, मोगलाईंतील वाशी गांवचे राहणारे. हेही परम वैराग्यशील आणि उपासनानिष्ठ होते. तुकाराम महाराजांची संप्रदाय परंपरा हल्लीं मल्लापांप्याच वंशजांकडे आहे. पूर्वी, पंढरपुरांत यांचाच फक्त एक भजनी फड होता. हल्लीं जरी त्याच्या पुष्कळ शाखा निघाल्या आहेत, तरी त्या सर्वांचें अग्रेसरत्व वासकरांकडेच आहे.

महिपतींनीं आपल्या भक्तविजयाच्या ५६ व्या अध्यायांत निळोबांच्या चरित्रांतील एक प्रसंग वर्णिला आहे. महिपति म्हणतात:— ‘ ज्या निळोबांस तुकारामांनीं स्वप्नांत उपदेश केला, ज्यांची भक्ति पाहून श्रीपांडुरंग प्रसन्न झाला, त्या निळोबांचें रसाळ चरित्र श्रवण करा. निळोबा हे पिंपळनेर येथें राहत असत. ते जुन्या कवींची कविता म्हणून कीर्तन करीत असत. ते अत्यंत निरभिमानी होते; याचकांचा आदरसत्कार ते फार उत्तम प्रकारें करीत असत. ते गृहस्थाश्रमी होते. एकदां त्यांच्या मुलीचें लग्न जमलें; पण हातीं पैसा नसल्यामुळें, लग्नाची कांहीं एक तयारी झाली नाहीं. त्या वेळीं त्यांची पत्नी त्यांस म्हणाली, ‘ तुमची ही

अशी उदास वृत्ति; अजून लग्नाची कांहींच तयारी नाहीं; तेव्हां आतां आयत्या वेळीं लोकांत आपली फजिती होणार.' यावर निळोबा म्हणाले, 'पांडुरंग आपलें संकट दूर करील.'

इकडे श्रीविठ्ठलानें वृद्ध ब्राह्मणाचें रूप धारण करून, फाटकें धोतर नेसून आणि अंगवस्त्रांत धान्याची पुरचुंडी बांधून निळोबांचे घरीं गमन केलें. निळोबांनीं त्याचा चांगला सत्कार केला. ब्राह्मण म्हणाला, 'मी गरीब आहें; माझ्याजवळ सामग्री आहे, ती घेऊन मला भोजन घालाल तर मोठे उपकार होतील.' निळोबा म्हणाले, 'तुमची सामग्री मला नको; ती तुमच्यापाशीं तशीच राहूं द्या. तुह्मी आतां येथेंच भोजन करा.' हें ऐकून ब्राह्मण म्हणाला, 'माझी वासना पुरणपोळ्यांवर गेली आहे. तर हा शिधा घेऊन मला लवकर पोळ्या करून घाला.' 'ठीक आहे' असें म्हणून निळोबांनीं आपल्या पत्नीस सैपाक करण्यास सांगितलें. ती 'बरें आहे' म्हणून सैपाकघरांत गेली. आपला शिधा लग्नाच्या साहित्यांत टाका, असें ब्राह्मणानें तिला सांगितलें; व त्याप्रमाणें तिनें केलें. मग ब्राह्मण म्हणाला, 'आतां पुरणपोळ्यांची खटपट नको; जेवणाची तयारी आहे, जेवून घेऊं.' मग सर्वांचीं जेवणें झालीं, रात्रीं, ब्राह्मण निळोबांस म्हणाला कीं, 'उद्यां तुमच्या घरीं लग्न आहे; पण पाणी आणण्यास कोणी ब्राह्मण नाहीं. तरी या मंगलकार्याप्रीत्यर्थ ज्या चार घागरी मला आणवतील त्या मी आणीन व तुमच्या पंक्तीस चार दिवस मिष्टान्न भोजन करीन.' निळोबा म्हणाले, 'बरें आहे.' दुसऱ्या दिवसापासून ब्राह्मण घरांतलें कामकाज करूं लागला.

वरपक्षाकडून पांचशें लोक आले होते; ज्या लग्नांत प्रत्यक्ष पांडुरंग व्यवस्थापक, तेथें काय उणीव पडावयाची आहे! कल्पतरूखालीं उपाशीं कोण राहील? सूर्याच्या राज्यांत अंधार कोठचा?

स्वयमेव गंगा घरापाशीं आल्यावर उदकाला काय तोटा? मेघांनीं सडा घातल्यावर जमीन कोरडी कशी राहील? बुद्धिदाता गजानन प्रसन्न झाल्यावर विद्यार्थी मूर्ख कसा राहणार? ब्रह्मदेवानें सौंदर्य दिल्यावर न्यूनता कशाची? सरस्वतीच्या लेखांत चुकी राहणें शक्यच नाहीं. मग निळोबांच्या घरीं प्रत्यक्ष भगवान् व्यवस्थापक असल्यावर, तेथें काय न्यूनता रहावयाची आहे! ब्राह्मणाचा शिधा कोठींत ठेवतांच, साहित्याची विपुलता होऊन गेली. पांचशें माणसें नित्य जेवीत, तरी सामानाची तूट पडली नाहीं! पाहुण्यांची सर्व व्यवस्था ब्राह्मण ठेवीत असे. त्याच्या कामगिरीनें तृप्त होऊन त्यास एक शेला देण्याचें निळोबांनीं मनांत आणिलें. पण सहावे दिवशीं वऱ्हाड परत जातांच, ब्राह्मण सर्वांसमक्ष देवघरांत जाऊन तेथेंच गुप्त झाला! शेला देण्यासाठीं निळोबा ब्राह्मणास हाक मारितात, तों ब्राह्मण आहे कोठें? मग, निळोबांच्या लक्ष्यांत येऊन चुकलें कीं, साक्षात् पंढरीनाथानेंच विप्रवेषानें आपल्या घरीं येऊन हें मंगल कार्य पार पाडिलें. निळोबांनीं भगवंताची अत्यंत प्रेमपुरस्सर स्तुति केली; आपल्यासाठीं पांडुरंगास कष्ट झाले, यामुळें दुःखी होऊन संसाराचा त्याग करावयास ते सिद्ध झाले. मग, निळोबांच्या स्वप्नांत जाऊन पांडुरंगानें त्यांची समजूत केली व ‘ मी नेहमीं तुझ्या सन्निध राहतों ’ असें त्यांस सांगितलें. निळोबांच्या भक्तीमुळें विठोबा पिंपळनेरास येऊन राहिला; तेथें फाल्गुन वद्य द्वितीयेस मोठा उत्सव होतो. ’

निळोबांचे वंशज पिंपळनेरास आहेत असें समजतें; त्यांच्या घरचीं दप्तरें पाहिल्यास निळोबांचें चरित्र व कविता यांच्यासंबंधानें आणखी कांहीं तरी माहिती उपलब्ध होण्याचा संभव आहे; शोधकांनीं शोध करावा.

निळोबांची कविता, कै० तुकाराम तात्या, रा० आवटे व चित्रशाळेचे मालक या तीन गृहस्थांनीं प्रसिद्ध केली आहे. त्यांपैकीं चित्रशाळेच्या प्रतींतल्या अभंगांहून रा० आवटे यांचे प्रतींत १०३ अभंग अधिक आहेत. याशिवाय, तुकाराम तात्यांनीं प्रसिद्ध केलेल्या तुकारामाच्या गाथेच्या पहिल्या भागाच्या आरंभीं निळोबांनीं तुकारामावर लिहिलेले ३३१ श्लोक दिले आहेत. मिळून, निळोबांच्या उपलब्ध कवितेची संख्या सुमारें १९०० होते. तुकारामावरील श्लोकांशिवाय निळोबांची सगळी कविता अभंगबद्ध आहे. निळोबांच्या कवितेसंबंधानें ह० भ० प० विष्णु नरसिंह जोग यांनीं पुढील उद्गार काढिले आहेत:—'तुकाराममहाराजांच्या कवित्वांत व ह्यांच्या कवित्वांत फरक इतकाच आहे कीं, तुकाराम महाराजांचे कांहीं अभंग गूढ असून समजण्यास कठीण आहेत; पण तसे यांचे मात्र नाहींत. निळोबांच्या अभंगांची भाषा अगदीं सुलभ असून, ती जवळ जवळ हल्लींच्या प्रचलित महाराष्ट्र भाषेशीं जुळणारी आहे. मात्र इतकें आहे कीं, तुकाराम महाराजांच्या काव्यांत जसें सौंदर्य आहे तसें यांच्या काव्यांत नाहीं. तथापि विचारस्वारस्य गुरूसे चेला सवाई, या म्हणीप्रमाणें निळोबाच्या काव्यांत आहे." जोगबुवांचा हा अभिप्राय बहुतांशीं योग्य आहे; तथापि निळोबांच्याही कांहीं अभंगांत पुष्कळ 'सौंदर्य' आहे, हें कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं.

तुकारामावरील निळोबाचे श्लोक भुजंगप्रयात वृत्तांत आहेत, त्यांत त्यांनीं तुकारामबुवांचें संक्षिप्त चरित्र देऊन त्यांचें स्तुतिस्तोत्र केलें आहे. 'तुकारामबुवा सदेह वैकुंठास गेले' ह्या कथेचा समावेश निळोबांच्याही श्लोकांत झाला आहे. तुकारामबुवा हे निळोबांचे गुरु होते; अर्थात् तुकारामबुवांसंबंधाचे त्यांचे उद्गार भाविकपणाचे व प्रेमळ असावेत, हें साहजिकच आहे. निळोबांनीं 'चांगदेवचरित्र'

नामक ग्रंथ केला आहे, तो सगळा अभंगबद्ध असून वाचनीय आहे. निळोबांची इतर कविता म्हटली म्हणजे, विशेषेंकरून, पंढरीमाहात्म्य, पांडुरंगवर्णन, भगवद्वर्णन व स्तुति, स्वात्मनिवेदन, संतस्तुति, जनास उपदेश, बालक्रीडा इत्यादि विषयांवर आहे. या कवितेंतील कांहीं उत्कृष्ट वेंचें येथें देऊन, हा लेख पूर्ण करितों.

## अभंग. ( पंढरीमाहात्म्य. )

१

सहज गेलों पंढरपुरा । विश्वंभरा भेटोंसी ॥ १ ॥
तो हा उभा विटेवरी । देखिला श्रीहरी जगदात्मा ॥ २ ॥
ज्याचिये तेजें धवळलें नभ । हा जगदारंभ अंगकांति ॥ ३ ॥
निळा म्हणे ब्रह्मादिकां । व्यापक लोकां सकळां जो ॥ ४ ॥

२

संत येताती सनकादिक । सोहळा पाहूं तो कौतुक ॥ १ ॥
चंद्रभागे निमज्जन । पारसों हरीचें कीर्तन ॥ २ ॥
संतसज्जनांचिया भेटी । करूं स्वानंदाची लुटी ॥ ३ ॥
निळा म्हणे पंढरपुरीं । सेवूं काला वांटिती हरी ॥ ४ ॥

३

पंढरिहूनि गांवा जातां । वाटे खंती पंढरिनाथा ॥ १ ॥
आतां बोळवीत यावें । आमुच्या गांवा आम्हासवें ॥ २ ॥
तुम्हालागीं प्राण फुटे । वियोगदुःखें पूर लोटे ॥ ३ ॥
निळा म्हणे पंढरिनाथा । चला गांवा आमुच्या आतां ॥ ४ ॥

४

वरी बुकियाचे धूसर । अत्तर कस्तुरी केशर ॥ १ ॥
तुळसी नाना सुमनमाळा । दिव्यांबराचा सोहळा ॥ २ ॥
पांडुरंगा ओंवाळिती । नारीनर अवलोकिती ॥ ३ ॥
नीळा म्हणे दीपावळी । सोडिती चंद्रभागाजळीं ॥ ४ ॥

५

वारकरी संत पंढरीसी जाती । सप्रेमें गर्जती नामघोषे ॥ १ ॥
लोटांगणीं त्यासी जाईन आवडी । ओवाळीन कुडी वरुनि पाया ॥ २ ॥
धन्य केला वंश तारिले पातकी । डोलती पताकी गगन शोभे ॥३॥
टाळ श्रुति वाद्यें मृदंगाच्या ध्वनी । क्रमिताति अवनी ब्रह्मानंदें ॥४॥
पढती बीदावळी करिती जयजयकार । टाळिया अंबर सादु देत ॥५॥
निळा म्हणे माझे सखे विष्णुदास । जाती पंढरीस प्रतिवरुषीं ॥ ६ ॥

## श्रीपांडुरंग वर्णन.

६

भाविकांते अवघेंचि गोड । करुनी कोड स्वीकारी ॥ १ ॥
भोळानाथ पढरीचा । न करी दासाचा अतिक्रम ॥ २ ॥
न म्हणे रुक्ष थोडें कांहीं । ग्याली अवघेंही सुखेंचि ते ॥ ३ ॥
निळा म्हणे कृपावंत । उभा तिष्ठत विटेवरी ॥ ४ ॥

७

कैवल्याचा गाभा । व्यापुनिया ठेला नभा ॥ १ ॥
तो हा सगुण वेषधारी । उभा चंद्रभागेतिरीं ॥ २ ॥
धुंडिती पुराणें । वेदश्रुति ज्या कारणे ॥ ३ ॥
निळा म्हणे अवघे देव । ज्याचे म्हणवितातो अवयव ॥ ४ ॥

८

अचळ धरा तैसें पीठ । पायातळीं मिरवे वीट ॥ १ ॥
दोन्ही पाउलें समान । जैसे योगियाचे नयन ॥ २ ॥
जानु जघ ते स्वयंभ । जैसे कर्दळीचे स्तंभ ॥ ३ ॥
कसीयलें पीत वसन । झळके विद्युल्लतेसमान ॥ ४ ॥
शेष बैसला वेटाळीं । तैसा कटिबंध मेखळा ॥ ५ ॥
समुद्र खोलिये विशाळ । तैसे नाभीचें मंडळ ॥ ६ ॥
तुळसी मंजरिया गळां । जैशा सुटल्या मेघमाळा ॥ ७ ॥
दिग्गजाचे शुंडादंड । तैसे करी कर प्रचंड ॥ ८ ॥
पूर्णिमेचा उदो केला । तैसा मुखचंद्र शोभला ॥ ९ ॥
जैशीं नक्षत्रें झमकती । तैसीं कुंडलें चमकती ॥ १० ॥

सूर्य मिरवे नभमंडळा । तैसा केशराचा टिळा ॥ ११ ॥
क्षीराब्धीचे चंचळ मीन । तैसें नेत्री अवलोकन ॥ १२ ॥
जैसें मेरूचें शिखर । तैसा माथां मुगुट स्थिर ॥ १३ ॥
इंदु प्रकाशें वेढिला । तैसा क्षीरोदकें वेष्टिला ॥ १४ ॥
तृषीलागीं चातकपक्षी । निळा तैसा ध्यान लक्षी ॥ १५ ॥

ह्या अभंगांत सौंदर्य, कवित्व, अलंकार, प्रेम, शब्दसौष्ठव, अर्थमाधुर्य, गंभीर्य आणि तेजस्वीता यांची इतकी प्रचुरता झाली आहे कीं, तिचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे, असें मला वाटतें. आमच्या साधुसंतांच्या वाणीचा एक विशेष गुण हा आहे कीं, त्यांची सगळीच कविता उत्कृष्ट असल्यामुळें, त्यांतील वेंचे काढणाराची मोठी तारांबळ होते. हा अभंग देऊं कीं तो अभंग देऊं, असें होऊन शेवटीं सगळेच अभंग उतरून घ्यावे, असा मोह उत्पन्न होतो; परंतु स्थलाभाव आड आल्यामुळें, हा मोह त्याम आवरून धरावा लागतो व शेवटीं सगळेच अभंग वाचण्याची वाचकांस शिफारस करून, त्यास स्वस्थ बसावें लागतें. असो.

## तुकारामांसंबंधाचे अभंग.

९

अवघे वर्ण बावन्न परी । शब्दीं शब्दांच्या कुसरी ॥ १ ॥
आयते दिले जोडुनियां । स्वामी सद्गुरु तुकया ॥ २ ॥
न लगे करणेंचि घडामोडी । अर्थी अक्षरें उघडीं ॥ ३ ॥
निळा म्हणे कृपावंता । कैसेनि उत्तीर्ण होऊं आतां ॥ ४ ॥

१०

एकाक्षरीं विस्तार करा । अर्थांतरा मिळवूनी ॥ १ ॥
हे तों माझी नव्हे युक्ती । चेतवणें स्फुर्ति तुमची हे ॥ २ ॥
वसंताच्या ईक्षणमात्रें । पल्लव पत्रें फळ वृक्षा ॥ ३ ॥
निळा म्हणे रवीकीर्णे । विकाशवणें कमळासी ॥ ४ ॥

११

तुकयाचे कीर्तनमेळीं । नाचे कल्लोळीं आनंदें ॥ १ ॥
क्षिरापती वाटी हातें । कालाही सांगातें करूं धांवे ॥ २ ॥
उदकामाजी रक्षी वह्या । आलिंगी बाह्या पसरुनी ॥ ३ ॥
निळा म्हणे ऐशा कीर्ति । वाढवी श्रीपति दासांच्या ॥ ४ ॥

## संतवर्णन.

१२

म्हैशीपुत्रामुखें बोलवणें श्रुती । चालवणें भिंती निर्जीव ते ॥ १ ॥
नव्हे हा सामान्य महिमा संतांचा । नैवेद्य हातींचा मूर्ति जेवी ॥ २ ॥
उदकामाजी वह्या राखिल्या कोरड्या । दाविल्या रोकड्या विश्वजना ॥ ३ ॥
निळा म्हणे जिहीं संगती करणें । दीन उद्धरणें नवल कोण ॥ ४ ॥

१३

संदेह गमला । कैसा रेडा बोलविला ॥ १ ॥
सांगा देव कां न होती । निर्जीव चालविली भिंती ॥ २ ॥
कोरडे कागद । उदकीं न लागती बुंद ॥ ३ ॥
निळा म्हणे खरा । द्यावा संतांपायीं थारा ॥ ४ ॥

१४

अगाध कीर्ति वाढले संत । केलीं विख्यात चरित्रें हीं ॥ १ ॥
अग्नींत उभे वीष प्याले । नाहीं ते प्याले महाशस्त्रा ॥ २ ॥
वंदुनी आज्ञा बोले पशु । श्रुतिघोषु दीर्घ स्वरें ॥ ३ ॥
निळा म्हणे ठेवुनी उदकीं । कागदही शेखीं कोरड्या वह्या ॥ ४ ॥

१५

आळी करितां नामदेव । जेवितां स्वयमेव सांगातें ॥ १ ॥
सावत्याचे उदरीं बैसे । पुंडलिका वसे दृष्टीपुढें ॥ २ ॥
कुर्म्याचिये धांवे भेटी । मेहत्या कंठीं माळ वोपी ॥ ३ ॥
निळा म्हणे निर्जिवासी । संतोबासी न विसंबे ॥ ४ ॥

१६

माता पिता समर्थ । स्वामी माझा एकनाथ ॥ १ ॥
काळ रुळतो चरणीं । देव घरीं वाहे पाणी ॥ २ ॥

ज्याच्या अनुग्रहें करून । जाले पतित पावन ॥ ३ ॥
जो वसे प्रतिष्ठानीं । निळा तया लोटांगणीं ॥ ४ ॥

१७

सेवेलागीं सेवक जालों । तुमचे लागलों निजचरणीं ॥ १ ॥
अहो स्वामी तुकया देवा । यावरी न करावा अव्हेर ॥ २ ॥
सहज लीलें उदकीं वह्या । तुम्हीं तारिल्या निजसत्तें ॥ ३ ॥
निळा म्हणे धराल हातीं । तरी याल मति निरुपम ॥ ४ ॥

१८

सुखें जन्मांतरे घेऊं । नामें आळवूं श्रीहरिचीं ॥ १ ॥
नाही आम्हां त्याचें कोडें । संसार बापुडें तें काय ॥ २ ॥
कळिकाळाचें भय ते किती । पायां पडती यमधर्म ॥ ३ ॥
निळा म्हणे सर्वही सिद्धी । रुळती पदीं हरिनामें ॥ ४ ॥

१९

नाम सांडोनि मुक्ति घेणें । हीं तों लक्षणें अधमाचीं ॥ १ ॥
आम्हां विष्णुदासां धर्म । नित्य नेम कथेचा ॥ २ ॥
काय करूं त्या व्युत्पत्ती । वडील हांसती पूर्वज ॥ ३ ॥
निळा म्हणे करावी सेवा । आवडी देवा ही माझी ॥ ४ ॥

## इतर अभंग.

२०

कोटी जन्म घेइन देवा । करीन सेवा तुमचीच ॥ १ ॥
भुक्तिमुक्ती नका आड । घालूं सांकडें मज वाटे ॥ २ ॥
काय करूं ते आत्मस्थिति । खंडन करिती भजनाचें ॥ ३ ॥
निळा म्हणे राहो ठायीं । विश्वास पायीं तुमचीये ॥ ४ ॥

२१

धन्य काळ आजिचा दिवस । हरिचे दास भेटले ॥ १ ॥
दंडवत घालिन पायां । करीन काया कुरवंडी ॥ २ ॥
पाप ताप दैन्य गेलें । येथोनी पाउलें देखतां ॥ ३ ॥
निळा म्हणे अवघे संत । मिळोनी स्वहित करा माझें ॥ ४ ॥

२२

भवरोगीं जे पीडिले लोक । तिहीं आवश्यक सेवावें ॥ १ ॥
मज्ञा मात्रा हरिकीर्तन । उतरलें रसायन निजनिगुती ॥ २ ॥
मागें बहुतां गुणासी आलें । अरोगी ठेविले करुनी ॥ ३ ॥
निळा म्हणे सांगतां फार । होईल विस्तार नामें त्याच्या ॥ ४ ॥

२३

मागण्याची न करूं गोठी । तुम्हा पोटीं भय वाटे ॥ १ ॥
नामचि तुमचें पुरे देवा । न करूं हेवा आणिक ॥ २ ॥
माझें आहे स्वाधीन मन । न इच्छीं मान धन कांहीं ॥ ३ ॥
निळा म्हणे सत्य साचा । संकल्पाचा निर्धार ॥ ४ ॥

२४

दीन मी अनाथ तुमचें रंक । मागतों भीक मज द्यावी ॥ १ ॥
नेऊनि घाला पायांवरी । निरवा श्रीहरि कृपाघना ॥ २ ॥
नुपेक्षावें शरणागता । जरी मी नेणता दास तुमचा ॥ ३ ॥
निळा म्हणे अवघे संत । मिळोनी स्वहित करा माझें ॥ ४ ॥

२५

गोड नाम तुमचें देवा । गोड सेवा तुमची ते ॥ १ ॥
गोड तुमची कीर्ति वाणी । गोड श्रवणीं ऐकतां ॥ २ ॥
गोड तुमचें रूप दृष्टीं । गोड पोटीं प्रेम तें ॥ ३ ॥
गोड निळा तुमचे पायीं । गोड डोई ठेवितां ॥ ४ ॥

एकंदरींत—

नव्हती माझे फुकट बोल । जाणे विठ्ठल सत्यमिथ्या ॥ १ ॥
संतकृपेची हे जाती । ओघेंचि चालती अक्षरें ॥ २ ॥
कैची मती बोलावया । ठायींची पाया विदित तें ॥ ३ ॥
निळा म्हणे बाहेरी आलें । होतें सांठवलें हृदयीं जें ॥ ४ ॥

ह्या निळोबांच्याच वचनाप्रमाणें, निळोबांची व आमच्या इतर साधुसंतांची सगळी कविता 'संतकृपेची हे जाती । ओघेंचि चालती अक्षरें,' अशा प्रकारची, केवळ ईश्वरप्रेरित अशी आहे. तिच्यासंबंधानें

अभिप्राय देण्यास आम्हां ‘ प्राकृत हेंदग्यांस ’ बिलकूल अधिकार नाहीं. ही कविता भक्तिपुरस्सर वाचावी, तिचें मनन करावें व तिच्यापासून आपली पारमार्थिक उन्नति करून घ्यावी, इतकेंच आमचें काम. तें काम योग्य रीतीनें न करितां, उलट साधु-संतांच्या कवितेचें गुणदोषविवेचन करून, ज्यांस निंदास्तुतीची, मानधनाची, भुक्तिमुक्तीचीही पर्वा नाहीं, अशा संतांवर आपल्या अल्पज्ञतेचे शितोडे उडविण्यास जर आम्ही प्रवृत्त होऊं, तर मग आमच्या सारखे कृतघ्न आणि शाहाणे आम्हीच, असें म्हणणें भाग पडेल.

## दिनकर गोसावी रामदासी.

महंते महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करूनि विखरावे । नाना देशीं ॥ १ ॥

दासबोध.

शके १५०० पासून १६०० पर्यंत १०० वर्षांच्या काळांत धर्मसंमूढचेत महाराष्ट्राला खऱ्या महाराष्ट्र धर्माची व ज्ञानाची प्राप्ति करून देण्यास महाराष्ट्रीयांच्या सुदैवानें ज्या दिव्य विभूति निर्माण झाल्या, त्यांत श्रीसमर्थांचे महंत व शिष्य यांचीही गणना करण्यास हरकत नाहीं. अशा महंतांपैकीं श्रीदिनकरबुवा हे एक होत. यांचें मूळचें नांव बहिणंभट किंवा बहिणाजी असें होतें; धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या ‘ रामदासांची कविता, भाग १ ला ’ या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत समर्थशिष्यांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांत ८९ वें नांव ‘ बहिणाजी ’ हें आहे. पण पुढें श्रीसमर्थांनीं बहिणाजीस उपदेश देऊन त्यांचें नांव ‘ **दिनकर** ’

ठेविलें, अशी आख्यायिका आहे. दिनकरबुवांच्या शिष्यांनीं, त्या काळच्या अधिकाऱ्यांनीं व गांवकऱ्यांनीं बुवांस जीं दानपत्रें व सनदा करून दिल्या आहेत, त्यांत त्यांचें नांव '**बहिणाजी वा। नरहरजी गोसावी**' असें लिहिलें आहे.

त्या सत्पुरुषाचा जन्ममृत्युकाल अद्याप नक्की समजला नाहीं; तथापि शके १५५० पासून १६२५ च्या दरम्यान हे विद्यमान होते, असें उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून दिसतें. अहमदनगरा-नजीक पुराणप्रसिद्ध भृगुक्षेत्रीं-भिंगार येथें-पाठक उपनांवाच्या यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण कुळांत दिनकरबुवांचा जन्म झाला. पाठकां-कडे नगर भिंगारची व आसपासच्या कांहीं गांवांची वृत्ति होती. हे पाठक हल्लीं 'मुळे' या आडनांवानें प्रसिद्ध आहेत. दिनकरबुवांचे पणजे जनार्दन पाठक व आजे कोनेर पाठक हे भगवद्भक्त असून चांगले विद्वान् होते. सूर्य, गणपति व देवी या दैवतांचे ते उपासक होते. दिनकरबुवांचे तीर्थरूप नरहरि पाठक हेही वेदशास्त्र-संपन्न व ब्रह्मनिष्ठ पुरुष होते; त्यांस श्रीगणपतीची उपासना असे. दिनकरबुवांची आई द्वारकाबाई ही फार सुशील व पतिसेवापरायण होती दिनकरबुवा लहानपणापासूनच भक्तिमान् व धार्मिक होते. नरहर पाठकांच्या सान्निध्यांत दिनकरबुवांनीं मराठी व संस्कृत भाषांचें अध्ययन केलें. त्यांस वेदान्त व धर्मशास्त्राचें चांगलें ज्ञान होतें, असें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. रामदास, तुकाराम, वामन इत्यादि तत्कालीन कवींची पुष्कळ कविता त्यांच्या संग्रहीं असून, ती त्यांनीं लक्षपूर्वक वाचली होती.

व्रतबंध व लग्न झाल्यावर दिनकरबुवांची विरक्ति अधिकच वाढली. त्यांचे भाऊबंद पुष्कळ असल्यामुळें त्यांस जाताशौच किंवा मृताशौच बहुधा नेहमीं असावयाचें; ह्या अडचणीमुळें त्यांच्या स्नानसंध्यादि नित्यकर्मास व भगवद्भजनास व्यत्यय येऊं लागला. त्यामुळें गांवांत

राहणें सोडून कोठें तरी गिरिकंदरीं जाऊन बसावें, असा त्यांनीं निश्चय केला व त्याप्रमाणें, एके दिवशीं, गुप्तपणें गांव सोडून, भिगारच्या पूर्वेस १३–१४ कोसांवर डोंगरांत वृद्धेश्वर (म्हातारदेव) नामक एक पुराणप्रसिद्ध स्वयंभू शिवलिंग आहे, तेथें ते जाऊन राहिले. हें स्थळ अत्यंत रमणीय व शांत असून, तपस्वीजनांस अनुकूल अशी सृष्टिरचना व निसर्गसौंदर्य या ठिकाणीं आहे. दिनकरबुवांनीं येथील एका गुहेंत बारा वर्षे तप केलें, अशी आख्यायिका आहे. वृद्धेश्वरानजीक दक्षिणेच्या बाजूस डोंगरांत जी गुहा आहे तेथेंच दिनकरबुवा ध्यानस्थ बसत असत. कांहीं दिवस आसपासच्या गांवांतून मिळणाऱ्या अल्प भिक्षेवर, कांहीं दिवस कंदमूलफलांवर निर्वाह करून दिनकरबुवांनीं अनेक पुरश्चरणें केलीं व समाधियोगाचा अभ्यास केला. याप्रमाणें ते भगवत्प्राप्तीच्या साधनांत निमग्न असतां, श्रीसमर्थांनी त्यांस स्वप्नांत दर्शन देऊन त्यांच्या मस्तकीं आपला वरद हस्त ठेविला. पुढें एक वर्षानें समर्थांनी त्यांस प्रत्यक्ष उपदेश दिल्यावर त्यांच्या अनुष्ठानाची परिसमाप्ति झाली. ‘ ययापूर्वी एक वर्षाआदि । फाल्गुनी पौर्णिमा निशिसंधी । दिनकरीं स्वानुभव प्राप्त स्वप्रसिद्धी । मस्तकीं विराजे वाम कर ॥ ’ हा साक्षात्कार शके १५७५ त झाला; या गोष्टीस आजचें बरोबर २५९ वर्षें झालीं. ‘ स्वप्नावस्थेमाजी चोखडें । जें देखिले होतें श्रीगुरु रूपडें । तें न दिसेचि पाहतां पुढें । जागृतीसि येतां ॥ नाहीं जंव ज्ञानसिद्धि । न होतां प्रत्यक्ष गुरुवाक्यशुद्धि । जाली जरी पूर्ण समाधि । तऱ्ही अपक्वचि कीं ॥ ’ अशा समजुतीनें श्रीसमर्थांच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं दिनकरबुवा फार उत्सुक झाले होते. ध्यानस्थ

---

१ हें स्थल घाटशिरस गांवीं एका डोंगरांत आहे. येथें वृद्धा नदी उगम पावते. नवनाथभक्तिसार ग्रंथाच्या शेवटीं या स्थळाचा उल्लेख आढळतो.

२ हा लेख लिहिला त्या दिवशीं फाल्गुनी पौर्णिमा होती. योगायोग !

होतांच स्वप्नांतील मूर्तीशीं तादात्म्य व्हावें व नेत्र उघडतांच वृद्धेश्वराचा देखावा डोळ्यांपुढें दिसावा, असा प्रकार बरेच दिवस चालल्यावर, दिनकरबुवांनीं ‘ मग आर्ताचिया पडिभारें। जिज्ञासा करूनि मोहरें। अर्थार्थाचियानुकारें। ज्ञानइच्छा धरूनि ॥ निश्चय केला निजमानसीं। मूर्ति जंव न देखे नयनासी। तंव न घेणें अन्नपानासी। आणि नाना उपभोग ॥ ’ याप्रमाणें निश्चय करून श्रीसमर्थांच्या दर्शनाची ते वाट पाहत बसले. अशा स्थितींत एक वर्ष गेल्यावर असा चमत्कार झाला कीं, श्रीसमर्थ एकदां जांबगांवाहून कृष्णातीराकडे आपल्या परिवारासह जात असतां, वाटेंत वृद्धेश्वराचें दर्शन घेऊन, तेथून सहा कोसांवर भातवडी[1] नामक गांवीं, नृसिंहमंदिरांत मुक्कामास राहिले; ‘ तंव इकडे दिनकरासी। स्वप्नदर्शनाचिया हव्यासीं। परम क्लेश निजमानसीं। विरहें करूनि संतप्त ॥ शके पंधराशें शाहात्तरामाझारीं। फाल्गुनी पौर्णिमा अवसरीं। श्रीरामदासकृपा दिनकरीं। स्वानुभवसुख प्राप्त ॥’ भातवडी येथील नृसिंहमंदिरांत समर्थ उतरले आहेत, ही हकीकत दिनकरबुवांस स्वप्नांत समजतांच, ते तत्काल त्या ठिकाणीं गेले; तेथें, शके १५७६ फाल्गुन शुद्ध पौर्णिमा, रविवारीं सूर्योदयीं, श्रीनृसिंहमूर्तिसन्निध समर्थांनीं त्यांस उपदेश देऊन, त्यांचें नांव ‘ दिनकर ’ ठेविलें. ‘ बोधुनि बोध प्रबोधनमार्गे। ठविति वामकरा शिरिं वेगें। विप्रकुलोत्तम कर्म करावें। रामउपासन चित्ति धरावें।’ असें सांगून व दोन तसू उंचीची तांब्याची सीतायुक्त श्रीराममूर्ति दिनकरबुवांस देऊन समर्थ कृष्णातीरीं गेले. इकडे दिनकरबुवांनीं त्या मूर्तीची तीसगांवीं[2] स्थापना केली व तेथेंच सांप्रदायाचा मठ करून ते

---

१ भातवडी गांव नगर तालुक्यांत मेहेकरी नदीच्या तलावाचे कांठा आहे.

२ हा गांव शेवगांव तालुक्यांत आहे; हें पूर्वी मोठें शहर होतें; पण हल्लीं अगदीं मोडकळीस आलें आहे.

राहिले. दिनकरबुवा पुनः कधींही भिंगारास गेले नाहींत. समर्थांनीं उदात्त राष्ट्रहितबुद्धीनें महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत १४ महंतांची योजना करून जे १४ मठ स्थापन केले, त्यांत तीसगांवच्या दिनकरस्वामींचा मठही प्रसिद्ध आहे. इतर मठांप्रमाणें ह्या मठास जहागीर किंवा नक्त नेमणूक वगैरे कायमचें उत्पन्न कांहीं नाहीं; याचें कारण दिनकरबुवा हे पूर्ण निरिच्छ व वैराग्यसंपन्न असल्यामुळें त्यांनीं वैभवाची अपेक्षा कधींही केली नाहीं. ‘ ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा । ॐ भवति या पक्षा । रक्षिलें पाहिजे ॥ ’ या समर्थोक्तीस अनुसरून, केवळ भिक्षान्नावर आपल्या कुटुंबाचा योगक्षेम चालवावा व रामनवमीचा उत्सव करावा, हा दिनकरबुवांचा परिपाठ असे व हीच वहिवाट त्यांच्या घराण्यांत अद्याप चालू आहे. दिनकरबुवांस एक मुलगा होता, त्याचें नांव रामचंद्र. बुवांचे शिष्य अनेक होते त्यांत हे रामचंद्रच मुख्य होत. हेही विद्वान् असून मोठे धर्मपरायण होते; तीर्थरूपांच्या पश्चात् सांप्रदायाची कामगिरी यांनीं उत्तम प्रकारें बजाविली.

दिनकरबुवांस तत्कालीन सरकारांतून व सरदार लोकांकडून इनाम जमिनी मिळाल्या, पण त्यांनीं त्यांचा स्वीकार केला नाहीं; दिलेल्या सनदा तशाच घरांत पडून राहिल्या. त्यांच्या कित्येक शिष्यांनीं आपलीं वतनें दिनकरबुवांस अर्पण करून दानपत्रें करून दिलीं, त्यांचीही व्यवस्था वरील इनामपत्रांप्रमाणेंच झाली. निस्पृहपणें धर्मोपदेश करून, केवळ परोपकारार्थ व ईश्वरसेवनांत ज्यानें आपलें आयुष्य घालविलें, त्याच महात्म्यास ‘ संत ’ व ‘ महंत ’ या पदव्या शोभतात, इतरांचे ठायीं त्यांचा विपर्यास मात्र होतो. दिनकरबुवा जसे मोठे महंत होते, तसेच ते कवीही होते. बुवांच्या कवितेसंबंधानें

त्यांच्या एका शिष्यानें म्हटलें आहे:–‘ नमनें ग्रंथ प्रबंध श्लोक वदले निपुण । करुनी स्वानुभवदिनकर भक्तिविवेक । कलापषोडश किरणें अष्ट दशक एक । ’ दिनकरबुवांनीं ‘ स्वानुभवदिनकर ’ नामक एक मोठा ओवीबद्ध ग्रंथ व श्लोक, पदें, अभंग वगैरे फुटकळ कविता पुष्कळ केली आहे. पैकीं स्वानुभवदिनकर हा ग्रंथ धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें हल्लीं प्रसिद्ध केला आहे. ह्या ग्रंथांत वेदांत व भक्तिमार्ग यांचें विवेचन फार उत्तम प्रकारें केलें आहे. ह्याचे १६ कलाप असून ८१ किरणें आहेत व ओवीसंख्या ८७५० आहे. ह्याशिवाय स्फुट श्लोक सुमारें ६२५ व अभंग, पदें मिळून ७५०, अशी एकंदर १०,००० कविता उपलब्ध झाली आहे. दिनकरबुवांची कांहीं कविता हिंदी भाषेंत आहे. ह्यांच्या कवितेचे मुख्य विषय भक्ति, ज्ञान, वैराग्य इत्यादि असून, त्यांचें पर्यवसान श्रीरामोपासनेंत झालें आहे. दिनकरांचे चिरंजीव रामचंद्र यांनींही बरीच कविता केली, तींतील थोडीशी उपलब्ध झाली आहे; त्यांत दिनकरबुवांच्या दोन आरत्या आहेत. एका आरतींत असे चरण आहेत:–‘दिनकर दिवाकर दीनबंधु दिनेशा । अपार नाममाला स्वयंज्योतिप्रकाशा । ’ यांतील पहिलीं चार नांवें दिनकरबुवांच्या कवितेंत, पदांच्या शेवटीं असलेलीं आढळतात. सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केलेल्या ‘रामदासी कविता, खंड १ ला’ या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत समर्थ शिष्यांची नामावली दिली आहे, तींत ‘ दिनकर, दिवाकर व बहिणाजी ’ अशीं तीन नांवें दिलीं आहेत; तीं कदाचित् एकट्या दिनकरबुवांचींच असण्याचा संभव आहे. दिनकरबुवा व त्यांचे चिरंजीव रामचंद्र यांशिवाय, त्यांच्या वंशांत पुढें कोणी कवि झाला नाहीं. या पिता–पुत्रांच्या समाधि तीसगांवापासून थोड्या अंतरावर आहेत. ह्यांचे वंशज

तीसगांवच्या राममंदिराचे मालक असून, ते ‘ रामदासी ’ उपनांवानें प्रसिद्ध आहेत. श्रीदिनकरबुवा रामदासी यांची वंशावळ येणेंप्रमाणें:—

- दिनकरबुवा.
  - रामचंद्र
    - बाबाजीबुवा
      - नारायणबुवा
        - राजाराम
          - भानुदास
            - बाळकृष्ण
          - रघुनाथबुवा
            - रामकृष्ण
              - सीताराम (विद्यमान.)
            - लक्ष्मणबुवा (विद्यमान.)
            - नारायण
            - गोविंद (विद्यमान.)
        - सखाराम
        - आत्माराम
          - श्रीराम
            - बाळकृष्ण
              - अण्णाबुवा (कडेकर.)

हल्लीं लक्ष्मणबुवा व सीतारामबुवा हे मंदिराची व्यवस्था पाहतात, व गोविंदबुवा हे तेथेंच सरकारी मराठी शाळेचे मुख्य शिक्षक आहेत.

## दिनकरबुवांची गुरुपरंपरा.
### ( रामचंद्रबुवांपासून चढती. )

' एवं रामचंद्र दिनकर रामदास । श्रीराम, वसिष्ठ, चतुर्मुख सर्वेश ।
परब्रह्म निर्गुण स्वयंप्रकाश । स्वानुभवीं दिनकरीं परिपूर्ण ॥ '

दिनकरबुवांची कविता अधिकारयुक्त दिसते, तींत उपमारूपकादि अर्थालंकार व अनुप्रासयमकादि शब्दालंकार बरेच आढळतात. कवीनें श्लोकरचनेच्या कामीं निरानिराळ्या वृत्तांचा उपयोग केला आहे. तथापि शुद्धाशुद्धाकडे फारसें लक्ष्य न दिल्यामुळें, एकंदर कविता रामदासी थाटास शोभेल, अशीच उतरली आहे. दिनकरबुवांची वर्णनशैली पुढील श्लोकांत दिसून येतेः—

प्रमाणिका.

' गिरी प्रशस्त साजिरे । जसे अढेच पांजिरे ॥
दरे कुट्या विशाळल्या । बऱ्या मनासि वाटल्या ॥
तरू प्रचंड दंडसे । उदंड जाड वाडसे ॥
फुलीं फळीं विराजती । सुगंध गंध माजती ॥
बहू विहंग गर्जती । मयूर फार गाजती ॥
झडाड वायु झाडितो । बळें तरू कडाडितो ॥
अशी वनांतरा बरी । हरीत रंग साजिरी ॥
प्रशस्त वाटली मना । पुरेचि कामकामना ॥

हें वर्णन, दिनकरबुवांनीं जेथें तपश्चर्या केली, त्या वृद्धेश्वरानजीकच्या अरण्याचें आहे.

दिनकरबुवा निस्सीम रामभक्त होते, त्यांस पुत्रप्राप्तीविषयीं व स्वानुभवदिनकर ग्रंथाविषयीं श्रीरामचंद्रांनीं वरप्रदान दिल्याचा उल्लेख त्या ग्रंथांत आहे. दिनकरबुवांस काव्यस्फूर्ति बालपणींच झाली असावी असें वाटतें. ह्यांच्या धार्मिक, दयाळू आणि वैराग्यशील वृत्तीसंबंधानें त्यांचे मातेनें काढिलेले उद्गार, त्यांनींच एका अभंगांत नमूद केले आहेतः—

'जननी म्हणे बापा ऐकें दिनकरा। अज्ञान तूं खरा कळलें मज ॥ १ ॥
मज शिकविसी दानधर्म करीं। लोक घरोघरीं पाहें कैसे ॥ २ ॥
कैसें पाहें जन नादे धनधान्यें। मिरविती भूषणें परोपरी ॥ ३ ॥
परोपरी कां रे छळिसी आम्हांसी। कायी या धर्मासी म्हणो तुझ्या ॥ ४ ॥
तुझ्यासंगें आम्हीं दिनकरा जाण। जालों हीन दीन माता म्हणे ॥ ५ ॥

पुढील श्लोकांतील उपदेश किती उदात्त आहे!

'जननिपद पराचे अंगनेलागिं द्यावें। परधन निजस्वार्थे स्वप्निंही नातळावें ॥
घडिघडि रसनेनें रामपीयूष घ्यावे। दिनकरमन रामीं रामरूप स्वभावें ॥१॥
मना मानसीं थोर धारिष्ट घ्यावें। मना हीन वाचाल्य सोडोनि द्यावें ॥
मना ज्ञान वैराग्यपंथीं भरावें। सदा सर्वदा रामदासीं भजावें ॥ २ ॥
मना सज्जना सज्जनीं सज्ज व्हावें। मतीहीन तात्पर्य सोडोनि द्यावें ॥
स्वधर्म स्वहीतार्थ रामीं रमावें। करावें असें तेंचि जालें म्हणावें ॥ ३ ॥

जाला अन्याय मोठा विषय विषकुटा सेविला म्यां वरिष्ठा।
तेणें योनी अचाटा प्रतिगमन कटा दैन्य तो योग खोटा ॥
जाणेना मी करंटा तवपदिं निकटा राहतां वीट मोठा।
तो वारीं शीघ्र ताटा दिनकर प्रभु तूं रामचंद्रा वरिष्ठा ॥ ४ ॥

दास्य ज्यासि न घडे जनकाचें। तेचि जाण सहसा जन काचे ॥
भावपूर्वक पुजी जनकासी। तोचि वास करितो जन काशीं ॥ ५ ॥
दास्य ज्यासि न घडे जननीचें। ते पडोत पतनीं जन नीचे ॥
भक्तिभाव हृदयीं जननीचा। देत उच्च पदवी जन नीचा ॥ ६ ॥
सुखमया समया जरि लाहिजे। तरि मना सुमना गति पाहिजे ॥
सुखरुपें स्वरुपें सुगतीसि ये। पतितही परि मोक्षनिवासिये ॥ ७ ॥
अपेयपाने पद ये विधीचें। तें कां करावें करणें विधीचें ॥
अभक्ष्य खातां जरि मोक्ष होतो। कां राक्षसांला तरि नर्क हो तो ॥ ८ ॥

समस्त व्यस्त अस्तवी। प्रशस्त वस्तु शस्तवी ॥
निबीड नित्य नूतनू। कविकृतांतसूदनू ॥ ९ ॥
सुगंध चर्चिलें खरा। न सोडि जेविं आखरा ॥
तसा मदांध बोधिला। परंतु तो भवाधिला ॥ १० ॥

*झडकरि झडकावें स्थीर कोठें न व्हावें ।
न पुसत सकळांला गुप्त होऊनि जावें ॥
स्थळगति न वदावी जावया यावयाची ।
प्रकटित न करावी मात जे अंतरींची ॥ ११ ॥

दिनकरकुलवल्ली लोळली अंगभारें । रघुविर अवतारें दाटली थोरथोरें ॥
सुखरुप सुखवासी राहिले योगराशी । सफळ शितळ छाया फावली रामदासीं १२

तोंडावरी थुंकुनि कान फुंकी । भोंदूनियां लोक जनीं विवेकी ॥
न ऊठती अंकुर फुंकिल्याचे । पळोनि जाती मग बोडकीचे ॥ १३ ॥

हा संसार पुढे पुन्हां तुजकडे येईल हें कें घडे ।
ऐसें जाणुनि रोकडें हरि कुडे चौऱ्यांशिंचें सांकडें ॥
रामीं चित्त बुडे विवेक उघडे अज्ञान तें वीघडे ।
ऐसें जेथ घडे दिवाकर म्हणे लागा त्वरें त्याकडे ॥ १४ ॥

## अभंग.

१

रामेविण जीणें व्यर्थ जनीं वनीं । मृत्तिकेसी धर्नी जाण बापा ॥ १ ॥
बाप माय राम सर्वांचा आधार । तयाचा अव्हेर करूं नका ॥ २ ॥
नका; रामेंवीण शीण असे थोर । म्हणे दिनकर रामदास ॥ ३ ॥

२

कीर्तना जावया नाहीं अराणूक । चाळणा अनेक संसाराची ॥ १ ॥
संसाराची चिंता स्वप्नींही सुटेना । करी विवंचना अंतवंत ॥ २ ॥
अंतवत राम नाचवी पापियां । दिनकरा माया करी ऐसें ॥ ३ ॥

---

* समर्थांचा उपदेश त्यांच्या शिष्यांच्या मनावर किती ठसला होता, याचें हें एक उत्तम उदाहरण आहे. समर्थांनीं आपल्या महंतांस पुनः पुनः उपदेश केला आहे कीं ' घरींच बैसतां खोटें ब्राह्मणु हिंडतां बरा; ' ' वोळखी कराव्या दाटा एके ठायीं स्थिरों नये; ' ' हिंडतां पारखी लोकां कार्यकर्ता जिवीं धरी. ' ' चाळणा करावी सर्वें एकांतीं राहतां बरें । एकांत मानला ज्याला त्याला साधे हलुहलू ' ॥

३

परा द्वार साधूं जाणे । तोचि साधु पूर्णपणें ॥ १ ॥
तैसे साधु कोण पुसे । ज्यासि स्वरूपज्ञान नसे ॥ २ ॥
परात्पर पराद्वारें । प्राप्त होतसे विचारें ॥ ३ ॥
गुरुविण न कळे हें भडस । म्हणे दिनकर रामदास ॥ ४ ॥

४

समाधानापरतें सुख । पाहतां न दिसे निःशेख ( ष ) ॥ १ ॥
कालत्रयीं अबाधित । रामें केलें सदोदित ॥ २ ॥
ज्ञान ज्ञेयीं हरपलें । ज्ञेय ज्ञानीं सामावलें ॥ ३ ॥
दिनकर रामीं रामदास । जनीं वनीं उदास ॥ ४ ॥

५

आत्मज्ञानेंविण नर । नर नव्हे खरा खर ॥ १ ॥
व्हावें सावध नरदेहीं । आयुष्य जातसे लवलाहीं ॥ २ ॥
गेली घटिका नये पुढें । स्वहित करावें रोकडें ॥ ३ ॥
दिनकर ज्ञानेंविण । न चुके जन्ममृत्यु शीण ॥ ४ ॥

६

बहुत काळ गेला उरलासे थोडा । चांडाळाच्या तोंडा राम नये ॥ १ ॥
निंदेचा हव्यास करी रात्रंदीस । न सोडी कास (?) कीडा जेवीं ॥ २ ॥
तेवीं पापियाचें जीणें कुंभिपाकीं । दिनकरा निकी रामसोय ॥ ३ ॥

७

रिता अर्थ पराहातीं । देउनि करी कुंथाकुंथी ॥ १ ॥
कैसें पाहें पां नवल । सूर्य अंधारें व्याकुळ ॥ २ ॥
इच्छा धरितां व्याजाची । हानी होतसे मुद्दलाची ॥ ३ ॥
दिनकर रामदास म्हणे । दिवाळखोरीं हें करणें ॥ ४ ॥

## पदें.

१

तोंचि दिजे गुरुराजें । अपराजित महाराजें ॥ ध्रु० ॥
वेद निरंतर स्तविति अगोदर । गोचर नव्हे कधीं जें ॥ १ ॥
चराचरीं अनुपम्य परात्पर । अक्षर क्षर नव्हे जें ॥ २ ॥
दिनकर चरणीं होउनि सादर । मागति सनकादिक जें ॥ ३ ॥

२

सदाशिवं मनिं धरिं मनुजा । सोडीं जाया अनुजा ॥ ध्रु० ॥
बहुकाळ गेला भोगितां यातना । नोळखतां सनातना ॥ १ ॥
नरदेहसार पुढें न लाहे । हित करिं लवलाहें ॥ २ ॥
दिनकर म्हणे शिकविलें अनुभवीं । न बुडे सत्य तो भवीं ॥ ३ ॥

३

करुणालया रे रामराया ॥ ध्रु० ॥
चौऱ्यांशिं लक्ष दुस्तर योनी । केसें कीजे निस्तराया ॥ १ ॥
प्राकृत हीन पतित प्राणी । भव भय भीति तराया ॥ २ ॥
दिनकर म्हणे कृपा करुनियां । उपाय सांगत राया ॥ ३ ॥

( हिंदी )

४

दूरि करो गुमराई ॥ बाबा ॥ ध्रु० ॥
नाढे बातसें कछु नहिं काम । अच्छि हे गरिबाई ॥ दुरि० ॥ १ ॥
बुरे फेलसें कौउन जिके । जमकि बुरी खसलाई ॥ २ ॥
कहे दिनकर एक राम भजनबिन । झूटी सब चतुराई ॥ ३ ॥

५

करम करामति काम कुसंग । त्यजिं भज राम अनंत अभंग ॥ ध्रु० ॥
निशिबासर यहि बाणि बखान । रामहि रामसुधारसपान ॥ १ ॥
सारसुधारससें अगणित । दीन दिवाकर सो सुख लेत ॥ २ ॥

“ स्वानुभवदिनकरां ”तील निवडक ओंव्या.

श्रीराम जयराम जयजयराम । नित्य स्मरणाचा हाचि असावा नेम ।
त्यावांचूनि मिथ्या श्रम । वायांवीण करूं नये ॥ १ ॥
वैराग्य करावें विवेकयुक्त । प्रतिज्ञा म्हणवावें श्रीरामभक्त ।
पदार्थमात्रीं कदापि आसक्त । प्राणांतींही न व्हावें ॥ २ ॥
जितुकी गोष्टी मुखें बोलावी । तितुकी क्रिया करूनि दाखवावी ।
सत्क्रिया उत्तरोत्तर वाढवावी । धर्मशास्त्रें विचारेंशीं ॥ ३ ॥
या लोकांचे ठायीं नाहीं एक निश्चय ।
म्हणोनि यांसी होतीं नाना अपाय ।

तऱ्ही आपुल्या स्वहिताचा उपाय । प्राणांतींही न देखती ॥ ४ ॥
आपणासी लागला रोग क्षय । वैद्य दुसऱ्यासी करी औषधोपाय ॥
आयुष्य भविष्यतेचा अन्वय । नाडिज्ञान निदानेंशी ॥ ५ ॥
पराव्यासि नाना उपदेश करिती । कर्तव्य न कर्तव्या स्थापिती ।
परी आपुला मूलान्वय न विचारिती । गर्हीसपणें मूर्खत्वें ॥ ६ ॥
दीप घरच्यांसी करी सभोंता उजेड । परी अंधारें व्यापलें तें न देखे बुड ।
तेवीं आपुलें स्वहित न जाणोनि मूढ । आणिकां बोधिती नानापरी ॥ ७ ॥
तऱ्ही कोण्हीएकीं ऐसें न करावें । संसारीं आलियातें सहज स्वभावें ।
अनन्य भावें स्वहित साधावें । शरण रिघोनी श्रीगुरुसी ॥ ८ ॥
मनाचा स्वभाव चंचळ आहे । मन क्षणैकही निश्चळ न राहे ।
अवस्तुसी वस्तुत्वें पहात राहे । आणि वस्तुसि विसरे तत्काळ ॥ ९ ॥
म्हणोनि हें चित्त जिंकिल्याविण । जितुकें साधन तितुका शिण ।
अभिनिवेशासीच होय कारण । तेथें परमार्थ कैचा ॥ १० ॥
केवढा या चित्ताचा चमत्कार । महा तपस्वियांही तत्काळ करी असुर ।
आणि गृहस्थाश्रमीयां करूनि योगेश्वर । दैवी संपत्ती त्यां देतसे ॥ ११ ॥
अहो न होतां चित्त हें आपवर्गे । त्रिभुवन विजयासी होती उपसर्ग ।
नहुष पावलीयाहीवरी स्वर्ग । चित्तें तत्काळ पाडिला ॥ १२ ॥
असो, करावयासी मनोजय । मुख्य पाहिजे सत्संगाची सोय ।
सत्संगें संसारवासनात्यागाचा अन्वय । सहजचि साधे ॥ १३ ॥
संतीं संसार केला मोक्षरूप । संतकृपा शीतळ त्रिताप ।
स्वानुभवें दिनकरा ऐसें पडप । सद्गुरूचिया अनुग्रहें ॥ १४ ॥
संत विवेकाचे आगर सदा । सारासारविचार नित्य धंदा ।
दृष्टिमात्रें संसारदैन्य आपदा । भाविकांची निरसिती ॥ १५ ॥

## सच्छिष्यलक्षण.

अध्यात्मग्रंथांची आवडी । लिहिण्या वाचण्याची गोडी ।
आश्रमधर्माची परवडी । यथायुक्तपणें ॥ १ ॥
प्रपंचावरी नित्य उदास । संसाराचा अत्यंत त्रास ।
नाना सायासें परमार्थास । लिगटोनि जाणें ॥ २ ॥

**कार्य करूनि अतिसावध। राजकारणीं असोनि विविध।**
**साबडेपणीं अतिसावध। वेष भाविक बावळा ॥ ३ ॥**
जो सत्य साचार सात्त्विक। ज्यासी कदा काळीं नावडे दांभिक।
भोळा साबडा भाविक। तो सच्छिष्य जाणिजे ॥ ४ ॥

समर्थांप्रमाणें त्यांचे शिष्यही राजकारणी असत, ह्या विधानाला हा एक सबळ पुरावा आहे. परमार्थ साधीत असतां राजकारणें करावयाचीं हा समर्थसंप्रदायाचा मुख्य विशेष होय व ही संप्रदाय-परंपरा दिनकरबुवांनींही चालविली होती, हें वर दिलेल्या मोठ्या अक्षरांतल्या ओवींवरून स्पष्ट होत आहे.

## कलियुगवर्णन.

कलियुगीं परमायुष्य वर्षे शंभर। अन्नमय प्राण वर्ते साचार।
बौद्ध आणि कल्कि अवतार। या कलियुगामाजी ॥ १ ॥
कलियुगीं पुण्याची वार्ता बुडाली। पापाची वृद्धि फार झाली।
सांगतां या कलियुगाची चाली। चित्त कांटाळे सर्वथा ॥ २ ॥
बोलतां कलीचें महिमान। धर्म झाला कंपायमान।
**जे युगीं राजा यवन। तेथें अन्य वार्ता कायसी? ॥ ३ ॥**
जे युगीं देवधर्म बुडाले। अवघे एकंकार जाले।
सत्य जातीनिशीं हारपलें। स्वधर्मासकट ॥ ४ ॥
ब्राह्मण कर्मभ्रष्ट झाले। स्वाहा स्वधाकार राहिले।
वर्णाश्रमधर्म बुडाले। जातीकुळेंशीं ॥ ५ ॥
राजा देवद्रोही जाला। देवस्थळांचा उच्छेद केला।
तीर्थमहिमा सकळ मोडिला। ठायीं ठायींचा ॥ ६ ॥
राजांचीं अनेक बंडें जालीं। गो ब्राह्मणावरी पालाणें पडिलीं।
पृथ्वी हलकल्लोळ जाली। कोणी नव्हे कोणाचें ॥ ७ ॥
पर्जन्याचें अवर्षण अखंड। राजा प्रजा लोक दुखंड।
पृथ्वी जाली शतसहस्र खंड। सौख्यवार्ता न दिसे ॥ ८ ॥
कुलस्त्रिया भ्रष्टविल्या यवनीं। ब्राह्मण जाले दासीगमनी।
अंत्यजाचे गृहीं उत्तम वर्णी। बलात्कारें भ्रष्टिजे ॥ ९ ॥

तेणें जाला वर्णसंकर । वृद्धी पावला अनाचार ।
परस्त्री परद्रव्यापहार । परन्यून स्वेच्छा बोलती ॥ १० ॥
कुलवधू निर्लज्जा जाल्या । त्या हीन यातींशीं रतल्या ।
लोकापवादें भ्रष्टल्या । देशोदेशीं फिरती ॥ ११ ॥
श्रीपाद जाले द्रव्याभिलाषी । साळी कोष्टी जाले जटिल संन्यासी ।
ब्राह्मण फिरती देशोदेशीं । उपार्जना करित ॥ १२ ॥
तीर्थक्षेत्रें व्रतें उद्यापनें । सकळही उच्छेदिलीं यवनें ।
धर्मचर्चा पुराणश्रवणें । कथा कीर्तनें राहिलीं ॥ १३ ॥
अवघा जाला धुंधुकार । कोणाचें कोणी नायके उत्तर ।
बाहेर घालूनि माता-पितर । सासू-सासरा पाळिती ॥ १४ ॥

या ओंव्यांवरून, विजापूरच्या आदिलशाही अंमलामुळें महाराष्ट्रास जी शोचनीय अवस्था प्राप्त झाली होती, तिची कांहींशी कल्पना होते. ह्या धर्मच्छलाचें वर्णन एकनाथ व समर्थ यांच्या ग्रंथांतही आढळतें.

दिनकरबुवांनीं ज्या स्वानुभवदिनकर ग्रंथांत वरील उद्गार काढले आहेत, तो ग्रंथ त्यांनीं शके १६११ (इ० स० १६८९) त लिहिला; ह्या वेळीं मोगलांचा उपद्रव पुष्कळच कमी झाला होता. शिवाजी महाराजांना समाधिस्थ होऊन या वेळीं १४ वर्षे झालीं होतीं व त्यांच्या मृत्यूनंतर संभाजीच्या कारकीर्दीत व त्याच्या पश्चात् राजारामाच्या कारकीर्दीच्या आरंभीं, अहमदनगर येथें येऊन राहिलेल्या औरंगजेबाच्या लष्करानें महाराष्ट्रांत जो धुमाकूळ माजविला. त्यास अनुलक्षून दिनकरबुवांनीं वरील उद्गार काढले असावेत असें वाटतें. यवनांकडून होत असलेल्या धर्मच्छलाचीं हीं त्वेषजनक वर्णनें वाचून, तत्कालीन महाराष्ट्रीयांच्या अंगावर शहारे येत असले पाहिजेत हें उघडच आहे व स्वराजस्थापनेच्या कामीं असल्या लोकांच्या मनःस्थितीचा फायदा शिवाजीमहाराजांस पुष्कळच झाला असला पाहिजे, यांत शंका नाहीं.

मातापुरची देवी ही दिनकरबुवांची कुलस्वामिनी होय. हिचें ठाणें भिंगारानजीक सारोळें ( वद्दी ) येथें असल्याचा उल्लेख स्वानुभवदिनकराच्या प्रथम कलापांत केला आहे. ' तेंचि नाम ( येमाई ) अद्यापि महागजरीं । भक्त वाखाणिताति परोपरी । ते भृगुवंशींचे वत्स गोत्र असती भिंगारीं । ज्योतिषी उपनामक पाठक ॥ १ ॥ ज्यांची भक्ति देखोनि उत्कट । आदिमाया सोडोनियां मूळ पीठ । सारोळें अधिष्ठान अति निकट । भक्तसाह्यतेकारणें ॥ २ ॥ ते भृंगारीहूनि आग्नेयी दिशेसी । सारोळ असे क्रोशत्रयेंसी । तेथ अधिष्ठान धरणें आदिमायेसी । निजभक्तरक्षणानिमित्त ॥ ३ ॥ ते आदिमाया विश्वसंजीवनी । दिनकरें पूजिली सकळ उपचार योजुनी ॥' स्वानुभवदिनकराच्या १३ व्या कलापाच्या ४ थ्या किरणांत स्वामींनी आपली वंशपरंपरा दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

त्या भृगुऋषींचें निवास क्षेत्र । भृंगार नामें अति पवित्र ।
जेथील रचना अनादि विचित्र । पुराणप्रसिद्ध जें असे ॥ १ ॥
तेथें भृगुऋषीनें केलें पुरश्चरण । त्याच पुण्यें त्रिजगतीं विस्तारलें गहन ।
तया पुण्यप्रभवें वंश सकल पावन । अद्यापि चालतसे ॥ २ ॥
वाजसनेयी शाखाध्ययन । वत्सगोत्री विराजमान ।
गणक ज्योतिर्विद विद्वज्जन । महापुण्यप्रतापी ॥ ३ ॥
तोचि वंशी उपनाम पाठक । जनार्दन नामें पुण्यश्लोक ।
जो पुरश्चरणी सूर्य उपासक । प्रतिज्ञासूर्य केला उभा ॥ ४ ॥
वाराणसी यात्रेचिया विलासे । ब्राह्मणसंतर्पण करितां हव्यासें ।
तेणें ऋण झालें अतिविशेषें । तेंही मागों आदरिले ॥ ५ ॥
केला तिहीं बहुताचि निग्रह । आण शपथ दुराग्रह ।
तें सूर्यासी जालें दुःसह । तो खोळंबला प्रहर एक ॥ ६ ॥
तेणें चकित जाले सकळ लोक । तत्काळ ऋण जालें फारिक ।
क्षणमात्र जेथील तेथें सम्यक । सूर्यगमन पश्चिमे ॥ ७ ॥
असो, तोचि वंशीं कोनेरी पाठक । ज्याच्या दर्शनमात्रें होईजे पुण्यश्लोक ।
जन्मांतर ब्रह्मसमंधादि अनेक । कित्येकांचे नाशले ॥ ८ ॥

कित्येकांसी जाले चमत्कार । ब्रह्मराक्षस राहों न शकती समोर ।
ज्याचे घरीं दरवडा येतां चोर । निर्बंधनेसी बांधिले ॥ ९ ॥
त्याचे वंशीं नरहरी पाठक । सुब्राह्मण गणेश उपासक ।
स्नानसंध्या शुचिर्भूत सम्यक । वेदशास्त्रसंपन्न ॥ १० ॥
द्वारका नाम निजभार्या । जे सकल पतिव्रतांमाजी आर्या ।
पतिसेवापरायण निजधैर्या । धरूनि स्वधर्मतत्पर ॥ ११ ॥
तियेचे उदरीं जाला दिनकर । जो का रामदासाचा नित्य किंकर ।
रामीरामदासकृपा स्वानुभवदिनकर । कलापकिरणें प्रकाशिलीं ॥ १२ ॥
तो स्वानुभवदिनकर संपूर्ण । दिनकरें रामचंद्र निजात्मजेशीं आपण ।
रामचंद्रीं करूनियां समर्पण । निजऐक्यता सहज स्थिती ॥ १३ ॥

दिनकरबुवांस श्रीरामचंद्राचें वरप्रदान मिळालें तो प्रसंगः—

असो ऐक्यपणें श्रीराम । शब्द बोलिले निस्सीम ।
दिनकरा तुझे पूर्ण काम । होतील सर्वदा ॥ १ ॥
यया वाक्यामृततुषारें । साजेपणें सुकृतेनि अंकुरें ।
जी जी म्हणोनि दिनकरें । होईजे पुढां ॥ २ ॥
तेंव भक्तिभावभुवन दीपें । जगज्जनक त्रिभुवनभूपें ।
प्रसन्नता दिधले निजकृपें । वरदत्रय ॥ ३ ॥
प्रथम स्वानुभवदिनकर । ग्रंथ वदसी परिकर ।
तो स्वानुभवैक प्रकाशेल साचार । दिवाकरोपम ॥ ४ ॥
दुजें याचे श्रवणमननें निजध्यासें । निजसाक्षात्कार पाविजेल अनायासें ।
इहपरत्र परमसंतोषें । सुख लाधसी निश्चयें ॥ ५ ॥
तिजें एकवेळ निजानंदेंसी । सुखें अवतरेन तववंशीं ।
श्रीरामरूपें दिनकरासी । त्रिवरद भाष ॥ ६ ॥
केवळ चंचळपणें पाहतां । श्रीराममूर्ति न लक्षे तत्त्वता ।
मग अंतरीं निजनामें ऐक्यता । स्मरिलें भावें ॥ ७ ॥
तिया नामस्मरणाचे सरिसें । क्षणे दृष्टीचा मळ लागेल ऐसें ।
श्रीरामरूप देखिलें वृत्ति समरसें । देदीप्यमान ॥ ८ ॥

स्वानुभवदिनकर ग्रंथांत कवीनें स्वतःस 'दिनकर रामदास' म्हटलें आहे; 'अहो सर्वीं असोनि सर्वातीत। एक रामदास सद्गुरु इत्थंभूत। म्हणोनि स्वानुभवदिनकरीं आद्यंत। दिनकर रामदास बोलिजे. ॥'

राजकीय धामधुमीच्या दिवसांत सामान्य लोकांनीं कसें वागावें हें दिनकरबुवांनीं खालील पद्यांत सांगितलें आहे:—

श्लोक. ( प्रमाणिका. )

जयाकडे समर्थ राम। त्यासि काय धामधूम।
मुढासि हे परंपरा। त्यजूनि निश्चयो खरा ॥ १ ॥
सहाय राम तो कुळीं। करील काय रे हुली।
उगीचि कां भरीं भरा। त्यजूनि निश्चयो खरा ॥ २ ॥
करील राम तें खरें। अचूक तें विधीस रे।
उगाचि संशयो नरा। त्यजूनि निश्चयो खरा ॥ ३ ॥
उठेल तें सुखें उठो। लुटेल तें सुखें लुटो।
नये दुरुक्ति अंतरा। त्यजूनि निश्चयो खरा ॥ ४ ॥
जनीं वनीं निरंजनीं। नियंत राम रक्षणीं।
छळाल कां दिवाकरा। त्यजूनि निश्चयो खरा ॥ ५ ॥

ह्या निश्चयपंचकांत वर्णिलेली ही धामधूम कोणती असावी बरें? हे परंपरेस चिकटणारे मूढ लोक कोण? त्याचप्रमाणें, दिनकरबुवा जो निश्चय करावयास सांगतात, तो कोणता? निजामशाहीच्या अंत्यावस्थेंतील बेबंदशाहीसंबंधानें हे उद्गार असावेत असें रा० रा० अ० बा० रसाळ यांचें मत आहे. पण मला वाटतें, संभाजीचा वध झाल्यावर मोगल सैनिकांनीं महाराष्ट्रांत जो बेबंद धुमाकूळ माजविला होता, त्यास अनुलक्षून दिनकरबुवांनीं हे उद्गार काढले असावेत. रामदासी संप्रदायाचें सामर्थ्य कशांत होतें, हें या उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. 'जनीं वनीं निरजनीं राम रक्षण

करण्यास समर्थ आहे ' अशी दृढ भावना असलेल्या दिनकरबुवां-सारख्या समर्थशिष्यानें 'छळाल कां दिवाकरा । त्यजूनि निश्चयो खरा ।' असा बाणेदारपणाचा प्रश्न करावा, हें अगदीं साहजिक आहे. हल्लीं राजकीय बाबतींत पडणाऱ्या आमच्यांतील पुढाऱ्यांच्या अंगीं हें निश्चयाचें बळ अगदीं क्वचित् दृष्टीस पडतें; कारण त्यांस उपासनेचें सामर्थ्य नाहीं. ' उपासनेला दृढ चालवावें; ' ' पहिलें तें हरिभजन । दुसरें तें राजकारण; ' हा समर्थांनीं सांगितलेला महाराष्ट्र-धर्म आजच्या महाराष्ट्रीयांसही सर्वस्वी अनुकरणीय आहे; किंबहुना ह्या धर्माच्या अवलंबनाशिवाय ' धामधुमीच्या दिवसांत मनाचें स्वास्थ्य अढळ ठेवण्याइतकी विवेकशक्तीची जागृति व दुरुक्तीचा उच्चार न होण्याइतका निश्चयाची दृढता कोणत्याही समाजधुरीणास प्राप्त होणार नाहीं. ' समर्थांच्या कर्तृत्वाचें प्रतिबिंब त्यांच्या शिष्यवर्गाच्या अंतःकरणावर इतकें स्पष्टपणे उमटलेले पाहून, खुद्द समर्थांच्या अंतःकरणाची स्थिति किती उदात्त आणि निश्चयपूर्ण असली पाहिजे, याची कल्पना सहज होते. वरील निश्चयपंचकांत जी तेजस्विता आणि जें आत्मविश्वासाचें बळ प्रदर्शित झालें आहे, तो सगळा उपासनामार्गाचा प्रभाव होय. स्वतःच्या सामर्थ्यावर पूर्ण श्रद्धा असणें, हें दैवी प्रसादाचें निदर्शक होय; व हा दैवी प्रसाद उपासनेशिवाय प्राप्त होणें दुरापास्त होय. महाराष्ट्रीयांनीं ह्या गोष्टीचा अवश्य विचार करावा.

शके १५६४ त भिंगार येथें दिनकरबुवांनीं भागवत ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आढळतो. त्यांस शके १५७६ त समर्थांचा अनुग्रह झाला व शके १६१६ त त्यांनीं स्वानुभवदिनकराची रचना केली, हे पूर्वी सांगितलेंच आहे. शके १६१२ ते १६१८ पर्यंत त्यांच्या नांवाचा उल्लेख कागदपत्रीं आढळतो; पुढें त्यांचे चिरंजीव रामचंद्र यांचेंच नांव सर्वत्र आढळतें. दिनकरबुवा हे रामदासी संप्र-

दायी असतां, पंढरपुरवर्णन व पांडुरंग यांवर त्यांनीं पुष्कळ कविता केली आहे व यावरून रामदासी व वारकरी संप्रदायांतील विरोधाभास म्हणजे अज्ञान लोकांनीं उत्पन्न केलेला केवळ आभासच होय, हें अगदीं स्पष्ट होतें. दिनकरबुवांची एकंदर कविता सुमारें १०००० असून, ती, शेवगांव जिल्हा अहंमदनगर येथील शिक्षक रा० रा० अ० बा० रसाळ यांनीं मोठ्या परिश्रमानें मिळविली आहे. प्रस्तुत चरित्रलेखही रा० रसाळ यांच्याच श्रमाचें फल होय, हें मी येथें कृतज्ञतापूर्वक नमूद करितों.

तीसगांव येथें दिनकरबुवांच्या घराण्यांतील पुरुषांच्या तीन चार समाधि जवळ जवळ आहेत, त्यांत दिनकरांची समाधि कोणती, हें समजण्यास साधन नाहीं. जी समाधि सर्वांत जुनी दिसते, तीच बहुधा दिनकरांची असावी, असें वाटतें. यांपैकीं एका समाधीवर पुसट अक्षरांनीं लिहिलेला एक श्लोक आहे, तो असा:—

‘ बाह्या तिथी कृष्ण जुग्राथ ज्येष्टा । त्रिसष्ट सोळा छके काल पुष्टा ॥
दिना दास राम प्राण जाला । श्रीरामचंद्रस्वरुपीं मिळाला ’॥

परंतु हा श्लोक ज्या समाधीवर आहे, ती दिनकरबुवांची नसावी असें वाटतें; कारण ‘ त्रिसष्ट सोळा ’ म्हणजे शके १६६३ हा दिनकरांचा समाधि शक मानिल्यास, निधनकालीं त्यांचें वय १००—१२० वर्षांहून अधिक होतें, असें म्हणावें लागेल. ‘ दिनादास राम प्राण जाला ’ ह्या चरणांतील ‘ दिनादास ’ हें नांव दिनकरबुवांच्या कवितेंत कोठेंही आढळत नाहीं. तेव्हां ‘ दिनादास ’ म्हणजे दिनकरांचा शिष्य व पुत्र जो रामचंद्र, त्याची ही समाधि आहे, असें समजणें अधिक सयुक्तिक होईल. शेवटीं रामचंद्रबुवांनीं दिनकरबुवांवर लिहिलेली एक आरती येथें देऊन हा लेख पूर्ण करितों:—

'ब्रह्मज्ञाना आगर सागर शांतीचा । कृपेचें माहेर उदधि करुणेचा ।
शरणागत जनवत्सल मेरू सत्त्वाचा । विवेकाचा नायक दायक मुक्तीचा ॥ १ ॥
जयदेव जयदेव जयजय गुरुदेवा । जय दिनकरदेवा ।
निजभावें आरति तुज देसी निज ठेवा ॥ धु० ॥
नित्यानित्यविचारें निजसुख दाविसी । मी मम निरसुनि माझे आत्मत्व देसी ।
जिवशिव भेदाभेदें स्वरूपी नुरवीसी । स्वानुभवें निजैक्य परब्रह्मेंसी ॥ २ ॥
निजदासादिव स्वामी दीनाचा । म्हणुनि दिनकरस्वामी आळविती वाचा ॥
देवभक्तां ऐक्य करिसी तू साचा । दिनकरनंदन राम शरण त्रिवाचा ॥ ३ ॥

महिपतींनीं आपल्या संतविजयाच्या १३ व्या अध्यायांत समर्थ-शिष्याची नामावळी दिली आहे, तीत 'दिनकर असती तिसगांवीं असा स्पष्ट उल्लेख आहे.

दिनकरबुवाचे चिरंजीव रामचंद्रबुवा यांचा ' श्रीसीतारामसंवाद ' नामक एक ३२ अध्यायाचा ओवीबद्ध ग्रंथ रा० रसाळ यांस उपलब्ध झाला आहे, त्यांत दिनकरबुवा व श्रीसमर्थ यांच्यासंबंधानें बरीच नवीन माहिती आहे, असे समजते. अमृतराय या नांवाचे दोन कवि झाले यांबद्दलही सदर ग्रंथांत चांगला पुरावा आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या चौथ्या भागांत रामचंद्रबुवांचे चरित्र देण्याचा विचार आहे, तेव्हा ह्या मुद्यांचा विचार करूं



# शिवरामस्वामी कल्याणकर.

शंभुसखीं धनदींहि न तें जें निजवित्तज यश **शिवरामीं** ।
भुललों यातें जाणुनि निर्मळता चित्तजय शशिवरा मी ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

हे प्रसिद्ध सत्पुरुष इसवी सनाच्या सतराव्या शतकांत कलबुर्गा येथें होऊन गेले. हे रामदास, तुकाराम, केशवस्वामी, वामन, रंगनाथ इत्यादि सत्पुरुषांचे समकालीन असून, त्यांचा व यांचा चांगला परिचय होता. कलबुर्गा प्रांतीं 'महागांव' नामक एक गांव आहे, तेथें तिम्मण दीक्षित व राम दीक्षित या नांवाचे दोन बंधु रहात असत; पैकीं तिम्मण दीक्षितांस जानकीच्या उदरीं नारायण दीक्षित हे पुत्र झाले. ह्यांनीं आपली जोशीपणाची वृत्ति उत्तम प्रकारें चालविली. डंबळगांवचे बाळकृष्णपंत चंद्रकेत यांची मुलगी लक्ष्मी ही नारायण दीक्षितांस दिली होती. ह्या नारायण दीक्षितांचे वडील व मातुश्री हीं उतार वयांत काशीस जाऊन राहिलीं होतीं, त्यांचे भेटीस एकदां नारायण दीक्षित गेले असतां, तेथें त्यांस उपरति होऊन, ब्रह्मानंदस्वामींकडून त्यांनीं संन्यास-दीक्षा घेतली व तेव्हांपासून पूर्णानंद या नांवानें ते प्रसिद्धीस आले. ब्रह्मानंद स्वामी काशींत समाधिस्थ झाल्यावर पूर्णानंद कल्याणास आले व आपल्या मुलांबाळांस भेटून गांवाबाहेर मठांत राहूं लागले. पूर्णानंद यांस पूर्वाश्रमी संतती झाली, ती येणेंप्रमाणें:—१ तिम्मणभट्ट २ कृष्णाबाई ३ अनंतभट्ट ४ विवेकंमा ५ रामभट्ट ६ गोदूबाई ७ शिवरामस्वामी.

शिवरामस्वामींची वृत्ति प्रथमपासूनंचं भगवत्परायण होती. 'पुढें ते मामलेदार झाले होते, पण लवकरच ती जागा सोडून

त्यांनीं पूर्णानंदस्वामींचा अनुग्रह घेतला ' असें काव्यसंग्रहांत लिहिलें आहे. शिवरामस्वामी एकदां पंढरपुरास गेले असतां, विजापुरचे कारभारी रुक्मणापंत यांशीं त्यांची गांठ पडली. रुक्मणापंत हे साक्षात्कारी पुरुष असून परमभागवत होते. त्यांच्या सहवासांत कांहीं वर्षे काढल्यावर शिवरामस्वामींचें परमार्थाकडे विशेष लक्ष्य लागत चाललें व पुढें त्यांनीं आपले तीर्थरूप पूर्णानंदस्वामी यांजकडून उपदेश घेतला. शिवरामस्वामींस पार्वती व सावित्री अशा दोन स्त्रिया होत्या. भागानगरच्या तानाशाचे कारभारी प्रसिद्ध साधु केशवस्वामी भागानगरकर यांचा शिवरामस्वामींवर विशेष लोभ असे. शिवरामस्वामींची गुरुपरंपरा पुढें दिल्याप्रमाणें:—

१ शिव
|
२ दत्तात्रेय
|
३ सदानंद ( १३३० )
|
४ रामानंद (१३५०)
|
५ अमलानंद ( १३७० ) — कबीर (१३७०)
|
६ गंभीरानंद ( १४०० )
|
७ ब्रह्मानंद ( १४३० )
|

८ सहजानंद ( १४६० ) राजेबासकरांचे गुरु.
|
९. पूर्णानंद ( १४९० )
|
१० ब्रह्मानंद ( १५२० )
|
११ पूर्णानंद ( १५५० )
|
१२ शिवरामस्वामी ( १५८० )
|
१३ राजमणी ( शिवमोग्गीकर )
|
१४ वैकुंठ
|
१५ केशव

शिवरामस्वामी कल्याण येथेंच समाधिस्थ झाले. शिवराम स्वामींची कविता पुष्कळ आहे व ती बहुतेक अद्याप अप्रसिद्ध आहे. शिवरामस्वामींच्या शिष्यपरंपरेचे कांहीं लोक हैदराबाद ( भागानगर ) येथें राहतात, त्यांजपाशीं शिवरामस्वामीचें एक ओवीबद्ध विस्तृत चरित्र आहे, असें समजतें.

'महाराष्ट्रकवि' चे संपादक रा० भावे यांनीं महाराष्ट्र काव्य-ग्रंथांची एक यादी प्रसिद्ध केली आहे, तींत शिवरामस्वामींच्या नांवावर पुढील ग्रंथ दिले आहेत:—

१ गंडिकाख्यान श्लोक ( काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालें आहे. ) २ नानासाहेब पेशव्यास उपदेश, ३ पदें, ४ मुद्रिका, ६ रामजन्म

कटाव, ६ हस्तामलकाचें भाषांतर, ७ आत्मबोध श्लोक, ८ मनीषापंचक श्लोक, ९ शुकाष्टक, १० रामतुळसी अभंग, ११ बोधबासष्टी, १२ शिवामृत, १३ उद्बोधदीपिका.

या ग्रंथांपैकीं १ गंडिकाख्यान व २ नानासाहेब पेशव्यांस उपदेश हे ग्रंथ शिवरामस्वामी कल्याणकरांचे असतील असें वाटत नाहीं. रामदास–शिवाजीशीं समकालीन असलेले शिवरामस्वामी इ०स०१७४०त पेशवे पदारूढ होणाऱ्या नानासाहेब पेशव्यांस उपदेश करण्यास हयात होते, हें संभवनीय दिसत नाहीं. अर्थात् शिवराम या नांवाचा दुसरा कोणी तरी कवि होऊन गेला असला पाहिजे, हें उघड आहे. पुण्यानजीक मुळा नदीच्या कांठीं पौड नामक गांव आहे, तेथें ‘ दीननारायण ’ नामक एक कवि ८० वर्षांपूर्वी होऊन गेला, त्याच्या घरीं ‘ शिवराम ’ नांवाचे एक सत्पुरुष काहीं वर्षे राहिले होते व त्यांच्याच सहवासामुळें दीननारायणाची कवित्वाकडे प्रवृत्ति झाली, अशी माहिती मिळते; व ह्यावरून नानासाहेबांस उपदेश करणारे ‘ शिवरामस्वामी ’ ते हेच असावेत; असें वाटतें. ह्या शिवरामाची बरीच कविता पौड येथें आहे. असो.

शिवरामस्वामी कल्याणकरांची कविता अगदीं सुलभ व प्रासादिक अशी आहे. त्यांनीं ठिकठिकाणीं आपले गुरु पूर्णानंद यांच्याही नांवाचा उल्लेख केला आहे. ‘ रामदासस्वामींची बखर ’ या ग्रंथांत शिवरामस्वामींची थोडीशी माहिती दिली आहे ती वाचकांनीं अवश्य पहावी. शिवरामस्वामींचीं कांहीं पदें पुढें दिलीं आहेत:—

## पंचपदी.

१

गुरु अरुणोदय काळीं शिवगुरुवर गीतीं गावा ।
स्वहिताकारणें आपुला आपण विचार करावा ॥ ध्रुं० ॥

इंद्रियांसकट स्थूल नव्हे मी जाणता त्याचा ।
याचें कारण विराट नोहे मी देखणा त्याचा ॥ १ ॥
मनबुद्धि दों वृत्तिंसि जाणे अंतःकरणाच्या ।
कारण हिरण्यगर्भ तयाचा साक्षी मी साचा ॥ २ ॥
स्वरुपीं कांहीं विस्मृति तें मायेचे रूप जाणा ।
तेंचि येथें कारण मीच जाणे आपणा ॥ ३ ॥
तनुभयाचा साक्षी तो मी महाकारण ।
तेथिल चौथे महामायेसी मीच वोळखण ॥ ४ ॥
शबलद्वय उपाधि निरसितां जिवशिवपण हरलें ।
शुद्ध पूर्णानंदीं रिघतां **शिवरामचि** झालें ॥ ५ ॥

२

मी देह नव्हेसा झालों तेंव्हां उपजणें ना निमणें ।
रोड मोठा वृद्ध तरुण हें कांहिंच मी नेणें ॥ १ ॥
यापरि विचार करितां मनुजा सुमनें साक्षेपें ।
चैतन्य आत्मा मी हें कळतां विचारही लोपे ॥ २ ॥
मनसह अंतःकरणाचा परि देखणाचि वेगळा ।
वर्णाश्रम सुख-दुःखें येउनि बाधति कवणाला ? ॥ ३ ॥
क्षुधातृषादि प्राणधर्म हे मजला दिसताती ।
मज मी फिरोनि पाहतां मग हे कवणा बाधिती ॥ ४ ॥
हें जड ऐसें जाणुनि निराळा होउनी पाहतां ।
व्यतिरेकेंची चिदचिद्ग्रंथी सुटे तत्त्वता ॥ ५ ॥
सकळ सच्चिदानंदु हा हो अन्वयाचा बोधु ।
तो जाणावा **शिवरामा**चा परिपूर्णानंदु ॥ ६ ॥

३

विषयइंद्रियें जड ओळखणें तेची विरक्ती ।
चैतन्याकडे वृत्ति फिरवणें या नांव भक्ती ॥ १ ॥
मी चिद्घन वृत्तिची प्रतीती शुद्ध तें ज्ञान ।
यापरि त्रिवेणीचें नित्य करावें स्नान ॥ २ ॥

वर्णाश्रमसह युक्ताचारचि इंद्रियां घडे ।
विरक्ति भक्ति ज्ञान होतां आपेआप चढे ॥ ३ ॥
मुळींच विचार हारपे हर्षामर्ष मग कैचे ! ।
**शिवराम** भजे पाय **पूर्णानंदा**चे ॥ ४ ॥

४

वृत्ती जिकडे धांवे तिकडे न जावें तीपाठीं ।
साक्षी होउनि पाहतां स्वरूपीं मग होय भेटी ॥ १ ॥
वृत्तीकडे पाहतां वृत्ती आपणांतचि विरे ।
आपण चैतन्य मात्र केवळ परिपूर्ण उरे ॥ २ ॥
मग देखे ऐके त्वचे आढळे जो जो रस चाखे ।
बोले चाले वेव्हारितां आपआपणा देखे ॥ ३ ॥
सहज समाधि सहजचि भोगी **पूर्णानंद** उरे ।
**शिवराम** निरावरण होउनी आनंदें वावरे ॥ ४ ॥

५

गुरु अरुणोदयकाळीं म्हणतां पदें पांच हीं ।
अर्थी विवरुनि पाहतां होई देही विदेही ॥ १ ॥
सद्गुरु आज्ञा वचन पाळणें या नांवें ।
वेव्हारितां आपण आपणां विसरूं न द्यावें ॥ २ ॥
विसरा विसरुनि आठवा प्रासुनि आत्मा स्वयें होणें ।
होणें न होणें वृत्तीविण तें अंगीं अनुभवणें ॥ ३ ॥
**जगीं आपण भरला आपणामाजी जग** पाहे ।
तो जाणावा **शिवरामा**चा पूर्णानंदु आहे ॥ ४ ॥

ह्या पंचपदीचा अर्थ फार गहन आहे. सद्गुरुकृपेनें जो पारमार्थिक अनुभव आमच्या साधुसंतांस प्राप्त झाला, तो सगळा या पंचपदींत सांगितला आहे. शिवरामस्वामींचें **बोधबासष्टी** नांवाचें एक उपदेशपर प्रकरण आहे, त्यांतही मुमुक्षु-जनांस फार उत्तम बोध केला आहे. हें प्रकरण माझ्या तीर्थरूपांच्या संग्रहीं होतें, तें

मीं महाराष्ट्रकविकर्त्यांकडे प्रसिद्धीसाठीं पाठविलें होतें. परंतु पुढें तें मासिक बंद पडल्यामुळें, सदर प्रकरण प्रसिद्ध झालें नाहीं. शिवरामस्वामींचीं आणखी कांहीं पदें येथें देतों.

१

भय कासयाचें आत्मानुभवीं योगिया ? ॥ ध्रु० ॥
देह अहंभाव त्यागीं । मृत्यु मारुनियां अंगीं । देव आपणचि झालिया ॥ १ ॥
योग कर्मातें गाळी । ज्ञान संशयातें टाळीं । आपुल्या ठायासी आलिया ॥२॥
पूर्णानंदें पूर्णपणीं । दुजयातें दृष्टी नाणी । शिवरामाचे होउनि ठेलिया ॥३॥

२

निजीं नीज लागली मज माये । स्मरणाचा आठव तोहि नोहे नोहे ॥ध्रु०॥
जागृति स्वप्न सुषुप्ति हारपली । तूर्या तेथें विरोनियां गेली ॥ १ ॥
ब्रह्माविष्णुहरिहरादिक मूर्ति । मजमाजीं स्तरोनी उठताती ॥ २ ॥
पूर्णानंदीं मी सहज निजों गेलें । शिवरामीं उठोंचि विसरलें ॥ ३ ॥

३

संत दयाळ कसे । राजा-रंक जयां सरिसे ॥ ध्रु० ॥
देउनि भेटी तोडिति माया । नेउनि दाविति निजपदठाया ॥ १ ॥
श्रवणीं पाजुनि अमृतवाणी । नेउनि दाविति चिन्मयखाणी ॥ २ ॥
शिवरामाचे अभिनव लेणें । लेवविलें मज पूर्णकृपेनें ॥ ३ ॥

४

तेचि गत बाई । आचार तिचे ठायीं ।
जाणिवेचा बोल अंगीं येउं दिला नाहीं ॥ ध्रु० ॥
सत्कर्माचा सडा बरा घालुनियां द्वारीं ।
माजघरांचि वोज बरी दावि लोकाचारीं ॥ १ ॥
निष्कामाचें चहूं कोनीं सारविलें घर ।
सुरंग रंग रंगमाळ घालि निरंतर ॥ २ ॥
घवघवीत प्रेमकुंकूं लावुनियां भाळीं ।
पूर्णानंदीं शिवरामीं विचरे वेल्हाळी ॥ ३ ॥

५

जीवगांठी समूळ छेदुनियां । उभा कैसा सन्मुख येउनियां ॥ ध्रु० ॥
कवण भाग्य नकळे मज माझें । दिली भेटी दयाळ गुरुराजें ॥ १ ॥
दृश्य देखणें सर्व हिरुनि नेलें । मन माझें संकल्पशून्य केलें ॥ २ ॥
स्फुरणाची मोडिली सर्व वाट । शिवरामीं शिवराम असें दाट ॥ ३ ॥

६

हुकूम साहेबका । हम तो चोपदार बांका ॥ ध्रु० ॥
ब्रह्माविष्णुमहेशा । प्रभुका अवतार खासा ॥ १ ॥
दश चारोंपर सत्ता । ब्रह्मा सत्यलोकका दाता ॥ २ ॥
पूर्ण गुरु **शिवराम** बंदा । बंदगी करले येखादा ॥ ३ ॥

शिवरामस्वामींचीं अष्टोत्तरशत शिवबेल (अभंग), रामतुळसी (अभंग) व बोधामृत (श्लोक) अशीं तीन प्रकरणें बेळगांव येथील रामतत्त्व प्रकाश छापखान्याच्या मालकांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. हीं प्रकरणें शिवरामस्वामीनींच रचिलीं आहेत, याबद्दल शंका नाहीं; पण 'रामतुळसी' प्रकरणाच्या शेवटीं 'नारायण पाहीं अष्टोत्तरशत । शिवरामीं वाहात रामतुळसी ॥' असा जो चरण आहे, त्याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. त्याच्या जागीं '**नारायण**पायीं अष्टोत्तरशत । शिवराम वाहात रामतुळसी' असा मूळ चरण असावा असें वाटतें. हें रामतुळसी प्रकरण फार गोड आणि अत्यंत भक्तिपूर्ण आहे. पुढील अभंग पहाः—

जेणें हें ब्रह्मांड सत्यत्व पें भासे । तो राम आभासे चराचर ॥ ५ ॥
चराचरीं अवघें रामरूप झालें । मी तूंपण नेलें रामराजें ॥ ६ ॥
रामीं कामना ही रामीं राम पाहीं । राम होउनि राहीं रामरूपीं ॥ ७ ॥
विकल्प संकल्प मनाचे व्यापार । जाणता निर्धार रामराजा ॥ १० ॥
राजा इंद्रियांचा मनातें चाळवी । बुद्धीतें बोधवी स्वसत्तेनें ॥ ११ ॥
बुद्धीते बोधवी निश्चय करवी । अकर्ता म्हणवी रामराजा ॥ १२ ॥
आपण श्रीराम कानातें ऐकवी । त्वचेतें जाणवी उष्णशीत ॥ १७ ॥

सीताराम डोळां रूपानें दाखवी । रसने चाखवी नानारस ॥ १८ ॥
नाना परिमळ घ्राणा हुंगवीत । तेजें भासवीत दिवा जैसा ॥ १९ ॥
दिवीं जे करितां इंद्रियव्यापार । राम निर्विकार साक्षीमुख ॥ २० ॥
मुखीं जे बोलवी नाना शब्दरचना । तोचि रामराणा धरा हातीं ॥ २१ ॥
हातीं राम माझा देववी घेववी । चरण चालवी पाउलातें ॥ २२ ॥
राम देखों स्वप्नीं राम देखों शयनीं । जागृतीं नयनीं राम देखों ॥ ९३ ॥
राम डावा उजवा राम मागें पुढे । रामाचें रूपडें सबाह्येसी ॥ ९४ ॥
राम सर्वांहूनि वरता अंतराळीं । पाताळाचा तळीं राम देखों ॥ ९५ ॥
सबाह्य कोंदले राम सीतापती । आकारली मूर्ति विश्वाकार ॥ ९६ ॥

हे एकंदर अभंग ११० आहेत. बोधामृताचे श्लोक ५२ असून त्यांतील पहिल्या ३५ श्लोकांत अध्यात्मबोध केला आहे व पुढील १७ श्लोकांत सद्गुरुस्तुति केली आहे. ह्या प्रकरणाचे शेवटचे दोन श्लोक असे आहेत:—

भजन निजगुरूचें सर्वभूतीं करावें । गुरुचरण पहाया सर्वकाळीं झुरावें ॥
गुरुमुख निज बोधें चित्त आधीं भरावें । गुरुवर शिवरामें बोलिलें आचरावें ।
वंदूनि नारायणदेव पाउलां । बोधामृत ग्रंथ जगासि अर्पिला ॥
संतांसि जें मानितसेल निश्चितीं । तरी विचारा शिवरामभारती ॥

बोधबासष्टीचा शेवटचा चरण असा आहे:—

'बासष्टी पद बोधाचें । जाणे करि जो वचनाचें ।
बळ हें श्रीगुरुचरणाचें । शिवरामचि होउनि नाचे ॥'

शिवबेल हें प्रकरण शिवरामस्वामीकृतच होय, हे त्याच्या शेवटच्या चरणावरून स्पष्ट होते.—

पूर्ण शिवरामीं अष्टोत्तरशत । शिवराम वाहत शिवबेल ॥ १०८ ॥

ह्या प्रकरणांत स्वामींनीं आपला परमार्थनुभव वर्णिला आहे, ह्यांतील कांहीं अभंग पुढें दिले आहेत:—

नाहींच वियोग शिवाचा मजला । एकाकार झालों शिवरूप ॥ ९८ ॥
ऐसा कोणी नाहीं शिवजीसारिखा । जेणे आत्मसखा भेटविला ॥ ९९ ॥

भेटता आणि भेटी भेटणें न दिसे । स्वयं शिव भासे आत्मरूप ॥ १०० ॥
आत्मा अंतरींचा जीवाचें जीवन । प्राणाचाही प्राण शिवदेवो ॥ १०१ ॥
शिवाच्या वियोगें जंव द्यावा प्राण । विवेकें येवोन वांचविलें ॥ १०२ ॥
विवेकें वांचतां आठवेना शिव । सवें द्यावा जीव ऐसें वाटे ॥ १०३ ॥
वाटे जातां शिव देखिला अवचट । येणें जाणें खुंटे तेचि वेळां ॥ १०४ ॥
वेळोवेळां मज बोलतां चालतां । शिवरूपीं ममता लागली हे ॥ १०५ ॥
लागलें शिवसुख आवडी वाढली । ओळंगू लागली मोक्षलक्ष्मी ॥ १०६ ॥
लक्ष्मीच्या कडीये नारायण पढिये । शिव आवडीये वानूं किती ॥ १०७ ॥

गंडिकाख्यानाचे शेवटचा श्लोक असा आहेः—

ऐशा लिला **नाथगणेश** कर्ता । जो नाममात्र जिवक्लेशहर्ता ॥
तो **शीवरामा** स्मरणीं रिघोनी । भरी स्वनामामृत नित्य गोणी ॥ २३ ॥

ह्या श्लोकांतील नाथगणेश या नांवाचा उल्लेख पाहिला म्हणजे सदर काव्याचा कर्ता शिवरामस्वामी कल्याणकरांहून निराळा असला पाहिजे, हें उघड होतें.

महाराष्ट्रकवि मासिक पुस्तकांत शिवकथामृत नामक एक मोठें काव्य प्रसिद्ध झालें आहे, तें शिवराम स्वामीचेंच होय स्कंद पुराणाच्या ब्रह्मोत्तर खंडावर ही प्राकृत टीका आहे; अध्याय २२ असून श्लोकसंख्या सुमारें १२०० होईल. या काव्यांत ओवी, पदें व श्लोक इत्यादि वृत्तांचा उपयोग केला आहे. एकंदर काव्य सामान्य प्रतीचें दिसतें; भाषाशुद्धीकडे फारसें लक्ष्य दिलेलें दिसत नाहीं. काव्यांतला मुख्य रस ‘भक्ति’ असून, कथाभागपरत्वें इतर रसांचीही थोडथोडी झांक मारते. ह्या काव्यावरून व ‘शिवबेल’ प्रकरणावरून शिवरामस्वामी शिवोपासक होते, असें दिसतें. शिवकथामृतांत शिवरामस्वामींनीं आपल्या आई—बापांचा व गुरूंचा सर्वत्र उल्लेख केला आहेः—

**नारायणा** शरण जातां । चरणींचा तो आमोद घेतां ।
त्या सुखें स्फुरली शिवकथा । श्रोता वक्ता शिवरावो ॥ ५० ॥

हा बलात्कार **लक्ष्मीपतीचा** । तोचि कर्ता जाला कवित्वाचा ।
चेववूनि **शिवराम**वाचा । रची सुखाच्या ग्रंथातें ॥ ५१ ॥

**अध्याय १ ला.**

**लक्ष्मीनारायणा** शरण । गोकर्णक्षेत्रमहिमावर्णन ।
श्रोतीं व्हावें सावधान । निरोपण अवधारा ॥ ४४ ॥

**अध्याय २ रा.**

ब्रह्मोत्तर **खंडींची** हे कथा । **लक्ष्मी**पतीच प्रथकर्ता ।
**पूर्णा**नंदें रसिक वक्ता । **शि**वरामदाता गुरुरावो ॥ ३३ ॥

**अध्याय ३ रा.**

**लक्ष्मीपतीनें** धरूनि हातीं । शिवकथा मज दाविली निश्चितीं ।
येऱ्हवीं मज कैंची इतुकी मती । जे शिवकीर्ति वर्णावया ॥ २९ ॥

**अध्याय ५ वा.**

ब्रह्मोत्तरखंडांतील कथाभागावर शिवरामस्वामीकृत शिवकथामृत, श्रीधरकृत शिवलीलामृत व मोरोपंतकृत ब्रह्मोत्तरखंड, असे तीन मराठी ग्रंथ आहेत, त्यात शिवलीलामृत हाच ग्रथ अधिक चांगला आहे व त्या मानाने त्याची लोकप्रियताही विशेप आहे.

विस्तारभयास्तव शिवकथामृतातले वेचे येथे देतां येत नाहींत; तरी तो ग्रंथ वाचकानी महाराष्ट्रकवि मासिक पुस्तकांत वाचावा, अशी विनंति आहे.



# उद्धवचिद्घन.

उद्धवचिद्घन केवळ मी मोर तयासमोर हर्षानें ।
तांडव करितों होउनि गतताप तदीय सूक्तिवर्षानें ॥ १ ॥

सन्मणिमाला–मोरोपंत.

ह्या कवीच्या चरित्रासंबंधानें सर्वस्वी विश्वसनीय अशी माहिती अद्याप उपलब्ध झाली नाहीं. या कवीनें लिहिलेली एक संतमालिका 'महाराष्ट्र कवि' मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे, तींत रामदास व त्यांचे शिष्य व तुकारामबुवा व त्यांचे मुलगे यांच्या नांवाचा उल्लेख आढळतो; यावरून उद्धवचिद्घन हे रामदास–शिवाजीच्या कालीं विद्यमान असून, समर्थांपेक्षां ते वयानें लहान होते, असें स्पष्ट विधान करण्यास हरकत नाहीं. बीड येथील प्रसिद्ध सत्पुरुष जनी-जनार्दन यांचे विद्यमान वंशज हरिभक्तिपरायण मथुरानाथ गोसावी, यांनीं रा० विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांस, उद्धवचिद्घनासंबंधानें जी माहिती दिली, तीही वरील विधानास बळकटी आणीत आहे. पुढील पद पहाः—

ज्याचे वंशीं कुळधर्म रामसेवा । त्याचे वंशीं मज जन्म दे गा देवा ॥ ध्रु० ॥
वारंवार विनंति आयकावी । दयासिंधू ही सर्व सिद्धि न्यावी ॥ १ ॥
ज्याची वाणी रंगली रामनामा । त्यासि मजसीं संवाद घडो रामा ॥ २ ॥
म्हणे उद्धवचिद्घन महाराजा । रामदासाचा संग घडो माझा ॥ ३ ॥

या पदाच्या शेवटच्या चरणांतील 'रामदास' या शद्बाचा अर्थ, हरिभक्तिपरायण मथुरानाथ गोसावी यांनी, 'श्रीसमर्थ रामदासस्वामी' असा केला आहे व उद्धवचिद्घन हे समर्थांशी समकालीन होते, हे लक्ष्यांत घेतलें असतां, गोसावीबुवांचा हा अर्थ पुष्कळ अंशीं समर्पक दिसतो. परंतु वरील पदाच्या एकंदर रचनेकडे पाहिलें म्हणजे असें

वाटतें कीं, ‘ ज्याचे मुखांत निरंतर रामनाम आहे, अशा रामभक्ताची व माझी गांठ पडो ’ इतकीच विनंति कवीनें देवापाशीं सामान्यत्वेंकरून केली आहे; ‘ श्रीसमर्थरामदासस्वामीची व माझी भेट व्हावी ’ अशा प्रकारची व्यक्तिविषयक कल्पना त्यांत कोठेंही नाहीं. आतां वरील पदाच्या शेवटच्या चरणाचा अन्वय जर ‘ उद्धवचिद्धन म्हणे ‘ महाराजा रामदासाचा माझा संग घडो ’ असा लाविला, तर हें पद रामदासस्वामींस अनुलक्षून आहे, ही कल्पना कांहींशी सयुक्तिक दिसेल; पण अशा प्रकारची ओढाताण केल्यास मूळ पदाचा अर्थगौरव त्या मानानें कमी होतो, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. उद्धवचिद्धनाचा पुढील अभंगही असाच शंकाजनक आहे:—

*रामनाम कथागंगा । श्रवणें पावन करी जगा ॥ १ ॥
तीस प्रेमपूर आला । शंकरहृदयीं सामावला ॥ २ ॥
रामदासांची माउली । आळशावरी गंगा आली ॥ ३ ॥
झालें कीर्तन या भावें । संतसज्जनीं मानावें ॥ ४ ॥
आम्ही रामाचे पाईक । आमुचा श्रीराम नाईक ॥ ५ ॥
आमुचा भाव रामापायीं । आम्हीं रामावांचुनि नाहीं ॥ ६ ॥
म्हणे उद्धवचिद्‌घन । आम्ही जालों रामार्पण ॥ ७ ॥

या अभंगांतील ‘ रामदासांची माउली ’ या शब्दांचा अर्थ कसा करावयाचा, हा मोठा प्रश्न आहे. पुढील चरणांत कीर्तन

* या अभंगाचे पहिले तीन चरण रामदास स्वामींचे आहेत, असें समजून रामदासस्वामींच्या समग्र ग्रंथांत ते उतरून घेतले आहेत; परंतु संप्रदायपरंपरेनें भजन करणाऱ्या लोकांकडून अशी माहिती मिळते कीं, हा सगळाच अभंग उद्धवचिद्‌घनाचा आहे; व अभंगाच्या भावार्थाकडे पाहतां, हीच माहिती बरोबर असावी, असें वाटते. काव्यसंग्रहांत प्रस्तुतचा अभंग आढळत नाहीं; यावरून या कवीची बरीच फुटकळ कविता अद्याप अनुपलब्ध असली पाहिजे, असें उघड अनुमान होतें.

झाल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हां हें कीर्तन रामदासस्वामींचेंच असावें असें वाटतें. उद्धवचिद्घन यांनी संतचरित्रांवर एकदोन मोठे ग्रंथ लिहिले आहेत. ते जर सुदैवानें उपलब्ध होतील, तर या मुद्दयावर चांगला प्रकाश पडेल; तोंपर्यंत, या कवीसंबंधाची जी काय थोडी बहुत माहिती आज उपलब्ध झाली आहे, तिच्याच आधारानें पुढील मार्ग आक्रमण करणें भाग आहे.

उद्धवचिद्घन हे मोगलाईत, वाडी स्टेशनापासून १७ मैलांवर धारूर या नांवाचें एक गांव आहे, तेथें राहत असत. उद्धवचिद्घन हें एक नांव नसून 'एकाजनार्दन' या नांवाप्रमाणें तें एक गुरुशिष्यबोधक नांव आहे. प्रस्तुत कवीचें नांव 'उद्धव' असून, 'चिद्घन' (चिद्घनानंद) हें त्यांच्या गुरूचें नांव होय. चिद्घन हे उद्धवस्वामीचे मामा असून गुरूही होते. रा० राजवाडे यांनीं प्रस्तुत कवीचा काल शके १६२० म्हणजे इ० स० ६९८ हा दिला आहे; पण त्यास आधार काय आहे, याचा उल्लेख त्यांनीं कोठेंही केला नाहीं. कविचरित्रकारांनीं उद्धवचिद्घनाचा जन्मशक १२५० दिला आहे; पण या कवीनें लिहिलेल्या संतचरित्रांत, चौदाव्या शतकांतील संतांचींही चरित्रें आढळतात, यावरून, कविचरित्रकारांनीं दिलेला शक चुकीचा आहे, हें सप्रमाण सिद्ध होतें. काव्यसंग्रहकारांनीं उद्धवचिद्घनाचा काल इ० स० १६५० दिला आहे; पण महिपतींनी दिलेल्या माहितीशीं तो सुसंगत दिसत नाहीं. काव्यसंग्रहकर्त्यांनीं आपल्या अनुमानजन्य विधानाच्या समर्थनार्थ जीं प्रमाणें दिलीं आहेत, त्यांत 'या कवीच्या 'भक्तकथामृतसार' या ग्रंथांत शके १२५० च्या पुढील संतांचींही चरित्रें दिलीं आहेत' असें एक प्रमाण दिलें आहे; पण "भक्तकथामृतसार" हा ग्रंथ आपणास अद्याप उपलब्ध झाला नाहीं' असें त्यांनीं पुढें स्पष्ट सांगितलें आहे. अशा स्थितींत, जो

ग्रंथ आपल्या अवलोकनांत आला नाहीं, त्यांत अमुक अमुक संतांचीं चरित्रें दिलीं आहेत, असें अगदीं ठासून लिहिण्यास काव्यसंग्रहकार कसे धजावले, याचें मोठें आश्चर्य वाटतें. अस्तु. एकंदरींत, उपलब्ध असलेला सर्व पुरावा लक्ष्यांत घेतां, उद्धवचिद्घन हे इ० स० १६८० च्या सुमारास विद्यमान होते, असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. या कवीचें आडनांव ‘ कोकीळ ’ होतें, असें ह० प० मथुरानाथ गोसावी यांजकडून समजल्याचें रा० राजवाडे यांनीं ग्रंथमालेंत लिहिलें आहे. उद्धवचिद्घन हे देशस्थ ब्राह्मण. ते मोठे रामभक्त होते. प्रतिवर्षीं धारूर येथें आपल्या मठांत रामनवमीचा मोठा उत्सव करण्याचा त्यांचा परिपाठ असे. एका रामनवमीच्या दिवशीं उद्धवचिद्घन हे बेदर येथें असतां, तेथे त्यांजकडून घडलेल्या एका चमत्काराची हकीकत महिपतींनीं आपल्या भक्तविजयाच्या ५६ व्या अध्यायांत दिली आहे; ती सारांशरूपानें येथें देतों:—

‘ एके वर्षीं चैत्र शुद्ध प्रदिपदेस, उद्धवचिद्घन बेदर येथें गेले असतां तेथील लोकांनीं त्यांचें कीर्तन करविलें कीर्तनास मोठमोठे पंडित, शास्त्री व इतर भाविक जन आले होते. त्यांस तें कीर्तन इतकें आवडलें कीं, आणखी कांहीं कीर्तनें करण्याची उद्धवचिद्घनांस त्यांनीं विनति केली. त्यावेळीं उद्धवस्वामींनीं त्यांस सांगितलें कीं, ‘रामनवमीच्या उत्सावासाठीं मला धारूर येथें गेलें पाहिजे.’ लोक म्हणाले कीं, ‘ यंदाची रामनवमी आपण येथेंच करावी.’ लोकांचा अत्याग्रह व आस्था पाहून उद्धवचिद्घन फार खूष झाले व त्या वर्षींची रामनवमी बेदर येथेंच करण्याचें त्यांनीं कबूल केलें. मग, एक मोठा वाडा पाहून लोकांनीं तेथें प्रशस्त मंडप उभारिला व त्यांत मखर बांधून, श्रीरामचंद्राची मूर्ति आणून बसविली. उत्सवा-साठीं मोठमोठे हरिदास, वैष्णव इत्यादिकांस आमंत्रणें दिलीं.

नित्य पक्वान्नाचें भोजन व रात्रीं हरिकीर्तनाचा मोठा थाट सुरू झाला. दिंड्या पताका घेऊन वैष्णव वीरांचे समुदाय मोठमोठ्या मिरवणुकी काढूं लागले. पुढें वाजंत्रीं वाजताहेत व मागून वैष्णववीर प्रेमानंदानें भजनाचा घोष करीत चालले आहेत, इतक्यांत, वाटेंत एक मशीद होती, तेथील मुसलमानास हा प्रकार पाहून मोठें वैषम्य वाटलें. त्या वेळीं बेदर येथें मुसलमानाचें फार प्राबल्य होतें. न्याय नाहीं, मनसुबा नाहीं, बळी तो कान पिळी, अशा प्रकारची झोटिंगपाच्छाई तेथें माजून राहिली होती. अशा स्थितीत, आपल्या मशिदीवरून ‘ हिंदु काफरांनीं ’ भजन करीत जावें, ही गोष्ट तेथील मुसलमान गुंडांस कशी खपावी ? त्यांनीं एकदम वारकरी मंडळावर दगड आणि धूळ यांचा वर्षाव सुरू केला ! कित्येक गुंडांनीं वारकऱ्यांच्या पताका हिसकून घेतल्या, तर कोणी त्यांस विनाकारण मारूं लागले. विण्याच्या तारा तोडून टाकल्या, मृदंग फोडून टाकले व सगळ्या वैष्णवांस हांकून लाविलें ! मग ते बिचारे उद्धवाचिद्धनांपाशीं आले व झालेला वृत्तात त्यांनीं त्यांस निवेदन केला. तो ऐकतांच उद्धव स्वामीस पराकाष्ठेचें दुःख झालें.

‘ मग मखरापाशीं जाऊन तत्त्वता । म्हणे ‘ जयजयाजी रघुनाथा । ।
हे नव्हतें येत तुझिया चित्ता । तरी अट्टाहास वृथा का केला ? ॥
तूं श्रीराम जानकीवरू । वससी सर्वांचे अंतरू ।
मी कासया आता खेद करूं ? । केला अनादरू संतांचा ॥

याप्रमाणें देवापाशीं गाऱ्हाणे करून उद्धवस्वामींनीं श्रीरामाची मूर्ति देव्हाऱ्यांत नेऊन ठेविली, मखर मोडून टाकिलें व मंडपही काढून ठेविला. नंतर जमलेल्या वैष्णवांस नमन करून ते सप्रेम हरिकीर्तन करीत बसले भगवद्भक्ताची ही अनुकंपनीय स्थिति अवलोकन करून मारुती अत्यंत क्रोधायमान झाले; सगळें

बेदर शहर पालथें घालूं कीं जमिनींत गाडून टाकूं, असें त्यांस झालें. मग मोठ्यानें भुभुःकार करून त्यांनीं मशिदीवर उड्डाण केलें व जोरानें मशिदीच्या भिंती हालविण्यास प्रारंभ केला. मशिदी-शेजारीं एक फकिराचें झोपडें होतें; तो फकीर हा भयंकर प्रकार पाहून फार भयभीत झाला. त्यानें तत्काल जाणलें कीं, मुसलमान गुंडांनीं हरिभक्तांचा छल केल्यामुळें, त्यांचा सूड उगविण्यासाठीं हा बलभीम या ठिकाणीं प्राप्त झाला आहे; आतां मशिदींतील मुसलनांचीं शंभर वर्षें भरलीं, यांत कांहीं संशय नाहीं. मग त्यानें हात जोडून अत्यंत भक्तिपूर्वक मारुतीची प्रार्थना केली कीं, 'महाराज, माझ्या एवढ्या झोंपडीस कोणत्याही प्रकारें धक्का लावूं नये.' हें फकिराचें भाषण मशिदींतील गुंडांच्या कानीं पडतांच त्यांस वाटलें कीं, फकीर ज्या अर्थी स्वतःशींच मोठ्यानें बोलत आहे, त्या अर्थी त्यास वेड लागलें असावें. तथापि फकिरानें, त्या लोकांच्या थट्टेकडे लक्ष्य न देतां, 'एक वानर मशिदीवर बसून मशीद पाडीत आहे, तरी तुम्ही बाहेर पडा' असें त्यांस सांगितलें. परंतु हा हितबोध त्या उद्धट लोकांस कसचा पसंत पडतो? ते म्हणाले कीं, वानराचे बापदादे आले तरी त्यांजकडूनसुद्धां मशीद पाडली जाणार नाहीं! हा त्यांचा उन्मत्तपणा पाहून मारुतीराय अत्यंत क्रोधाविष्ट झाले व एका लाथेनें मशिदीची इमारत त्यांनीं जमीनदोस्त करून टाकली. मग जो अनर्थ उडाला, तो काय वर्णावा? मशिदींतील बहुतेक गुंड जागच्या जागीं चिरडून मेले, कोणी अर्धमेले होऊन विव्हळूं लागले व थोडेसे वांचले, ते भयानें वाट फुटली तिकडे पळत सुटले! अशा स्थितींत, एका मुसलमानानें धांवत जाऊन, हा सगळा प्रकार मुसलमानी मोहल्यांत जाहीर केला. मशीद पाडल्याची हकीकत तो आपल्या जातभाईंस सांगत आहे, तोंच त्याच्या पोटांत असा भयंकर शूळ उठला कीं, त्याच्यानें पुढें एक अक्षरही बोलवेना!

इतक्यांत, तो फकीर त्या ठिकाणीं प्राप्त झाला व मुसलमान गुंडांनीं उद्धवचिद्घनांचा छल केला, म्हणून वानरानें मशीद पाडून गुंड मारल्याची हकीकत त्यानें सगळ्या मुसलमानांस कथन केली. मग, ज्या मुसलमानांच्या पोटांत शूळ उत्पन्न झाला होता, त्यानें उद्धवचिद्घनांची भेट घेऊन त्यांची क्षमा मागितली व त्यांस एक हजार रुपये देऊन श्रीरामनवमीचा उत्सव यथासांग रीतीनें करण्याविषयीं विनंति केली. मग शहरांतले लोक जमा होऊन, त्यांनीं थोडया वेळांत मंडप पुनः उभा केला व मखर करून त्यांत श्रीरामचंद्राची मूर्ति स्थापन केली. ब्राह्मणभोजनें आणि हरिकीर्तन यांचा द्वादशीपर्यंत सारखा थाट उडून राहिला होता. असो. याप्रमाणें उत्सव समाप्त झाल्यावर उद्धवचिद्घन हे आपल्या धारूर गांवीं निघून गेले. या एकंदर चमत्काराचें वर्णन करून, शेवटीं महिपति म्हणतात:—

> ' साधुसंतांचा द्वेष करी । तयासी दु:ख जन्मभरी ।
> विघ्नें येती नानापरी । तयाचे घरीं शोधित ॥ '

आमच्या साधुसंतांवर नेभळटपणाचा आरोप करणाऱ्या प्रतिनिधींनीं आमच्या साधुसंतांचें भक्तिबल केवढें विलक्षण कार्यकर होतें, हें ह्या गोष्टीवरून समजून घ्यावें. आमचे सगळे साधुसंत भूतदयेचे केवळ पुतळे असल्यामुळें, त्यांनीं आपण होऊन आपल्या शत्रूसही त्रास दिला नाहीं, ही गोष्ट खरी; परंतु त्यांच्या ठायीं ' जें भगवंताचें अधिष्ठान ' झालें होतें तें एवढें सामर्थ्यवान् होतें कीं, त्या एकट्याच्या जोरावर ते मृत्यूच्या भयंकर दाढेंतूनही सुटून आले, अग्नि त्यांचें दहन करूं शकला नाहीं, उदक त्यांस बुडवूं शकलें नाहीं आणि जुलमी व धर्मविध्वंसक राजांचे तुरुंग त्यांस कोंडून ठेवण्यास समर्थ झाले नाहींत. आमच्या साधुसंतांच्यासारखें भक्तिबल आणि पुण्यबल जर आमच्या हल्लींच्या पुढाऱ्यांच्या अंगीं असेल,

तर अखिल पृथ्वीवर त्यांच्या सन्मार्गाच्या आड येणारी अशी कोणतीच सत्ता असूं शकणार नाहीं.

उद्धवचिद्घनाच्या जन्मतिथीप्रमाणेंच त्यांची मृत्युतिथीही प्रसिद्ध नाहीं, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. उद्धवचिद्घन हे महाराष्ट्रांतील संतमालेंत चांगले नामांकित होते, हें या लेखाच्या आरंभींच दिलेल्या सन्मणिमालेंतील पंतांच्या आर्येवरून स्पष्ट दिसतें. महिपतींच्या पूर्वींचे महाराष्ट्र-संतचरित्रकार या नात्यानें ते विशेष प्रसिद्ध आहेत. 'उद्धवचिद्घनाच्या संतचरित्रांवरून मी भक्तविजय ग्रंथ लिहीत आहें.' असें त्या ग्रंथाच्या आरंभींच महिपतींनीं म्हटलें आहे. उद्धवचिद्घनाच्या कवित्वासंबंधानें महिपतींनीं पुढील उद्गार काढिले आहेतः—

' जयाचीं पदपदांतरें बहुत । अनुभवरसिक जडाव अद्भुत ।
प्रेमळ विरक्त भाविक भक्त । भजनीं रत जाहलासे ॥ '

उद्धवचिद्‌घनाची पुढील कविता काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झाली आहे:—१ शुकरंभासंवाद, २ श्रियाळचरित्र, ३ नागनाथचरित्र, ४ हेगराजचरित्र, ५ बहिरंभटचरित्र, ६ मृत्युंजयचरित्र, ७ गोराकुंभारचरित्र, ८ अनुभवशतक, ९ भगवद्गीता, १० गुरुशिष्यसंवाद व ११ पदें ४३——या सगळ्या प्रकरणांची पद्यसंख्या ’०२० आहे. याशिवाय ध्रुवाख्यान, भक्तकथामृतसार व भक्तकथातत्त्व हे उद्धवचिद्घनाचे तीन ग्रंथ अद्याप अनुपलब्ध आहेत. हे ग्रंथ प्रसिद्ध झाल्याशिवाय उद्धवचिद्घनाचें चरित्र सर्वांगपूर्ण रीतीनें लिहितां येणें शक्य नाहीं.

उद्धवचिद्घनाची कविता अगदीं साधी परंतु भक्तिरसपूर्ण आहे. भाषा अत्यंत सुलभ असून, तींत परकीय भाषेंतले शब्द फारसे आढळत नाहींत. कवीचा कटाक्ष केवळ अर्थबोधाकडेच विशेष असल्यामुळें, काव्यदृष्टीनें, उद्धवचिद्घनाची कविता म्हणण्यासारखी हृदयंगम दिसत नाहीं; तथापि एका प्रेमळ सत्पुरुषाचे उद्गार या

दृष्टीनें पाहिल्यास तिची योग्यता मोठी आहे, हें कोणाच्याही लक्ष्यांत येईल. उद्धवचिद्घनाच्या गीतार्थमंजरींत थोडेसें कवित्व चमकतें, पण त्यापेक्षां तें त्यांच्या पदांत अधिक चमकतें. त्यांच्या कवितेंतले थोडेसे वेंचे येथें देऊन, हा लेख आतां पूर्ण करितों.

पुढील श्लोकांत उद्धवचिद्घनांनीं आपल्या पारमार्थिक अनुभवाचें वर्णन केलें आहे:—

' विराजलों शांतिसुखासनीं रे। स्थिरावलों आचल आसनीं रे॥
आतां सुखाची मज काय वाणी। केला सखा सद्गुरु चक्रपाणी॥
बहु नग कनकाचे तेंवि मी विश्व जालों।
मंजवरि जग खेळे मी तया भिन्न ठेलों॥
दिनकरकिरणानें देखिलें जें निशीतें।
तइं मग मजमाजी नांदती सर्व भूतें॥
केला निवास सहजें स्वरुपावबोधीं।
तेंपासुनि विषमता हरली उपाधी॥
आले अपारपद वैभव भाग्य हाता। तेणेंचि द्वैत सरलें जगदेव गातां॥
मीं राम म्यां मारुनि रावणातें। म्यां सोडियेलें विबुधा जनातें॥
म्यां तारिले पर्वत सागरीं हो। मी रामनामें जग उद्धरी हो॥
मी कृष्ण मीं मर्दुनि काळियाला। म्यां ब्रह्म हा गोपसमूह केला॥
मीं गोपिका भोगुनि ब्रह्मचारी। मी गोधनें चारुनि निर्विकारी॥
मी शून्यता ग्रासुनि शून्य जालों। शून्यासही चाटुनि मीचि प्यालों॥
अनंत मी मीपण हाचि अंतु। मी हारपे निश्चित निश्चितार्थु॥
ब्रह्मादि मुंगी वरि ब्रह्मभावें। साष्टांगता सर्व भुतीं नमावें॥
कामादि साहा रिपु ते दमावे। तें भेटि देतो गुरुनाथ दैवें॥
जाती कुळाचा अभिमान सांडी। जे कामना कर्म तया न मांडी॥
अकाम ध्याई गुरुराज चित्तीं। भोगूं सुखें सर्व सुखानुभूति॥
आधीं करीं साधुसमागमासी। संगीं तयाचे मग तूंचि होसी॥
तेंरू बहू चंदन अंगसंगें। जाले बहू ओघ पवित्र गंगे॥
ज्याचे घरीं भक्ति रुढीस आली। ज्याचे घरीं नित्य विरक्ति जाळी॥

ज्याचे घरीं वास असे क्षमेसी । ते संत सेवीं सुखरूप होशी ॥
भावार्थ ज्यांनीं बळवंत केला । संकल्प ज्यांचे घरिंचा पळाला ।
विवेक ज्यांचे पदिंचा मिराशी । ते संत सेवीं सुखरूप होसी ॥
जे दाविती अक्षय राम डोळां । मोक्षासि ज्या ठाव नसे निराळा ॥
जे दर्शनें उद्धरिती जगासी । ते संत सेवीं सुखरूप होसी ॥
जे दंभमानाप्रति शोचताती । जे भोगमोक्षाप्रति चूळ देती ॥
अहंकृती गर्व नसे जयांसी । ते संत सेवीं सुखरूप होसी ॥
सेजेवरी वृश्चिक आंथुरीले । तेथे निजे कोण सुखें निवाले ? ॥
ऐसे परी ज्यासि विरक्ति जाली । त्याचे घरीं धांव हरीच घाली ॥
अज्ञान मी स्पष्टहि बोल नेणें । कवित्व शब्दादि स्रजूं न जाणें ॥
नेणें रसाळत्व गणाष्टकांही । जसें तसे अर्पण संतपायीं ॥
मी अल्पबुद्धी वरि भक्तिहीन । साधूदया पूर्ण प्रकाशमान ॥
ते बोलवीते वदवी मुखानें । ते ऐकती सादर संत कानें ॥
श्रीचिद्घनीं स्नेहसुधाप्रसादें । वळूनियां वर्षत पूर्ण बोधें ॥
आब्रह्म प्रेमोदधि पूर्ण जाला । पूर्णोदकीं उद्धवही विराला ॥

अनुभवशतक.

वरील श्लोकांची शब्दरचना फारशी चित्तवेधक नाहीं किंवा ती सर्वस्वी व्याकरणशुद्ध आहे असेंही नाहीं; तथापि त्यांत जें औत्सुक्य आणि वैराग्य भरून राहिलें आहे, त्यामुळें कवितेच्या बाह्य स्वरूपाकडे लक्ष देण्यास सहृदय वाचकांस अवसरच मिळत नाहीं. आपण विद्वान् नाहीं, कवि नाहीं, ही गोष्ट कवीच स्वतः कबूल करीत आहे; पण साधुकृपा अशी विलक्षण आहे कीं, स्वतः कवीनेंच म्हटल्याप्रमाणें, ‘ ते बोलवीते, वदवी मुखानें । ते ऐकती सादर संत कानें;’ आणि तसाच प्रकार प्रस्तुत कवीच्या वरील श्लोकांत दृष्टीस पडतो.

## गोराकुंभारचरित्र ( साकी. )

बरवीं संतचरित्रें हो । पावन परम पवित्रें हो ॥ ध्रु० ॥
सत्यपुरी जे पावन नगरी लोकीं म्हणती तेर ।

संतपरीक्षा करितो गोरा जातीचा कुंभार ॥ १ ॥
अखंड आत्मध्यानीं निमग्न विठ्ठल विठ्ठल वाचे ।
शरीरप्रपंचें माती तुडवी प्रेम भरोनी नाचे ॥ २ ॥
रांगत बाळक सोडुनि तेथें गेली कांता जिवना ।
येउनि पाहे तंव तें कोठें न दिसे तीच्या नयनां ॥ ३ ॥
पाहे तों चिखलांत जावळ मांसास्थी दिसताती ।
' जळो भजन हें बाळक मारिलें ' वदन पिटी ती हातीं ॥ ४ ॥
ध्यानभंग विक्षेप होतां चक्रदंड पडताळी ।
येरि म्हणे ' मज स्पर्श कराल तर आण विठूची पाळीं ' ॥ ५ ॥
टाकुनि काठी सहज स्थितिनें प्रपंच अवघा सारी ।
शय्यासन भोजनप्रवर्णीं वर्जियली ते नारी ॥ ६ ॥
तिणे आपली भगिनी आणुनि लग्नसोहळा केला ।
चवथे दिवशीं पिता वधूचा वरा प्रार्थिता जाला ॥ ७ ॥
' हरिचे दास तुम्ही सज्जन तुह्मां लहान थोर नाहीं ।
दोघींचेंही समान पाळण, आण विठूची पाहीं ' ॥ ८ ॥
' अवश्य ' म्हणुनी वस्त्र-भूषणें दोघिजणींसी पाळी ।
अंगस्पर्श न करी तेव्हां विचार करिती बाळी ॥ ९ ॥
निद्रिस्त भ्रतार देखुनी दोघिजणी दों भागीं ।
धरूनि त्याचे पाणी हृदयीं निद्रा करिती वेगीं ॥ १० ॥
जागृत होतां कर अन्यायी शास्त्रार्थारे आपटिले ।
कमळ तोडितां मृणाल तैसे थोटे बाहू जाले ॥ ११ ॥
नामदेव संकीर्तन करितो कथेसि गोरा आला ।
नामघोषप्रेमें टाळी करपल्लव थोट्या फुटला ॥ १२ ॥
रांगत बाळक धावुनि आले महिमा हा नामाचा ।
वेदशास्त्र पुराण वर्णी, कुंठित शेषवाचा ॥ १३ ॥

---

× हा चरण काव्यसंग्रहांतील प्रस्तुत प्रकरणांत आढळत नाही.

ऐसे अपार संत वर्णितां संशय सर्वहि जातो ।
आठवलें तें एका भावें उद्धवचिद्धन गातो ॥ १४ ॥

हें प्रकरण एका जुन्या वहींतून मीं येथें उतरून घेतलें आहे. यांतील कित्येक पाठ काव्यसंग्रहांतील पाठांहून अगदीं भिन्न आहेत.

पुढील धांवा तर प्रसिद्धच आहे; त्यांतील करुणरस किती करुणाजनक आहे, ह्याचें आणखी निराळें वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं:—

पद.

कृष्णा धांव रे । लवकरी । संकट पडलें भारी ।
हरि । तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारीं ॥ ध्रु० ॥
पांडव असतां वनवासी । कळलें कौरवांसी ।
त्यांनीं पाठविले हे ऋषी । सत्त्व हरायासी ॥ १ ॥
साठी सहस्र खंड्या अन्न । दुर्वासभोजन ।
सत्त्व जातील घेऊन । अंतर पडतां जाण ॥ २ ॥
रात्र जाहलीसे दोन प्रहर । आले ऋषीश्वर ।
भोजन मागती सत्वर । कैसा करूं विचार ॥ ३ ॥
आज कां निष्ठुर जाहलासी । कोठें गुंतलासी ।
माझी होइल बा । गत कैसी । आनाथ मी परदेशी ॥ ४ ॥
आतां न लावी उशीर । धर्म चिंतातुर ।
अनर्थ करील तो फार । एवढा करीं उपकार ॥ ५ ॥
कंठ शोषला अनंता ! । प्राण जाइल आतां ।
पदर पसरितें तुज ताता ! । पावें रुक्मिणीकांता ॥ ६ ॥
ऐकुनि बहिणीची करुणा । आला यादवराणा ।
द्रौपदी लोळत हरिचरणा । उद्धवचिद्धन जाणा ॥ ७ ॥

सुमारें दहा बारा वर्षांपूर्वी हा धांवा एका जुन्या वहींत मीं वाचला होता, तेथें उद्धवचिद्धनाच्या ठिकाणीं 'चिंतामणि' हें नांव होतें, असें मला आठवतें.

## निवडक पदें.

१

देवा ! तूं खांब सुत्रधारी रे । आम्हीं बाहुल्या निर्विकारी रे ॥ ध्रु० ॥
सकळांची कळा तुझे हातीं रे । आपुल्या मतीं वर्ततातीं रे ॥ १ ॥

एक रंक एक राव रे । एक चोर एक साव रे ॥ २ ॥
उद्धवचिद्धना द्वैत एकें रे । एक बाप एक लेंक रे ॥ ३ ॥

२

सख्या हरि ! जेवीं रे सजणा ॥ ध्रु० ॥
साय दुधावरी रायपुरी वरि । कानवला चिमणा ॥ १ ॥
कालविला दधिभात आलें मिरें । मेळविलें लवणा ॥ २ ॥
उद्धवचिद्धन अद्वयमंचकीं । गोपाळा सगुणा ॥ ३ ॥

३

गोड कथारस रे । । रसिकजन ! ॥ ध्रु० ॥
आदि सुधारस षड्रस नवरस । सर्वहि कुरस रे ॥ १ ॥
सुगम सुसेव्य अवीट अमोलिक । न करीं आळस रे ॥ २ ॥
संतमुखें रस सेवित उद्धव- । चिद्धन समरस रे ॥ ३ ॥

४

सज्जन यासाठीं यासाठीं । अवतरले या सृष्टीं ॥ ध्रु० ॥
न बोलणें बोलावें । न दिसे तें दृष्टी दावावें ॥ १ ॥
सद्रूप हे जग माया । ऐसें साधक जन समजाया ॥ २ ॥
भेद लयाप्रति नेला । उद्धवचिद्धन अद्वय केला ॥ ३ ॥

५

भाळीं कस्तुरीचा टिळा । वैजयंती माळ गळां ।
रंग आंगीं सांवळा । कृष्णाई माझी ॥ १ ॥
साजिरें सुंदर ठाण । विशाळ डोळे आकर्ण ।
भक्तिभाव परिपूर्ण । कृष्णाई माझी ॥ २ ॥
पायीं पद ऊर्ध्व रेखा । तोडरावरतीं वांकी देखा ॥
कोटी शशि उपमा नखा । कृष्णाई माझी ॥ ३ ॥
चैतन्याची चालक सत्ता । चिद्धन विश्वाची माता ।
उद्धवा विश्रांति देता । कृष्णाई माझी ॥ ४ ॥

६

पिब रसने रामरसातें । किति भ्रमसी भवविरसातें ॥ ध्रु० ॥
जड तरले सागरजिवनीं । विषहरणीं शिवसंजिवनीं ॥ १ ॥
जरि अवचट ये वदनासी । तरि कलिकिल्मिष अघ नाशी ॥ २ ॥

काथि चिद्धन निजगुज कर्णी । धृत उद्धव चिंताहरणीं ॥ ३ ॥

७

ऐसें जग नाना जग नाना । आत्मा एकचि जाणा ॥ ध्रु० ॥
उदंड शाखा पानें । परि तो एकचि तरु अभिधानें ॥ १ ॥
नाना प्रतिबिंबींचा । परि तो भानू एकचि साचा ॥ २ ॥
अपार जलधर धारा । उद्धवचिद्धन तोय उबारा ॥ ३ ॥

उद्धवचिद्धनाच्या कांहीं आरत्या एका जुन्या बाडांत मिळाल्या. त्या अद्याप अप्रसिद्ध असाव्या, असें वाटल्यावरून त्यांचा येथें संग्रह केला आहे:—

आरती.

१

'तत्त्वमसि' पद ऐसें वाक्य त्रैवाती । अनुभवपात्रीं विचार आज्येंसी निगुती ।
तेथें संयोजिली आत्मत्व ज्योती । प्रकाशला दीप न दिसे दिनराती ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय सद्गुरुनाथा । एकीं एकारती अर्पण अद्वैता ॥ ध्रु० ॥
प्रकाश प्रकाशतां प्रकाशला भाव । स्वप्रकाशें सहजें त्रि... हे वाव ॥
तेथें उरोनि नुरण्या नुरण्याचा ठाव । वोवाळी उद्धवचिद्धन गुरुदेव ॥ २ ॥

२

नाना शाखा पाने लवणें रुचि आली । वोदन ओंकाराचें वरण वर घाली
पूर्ण पूर्णपोळी भक्ति चौघडिली । क्षराक्षरविरहित उत्तम क्षीर केली ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय स्वसंवेद्या । अंगीकारीं सद्गुरु... नैवेद्या ॥ ध्रु० ॥
सारासार मथुनी अनुभव नवनीत । वैराग्याग्नित कढवुनि सुवास मघमघित ।
ऐसें ठायीं ठेवुनि सत् सद्यः तप्त । उद्धवचिद्धन साखर सद्भावासहित ॥ २ ॥

३

अन्नें प्राणें माया मानस आनंदें । पंचकोश पंचवाती .......... ॥
ज्ञानस्नेहामाजी भिजवुनियां शुद्ध । चैतन्याचा दीप उजळे प्रसिद्ध ॥ १ ॥
जयदेव जयदेव जय स्वप्रकाशा । पंचारति सप्रेम सद्गुरु सर्वेशा ॥ ध्रु० ॥
ज्याला स्तवितां कोटी शशि कोटी कोटी । पावक पाहतां दिवसा खद्योत सृष्टी ।
दृश्य द्रष्टा दर्शन न दिसे त्रिपुटी । उद्धवचिद्धन अद्वय हारपला पोटीं ॥ २ ॥

आणखी एक आरती आहे, पण ती फार अशुद्ध आहे. प्रसिद्ध ध्रुवाख्यानाच्या दिंड्या चिंतामणि कवीच्या आहेत, असें नवनीतांतल्या त्या प्रकरणाच्या शेवटल्या दिंडीवरून दिसतें; परंतु सदर प्रकारणाच्या कांहीं हस्तलिखित प्रतींतील शेवटचा चरण 'उद्धवचिद्धन गाउनी गुण त्याचे ।' असा आढळतो; व त्यावरून हें ध्रुवाख्यान उद्धवचिद्धनकृतच असावें असें वाटते.

उद्धव स्वामीचे मामा व गुरु चिद्धनस्वामी यांनी केलेली एक तुळशीची भूपाळी एका जुन्या वहींत मिळाली, तीही पुढे दिली आहे:—

उठोनियां प्रातःकाळीं । तुळसी वंदावी माउली ।
तुळसी सताची साउली । मुकुटीं वाहिली विष्णुनें ॥ १ ॥
तुळसीचे किती पवाडे—। वर्णूं, कृष्णासी आवडे ।
तुळसी सेविलिया घडे । पुण्य गाढें आपणा ॥ २ ॥
तुळसी असे ज्याचे द्वारीं । लक्ष्मी वसे त्याचे घरीं ।
आपण स्वयें तो श्रीहरी । क्रीडा करी गोविंद ॥ ३ ॥
तुळसीसी मंजुऱ्या येतां । पळ सुटे यमदूतां ।
अद्वयतुळसी कृष्ण स्मरतां । नाश दुरितां चिद्धनीं ॥ ४ ॥



# चिदानंदस्वामी.

सावंतवाडी संस्थानांत तेंडुली नामक एक गांव आहे; तेथें 'बागलांची राई' या नांवाची एक रमणीय वाडी आहे. त्या ठिकाणीं सुमारें दोनशें वर्षांपूर्वी, कुडाळदेशस्थ गौड ब्राह्मण ज्ञातीचे 'चिदानंद' या नांवाचे एक महान् सत्पुरुष होऊन गेले. ह्यांचे वंशज हल्लीं तेथें राहत असून, त्यांच्या संग्रहीं स्वामींची थोडीशी कविता आहे. चिदानंदस्वामीसंबंधानें त्यांच्या वंशजांस फारशी माहिती नाहीं. बागलांची राई येथें स्वामींची भव्य व मजबूद समाधि असून, तिजवर श्रीशंकराची पिंडी स्थापन केली आहे. चमत्कारांच्या गोष्टी काल्पनिक किंवा साधु-संतांच्या शिष्यांनीं आपापल्या गुरूंचें माहात्म्य वाढावें म्हणून रचलेल्या असतात, अशी ज्यांची समजूत असेल, त्यांनीं कृपा करून वरील पवित्र स्थळ एकवार अवश्य अवलोकन करावें, अशी आमची शिफारस आहे.

स्वामींच्या समाधीवर एक चौकोनी लांकडी तुळई आहे, तींत महाशिवरात्रीपासून पाण्याचे तुषार उत्पन्न होऊन, त्या उदकाचा खालील पिंडीवर, मृगाचा पाऊस पडेपर्यंत सारखा अभिषेक होत असतो 'चक्षुर्वै सत्यं' या न्यायानें पुष्कळ सद्गृहस्थांनीं हा चमत्कार प्रत्यक्ष पाहिला आहे व त्यांपैकीं दोघांनीं केरळकोकिळांत व इंदुप्रकाशांत आपला अनुभव प्रसिद्धही केला आहे. वर ज्या तुळईतून जलप्रवाह चालू होतो म्हणून लिहिलें, ती तुळई कांहीं वर्षांपूर्वी नवीन घालण्यांत आली, त्यावेळीं कित्येकांस अशी शंका आली कीं, जुन्या तुळईप्रमाणें या नव्या तुळईतून पाण्याचा अभिषेक होणार नाहीं; पण अनुभवांतीं ही शंका खोटी ठरली. चमत्कारांवर ज्यांचा विश्वास नसेल, त्यांनीं हा प्रकार एक वेळ प्रत्यक्ष पाहून, त्याची उपपत्ति

प्रसिद्ध केल्यास माझ्यासारख्या भोळ्या लोकांवर त्यांचे मोठे उपकार होतील.

वर सांगितलेली लांकडी तुळई फारशी भक्कम नसून, तिचा घेर फार तर पांच सहा इंच असेल. त्या तुळईच्या तीन बाजू अगदीं कोरड्या असून, खालची बाजू मात्र पाण्यानें डबडबलेली असते. तिजवर दहिंवरासारखे तेजःपुंज जलबिंदु दिसतात व ते एकास एक मिळून त्यांचें थेंब थेंब पाणी खालील पिंडीवर गळत असतें. हा विलक्षण प्रकार अवलोकन करितांच मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें व प्राकृत मानवी ज्ञानास अगोचर अशी कांहीं तरी शक्ति सत्पुरुषांच्या ठायी वास करीत असली पाहिजे, याबद्दल प्रेक्षकाची खात्री होऊन चुकते. तरीपण मनुष्यमात्राचें अंतःकरण निसर्गतःच संशयी असल्यामुळें, सदर चमत्काराची कांहीं तरी उपपत्ति लावतां येईल तर लावावी, या हेतूनें प्रेक्षक आपल्या चर्मचक्षूंचा यथाशक्ति उपयोग करून पाहतो व शेवटीं त्यास 'अज्ञेय अज्ञेय!' असें ह्मणावें लागून, स्वस्थ बसावें लागतें. कोणी तरी कावेबाज व स्वार्थी लोकांनीं, भोळ्या बापड्यांस मोह पाडून त्यांजकडून आपला तळिराम गार करून घेण्यासाठीं हें थोतांड उभारलें आहे म्हणावें, तर अशा प्रकारचे स्वार्थसाधु किंवा भटभिक्षुक तेथें मुळींच नाहींत. या समाधीजवळ स्वामींच्या वंशजांचें घर आहे व समाधीच्या खर्चासाठीं सरकारांतून जमीन इनाम देण्यांत आली आहे. त्या जमिनीच्या उत्पन्नांतून स्वामींचे वंशज समाधीच्या पूजेचा व नैवेद्याचा खर्च चालवितात. पण यापलीकडे, स्थानमाहात्म्य वाढविण्याचा त्यांचा बिलकुल प्रयत्न नाहीं. समाधीची हल्लींची स्थिति फारशी सामाधानकारक आहे, असेंही नाहीं. ही समाधि ज्या ठिकाणी आहे, तें ठिकाण एका टेंकडीवर असून, सभोंवतालच्या नारळीच्या व सुपारीच्या वृक्षांमुळें त्यास एकप्रकारचें सहजमनोहर स्वरूप प्राप्त झालें

आहे. हल्लींची तुळई घालण्यापूर्वी, जुनी तुळई मोडून पडली होती; त्यावेळीं तिच्या जागीं विजयादशमीच्या दिवशीं फुलांच्या माळा बांधण्यासाठीं एका बांबूची योजना करण्यांत आली होती; पण चमत्काराची गोष्ट ही कीं, महाशिवरात्रीचा दिवस उगवतांच, त्या बांबूंतून पाण्याचा अभिषेक होऊं लागला! व ही गोष्ट शेंकडो लोकांनीं प्रत्यक्ष पाहिली आहे. स्वामींप्रमाणेंच त्यांचे दोन पुत्रही मोठे भगवद्भक्त होऊन गेले; त्यांच्या समाधि स्वामींच्या समाधिगृहांत बाहेरच्या बाजूस आहेत. ह्या समाधिगृहासमोर जवळच एक पिंपळाचा जुनाट वृक्ष असून, त्यासंबंधानें आज असा चमत्कार आहे कीं, कितीही मोठा सोसाट्याचा वारा आला, तरी इतर पिंपळवृक्षांप्रमाणें, या वृक्षाच्या पानांचा 'सळसळ' असा शब्द बिलकुल होत नाहीं; वाऱ्यानें पानें मात्र हालतात. यासंबंधानें अशी कथा सांगतात कीं, स्वामी एकदां पुराण वाचीत असले असतां, वाऱ्यानें पिंपळाचीं पानें वाजूं लागल्यामुळें त्यांच्या वाचनास विक्षेप होऊं लागला. तेव्हां स्वामींनीं, 'सळसळ शब्द करूं नकोस' अशी आज्ञा हस्तसंकेतानें त्या वृक्षास केली व तेव्हांपासून ती आज्ञा तो सारखा पाळीत आला आहे. ह्या सत्पुरुषास समाधिस्थ होऊन आज दोनशें वर्षे होऊन गेलीं, पण आज त्यांचे हे चमत्कार पाहून त्यांच्या अलौकिक सामर्थ्यासंबंधानें प्रेक्षकांच्या अंतःकरणांत भक्तिभाव व पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं.

स्वामींच्या वंशजांच्या संग्रहीं स्वामींचा एकच ग्रंथ आढळला. हा ग्रंथ म्हणजे, संस्कृत गुरुगीतेवर '**स्वानंदलहरी**' नामक प्राकृत ओंवीबद्ध टीका होय. हिचे अध्याय १४ असून ओंवीसंख्या १००० आहे. स्वामींची वाणी किती प्रासादिक व अनुभवयुक्त आहे, हें पुढील ओंव्यांवरून समजेल:—

आशापाश विशाळ । शतबंध वसती प्रबळ ।
ऐसा संसार दुःखमूळ । पाववी सकळ पतनातें ॥ १ ॥
ऐसें ससार घोर विघ्न । त्यातें गुरुगीता ही कृतघ्न ।
जपता करितसे भग्न । होई निमग्न भावेंसी ॥ २ ॥
सर्व सिद्धि येउनी तेथ । होऊनि भक्तांचा निजभृत्य ।
दिनरात्रीं गृहीं नांदत । ऐसा महिमा ये ग्रथीं ॥ ३ ॥
भुक्ति नांदे देहीं असतां । मुक्ति सर्वदा येतसे हाता ।
अंतीं सायुज्याच्या माथा । भोगी कांता मुक्ति तो ॥ ४ ॥
सत्य सत्य हें पुनः सत्य । मी धर्म देवी केला उदित ।
गुरुगीतेऐसा ग्रंथ । नाहीं मात अवधारीं ॥ ५ ॥
हें बोलणें जाणिजे सत्य । बोलिलों सत्याचें निज सत्य ।
न शिवे तिळमात्र असत्य । धरिजे सत्य मानसीं ॥ ६ ॥
या परिचा निजधर्म । जे गुह्याचें निजवर्म ।
देवी म्या करूनि सुगम । ओपिला उगम तुजलागीं ॥ ७ ॥
गुरुगीतेसी लाविता तुळी । समता नाहीं भूमडळीं ।
सकळ शास्त्रांची मुळी । गीता बाळी जाणिजे ॥ ८ ॥
मृगासनावरी देखा । बैसूनि जपतां ग्रंथमालिका ।
सकळ ज्ञानाची सिद्धि जे कां । होय एका क्षणार्धे ॥ ९ ॥
घालोनियां व्याघ्रांबर । नित्य विलोकी हा ग्रंथसार ।
तोही अंतीं मोक्षद्वार । पावे साचार जाण तूं ॥ १० ॥
दर्भासनी बैसूनि जाण । भावें ग्रंथाचें करी अवलोकन ।
करिता वृद्धि होय दारुण । गृहीं जाण अंबिके ॥ ११ ॥
आसन बोलिजे निर्मळ । पवित्र जें कां शुभ्र कंबळ ।
घालुनी हा ग्रंथ सोज्वळ । सिद्धि सकळ ओळंगती ॥ १२ ॥
येथें प्रीत धरी जयाचें मन । तो लेउनि होय समाधान ।
हतदैवी जो अभाग्य जन । न भोगी आपण सर्वथा ॥ १३ ॥
हे वाणी नोहे प्राकृत । निज गुह्याचा गुह्यार्थ ।
आनंदाचा एकांत । गुरुभक्त जाणती ॥ १४ ॥

जे आदिशक्ति महामाया । जे चैतन्यशिवाची स्वरूपकाया ।
तिणें पुसोनियां ग्रंथान्वया । दावी उपाया सकळांसी ॥ १५ ॥
हो सरळ भक्तीची मूळ वाट । हाचि सर्व साधनांचा शेवट ।
गुरुभक्तीहूनि श्रेष्ठ । नाहीं स्पष्ट सर्वत्रीं ॥ १६ ॥

स्वामींचा हा ग्रंथ रा० आनंदराव बाळकृष्ण रांगणेकर यांनीं शके १८३३ सालीं छापून प्रसिद्ध केला आहे, त्याच्या आरंभीं त्यांनीं जी स्वामींची माहिती दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—" या सत्पुरुषाचें जन्म शके १६३० च्या सुमारास सावंतवाडी संस्थानांतील आजगांव नांवाच्या गांवीं एका घरंदाज व कुलीन घराण्यांत झालें. यांचें पूर्वाश्रमींचे नांव रुद्राजी बाळकृष्ण प्रभु मतकरी असून, आईचे नांव रमाबाई होतें. हे कुडाळदेशस्थ गौड ब्राह्मण असून, यांचें गोत्र भारद्वाज होतें. यांचे वडील बाळकृष्ण हे चांगले कर्मनिष्ठ होते. परंतु आपल्या एकुलत्या एक मुलाचें मौजीबंधन करण्यापूर्वींच ते इहलोकींची यात्रा आटोपून गेले. यामुळें मुलाचे संगोपनाची जबाबदारी मातोश्रीवर पडली. बाळकृष्णपंत यांची घरची स्थिति केवळ गरिबीची नव्हती. ते ग्रामाधिकारी घराण्यांपैकीं होते. परंतु त्यांचे भाऊबंदांत यावेळीं कलहाग्नि माजून राहिला होता. शिवाय देशाची राजकीय परिस्थितीही अगदींच प्रतिकूल होती. अशा स्थितींत रमाबाईनें आपल्या मुलाचें मौजीबंधन कसेंबसें उरकून घेतलें व भाऊबंदांच्या भीतीनें, आपल्या मुलास घेऊन, ती आपल्या माहेरीं—वेतोरें गांवीं—जाऊन राहिली. यावेळीं रुद्राजींचें वय सुमारें १० वर्षांचें होतें. विद्याभ्यासाचे सुरुवातीसच बाप निवर्तल्यामुळें बाळबोध बाराखड्या लिहिण्यावाचण्या—पलीकडे त्यांचा अभ्यास झाला नव्हता. पुढें, आजोळीं विद्याभ्यास पुढें चालविण्याची सोय नसल्यामुळें, त्यांना आपल्या आजोबांच्या गाई—म्हैशी राखण्याचा उद्योग करावा लागला. नशिबीं आलेला हा उद्योग रुद्राजीपंत

मोठ्या आनंदानें करीत असत. परंतु विद्याभ्यास करण्याची त्यांची उमेद नष्ट झाली नव्हती. कारण, शिकलेल्या बाराखड्या म्हैशी-रेड्यांचे पाठीवर ते काठीनें लिहित असत ! एके दिवशीं ते खडेसल नांवाच्या जंगलांत गुरें चारणीस सोडून एकांतांत बसले असतां, एका व्याघ्रासह एक देदीप्यमान् संन्यासी आपल्याकडे येत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. रुद्राजी हे आधींच फार धीट होते; त्यांत स्वतःच्या दुःस्थितीमुळें जीवित त्यांस तृणप्राय वाटत असे. यामुळें ते न डगमगतां त्यांनीं मोठ्या प्रेमानें धांवत जाऊन स्वामीच्या पायांवर मस्तक ठेविलें व त्यांची करुणा भाकली. त्या सिद्ध पुरुषानें त्यांचें हृद्गत जाणून त्यांस पूर्ण ब्रह्मोपदेश दिला व त्यांचें नांव चिदानंद ठेवून त्यांस घरीं जाण्यास सांगितलें. परंतु आपल्या गुरूंचा सहवास सोडून जाण्यास चिदानंदाचें मन घेईना. पुढें ते गुरु-शिष्य त्या ठिकाणीं आठ दिवस राहिल्यावर, गुरूंनीं चिदानंदांस आपण उत्तरयात्रा करून परत येईपर्यंत घरीं जाऊन राहण्यास सांगितलें. ही गुर्वाज्ञा ऐकून चिदानंदांस फार वाईट वाटलें; व याउप्पर गुरुचरण-सेवेस न अंतरण्याचा आपला निश्चय त्यांनीं नम्रपणें विदित केला. तेव्हां "निदान तूं आपल्या मातोश्रीस तरी भेटून ये; तोंपर्यंत मी येथेंच राहतों" असें वचन देऊन गुरुजींनीं त्यांस घरीं पाठविलें. इकडे रुद्राजीच्या आईनें व तिच्या माहेरच्या मंडळीनें रुद्राजीपंतांचा चार–पांच दिवस शोध केला. परंतु कांहींच पत्ता न लागल्यामुळें, बिचाऱ्या रमाबाईनें निराशेनें बिछाना धरला होता. पुढें, वर सांगितल्याप्रमाणें चिदानंद हे जेव्हां तिला येऊन भेटले, तेव्हां तिला किती आनंद झाला असेल, हें सांगावयास नकोच. चिदानंदांनीं आपल्या मातेच्या चरणावर मस्तक ठेविलें. त्यांची गंभीर व सतेज मुद्रा पाहून सर्व मंडळींस फार आश्चर्य वाटलें. आठ दिवस उपासमार होऊन आपल्या मुलाचे फार हाल झाले असतील, अशा समजुतीनें

रमाबाईनीं चिदानंदांची खाण्या–पिण्याची व्यवस्था फार चांगली ठेविली होती, परंतु त्यांचें मन गुरुचरणीं गुंतलें असल्यामुळें त्यांनीं परत जाण्यास मातोश्रीची परवानगी मागितली. त्यांचा हा विलक्षण आग्रह पाहून सर्व मंडळीस सखेदाश्चर्य वाटलें. शेवटीं, त्यांचा निश्चय ढळत नाहीं, असें पाहून रमाबाईनेंही त्यांजबरोबर जाण्याचें ठरविलें. व कांहीं वेळानें तीं दोघेंही अरण्यांत त्या सत्पुरुषापाशीं येऊन दाखल झालीं. रमाबाईनें आपलें मस्तक स्वामींच्या चरणावर ठेवितांच त्यांनीं आपला वरद–हस्त तिच्या मस्तकावर ठेवून, तिच्या अंतःकरणांत ज्ञानदीपाचा उज्ज्वाल प्रकाश पाडिला. मुलास लागलेलें वेड दूर करण्याच्या निश्चयानें निघालेली रमाबाई स्वतःच वेडी झाली ! शेवटीं त्या साध्वीस घरीं जाण्यास सांगून व आपण चिदानंदांसह उत्तर–यात्रा पुरी करून बारा वर्षांनीं परत येतों; असें तिला आश्वासन देऊन स्वामी तेथून निघून गेले. रमाबाईनें घरीं येऊन कच्ची हकीकत मंडळीस निवेदन केली, तेव्हां सर्वांस फार आश्चर्य वाटलें. पुढें बारा वर्षांनीं ते गुरु शिष्य परत आल्यावर त्यांनीं वेतोरें येथेंच एक वर्ष मुक्काम केला. या अवधींत रमाबाईचें देहावसान झालें. चिदानंदांनीं पुत्रधर्मानुसार मातेचा यथाशास्त्र उत्तरविधि आटोपल्यावर गुरु–शिष्यांची जोडी दक्षिण–यात्रेस निघून गेली व थोड्याच अवधींत आजगांव येथें येऊन दाखल याली. येथें, जनरूढीप्रमाणें चिदानंदस्वामींनीं कुलदेवतेचें व ग्रामदेवतेचें दर्शन घेतलें. पुढें आजगांव येथें त्यांनीं बरेच दिवस वास्तव्य केलें. या अवधींत त्यांनीं चमत्कारही पुष्कळ केले. त्यांच्या गुरूंचें नांव पूर्णानंद होतें. पुढें कांहीं दिवसांनीं, पूर्णानंद स्वामींनीं दाभोली येथील मठाचें आधिपत्य स्वीकारण्याचें कबूल केलें व त्या जागीं आपल्या वतीनें काम करण्याची व गृहस्थाश्रम स्वीकारण्याची चिदानंदांस त्यांनीं आज्ञा केली. चिदानंदस्वामींकडे मठाचे सर्व अधिकार सोंपविण्यांत

आले. त्याप्रमाणें ते यथाशास्त्र धर्मदंडाधिकार चालवीत असत. सावंतवाडी संस्थानचे त्या वेळचे राजे सरदेसाई खेमसावंत भोंसले यांनीं वरील मठासंबंधानें पुढील राजाज्ञा जाहिर केली होती:—

श्रीमठ दाभोली येथील मठाधिकारी श्रीमत् चिदानंदाश्रम संन्यासी यांचे व यांचे शिष्यपरंपरेचे आज्ञेप्रमाणें आचार, व्यवहार व प्रायश्चित्तादि कर्म चालवीत जाणें. त्यांस अडथळा करतील त्यांचें पारिपत्य केलें जाईल. इत्यादि०

वर सांगितल्याप्रमाणें, गुर्वाज्ञानुसार चिदानंदस्वामींनीं एका स्वज्ञातीय कुलीन गृहस्थाच्या कन्येशीं यथाशास्त्र विवाह केला. या वेळीं त्यांचें वय सुमारें ४० वर्षांचें होतें. त्यांच्या पत्नीचें नांव पार्वती. पार्वतीबाईच्या पोटीं सहा मुलगे व एक मुलगी अशीं अपत्यें झालीं. चिदानंदस्वामींचे सर्व पुत्र मोठे भगवद्भक्त होते. त्यांपैकीं दोघांनीं गृहस्थाश्रम न स्वीकारतां, संन्यासदीक्षा घेतली होती. या दोन्ही मुलांच्या समाधि स्वामींच्या भव्य समाधिगृहांतच आहेत. हें समाधिगृह ज्या 'बागलांच्या राईंत' आहे, त्या ठिकाणीं स्वामींनीं वसति करण्याचें कारण असें समजतें कीं, स्वामी एक वेळ गुरुदक्षिणेसाठीं निघाले असतां केळूस नामक गांवीं गेले. तेथील एक गृहस्थ ब्रह्मसमंधाचे पीडेमुळें प्रेतवत् होत असे. त्याप्रमाणें एके दिवशीं तो प्रेतवत् होऊन पडला असतां, स्वामी त्या ठिकाणीं गेले. तेव्हां त्या गृहस्थाच्या घरच्या माणसांनीं त्यांचे पाय धरले. त्यावेळीं स्वामींनीं आपल्या कमंडलूंतील उदक सिंचून त्या गृहस्थास जागृत केलें. पुढें, त्याची ब्रह्मसमंधाची पीडा कायमची नाहींशी होण्यास जें अनुष्ठान करणें अवश्य होतें, त्या अनुष्ठानास योग्य अशी ही एकांत जागा स्वामींनीं पसंत केल्यावरून ती पन्नास होन देऊन त्या गृहस्थानें विकत घेऊन दिली. त्यावेळीं या राईंत वाघ, तरस, लांडगे वगैरे हिंस्र पशूंची वस्ती असल्यामुळें,

तिकडे सहसा कोणी जात नसे. परंतु या प्राण्यांशीं स्वामी फार सलगीनें वागत असत.

पुढें स्वामींच्या इच्छेवरून ही व आसपासची उत्पन्नाची जमीन सरकारांतून त्यांस इ० स० १६७०त इनाम देण्यांत आली. ती अद्याप त्यांचे वंशजांकडे चालत आहे. अशा प्रकारें, प्रपंच व परमार्थ हीं दोन्हीं साध्य करून आपल्या वयाच्या ८०व्या वर्षी स्वामी समाधिस्थ झाले. त्यांनीं अनेक ग्रंथ लिहिले होते व ते निपाणी येथील त्यांच्या एका शिष्यांच्या मठांत होते. पण दुर्दैवानें तो मठ अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडला, त्या वेळीं ते ग्रंथही कायमचेच नष्ट झाले. स्वानंदलहरी ग्रंथांत स्वामींनीं आपली गुरुपरंपरा दिली आहे, ती येणेंप्रमाणें:—

ओंव्या.

बेलग्राम कर्नाटिका । तेथें चिदानंद मूळपीठिका ।
प्रत्यक्ष भोगावती देखा । आसनासन्मुख आली असे ॥ २८ ॥
साही प्रहर स्थिरपणीं । राहिला सावेव जीवनीं ।
स्नान केलें ब्राह्मण जनीं । धन्य वाणी बोधिली ॥ २९ ॥
तो परात्पर श्रीगुरु । त्यानें बोधिला बोधसागरू ।
विमलानंद यतीश्वरू । सर्व विचारू जाणता ॥ ३० ॥
जन्मांधासि दिधले नेत्र । हंदी खंडी आश्रम पवित्र ।
चारी आश्रमांचें सूत्र । लेइला पवित्र सर्वांगा ॥ ३१ ॥
तो परमेष्टि अवतार । तेणें शिष्या दाविला पार ।
विश्वानंद नाम सुंदर । ठेवूनि कर मस्तकीं ॥ ३२ ॥
तो सकळ शास्त्रार्थी ज्ञानकंद । सेवड ग्रामीं नांदे प्रसिद्ध ।
परम गुरु तो महासिद्ध । वाचे अगाध बोलतां ॥ ३३ ॥
त्याची होऊनि पूर्ण दया । पूर्णानंद श्रीगुरुराया ।
प्रांत कुडाळ दाभोली ठाया । करितो दया दीनातें ॥ ३४ ॥

वंध्या जाहली पुत्रवती । तैसी त्यानें मज दिधली बोधशक्ति ।
मुक्या भेटला बृहस्पती । वाचे किती अनुवादों ? ॥ ३५ ॥

स्वामींनीं ग्रंथसमाप्तीचा कालही दिला आहे:—

शके सोळाशें चौऱ्याहत्तरासी । संवत्सर अंगिरा वर्षी ।
चिदानंदें सुख उल्हासीं । ग्रंथ टीकेसी लेखिलें ॥ ४७ ॥
इंदुवारी एकादशी । शुक्लपक्षीं पौषमासीं ।
दोन प्रहर माध्याह्नेसी । ग्रंथ टीकेसी पूर्णता ॥ ४८ ॥

अध्याय १५.

कोंकणांतील मराठे लोकांच्या लग्नकार्यांत बायका जमून 'घाणा' व 'आंबा' नामक गाणीं म्हणण्याचा प्रघात आहे. एकदां हीं गाणीं स्वामींनीं ऐकलीं, तेव्हां गूढार्थपूर्ण अशीं नवीन गाणीं तत्काल रचून त्यांनीं म्हणून दाखविलीं; त्यांपैकीं एक गाणें पुढें दिलें आहे:—

घाणा.

नमन गणेश्वरा गौरीच्या कुमरा । शारदा सुंदरा नमियेली ॥ १ ॥
सद्गुरु प्रारंभ ॐकार हा कोष । विवाह आरंभ स्थूलदेहीं ॥ २ ॥
निजशांती नोवरी निर्गुण साकरी । सुलग्नाची परी ऐका श्रोते ॥ ३ ॥
कुळदेव नमिला घाणा आरंभिला । उल्हास मांडिला देहामाजी ॥ ४ ॥
प्रथम मूळाधारीं चौघी कुमरी । स्वाधिष्ठानावरी सहाजणी ॥ ५ ॥
दश बाळा मणिपुरा, अनुहातींच्या बारा । घाणा पूर्ण बरा कांडिताती ६
विशुद्धि सोळाजणी अग्निचक्रीं दोनी । घाणा आरंभुनी सिद्ध केला ॥ ७ ॥
पन्नास कुमरी घाणा भरियेला । नाद उसळला अनुहात ॥ ८ ॥
वो माई वरमाया ब्रह्मस्थानी दोघी । सामग्री सवेगी केली पहा ॥ ९ ॥
त्रैलोक्याच्या नारी हा घाणा पैं गाती । त्यांसी ज्ञानमुक्ति प्राप्त होय १०
घाण्याची सिद्धि जाली पूर्ण बोधीं । चिद् पूर्णानंदीं ओळंगत ॥ ११ ॥

———

# कचेश्वर.



ह्या कवीसंबंधानें इतिहाससंग्रह मासिक पुस्तकाच्या पांचव्या व सरस्वतीमंदिराच्या शेवटच्या अंकांत थोडीशी माहिती देण्यांत आली आहे, तिच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे. याशिवाय, भारतइतिहास–संशोधक–मंडळाच्या एका सभेंत या कवीची कांहीं नवीन माहिती एका सभासदानें सांगितली होती, परंतु ती अद्याप अप्रसिद्ध असल्यामुळें तिचा संग्रह प्रस्तुत निबंधांत करितां येत नाहीं. याबद्दल वाईट वाटतें.

हा कवि सातारचे थोरले शाहूमहाराज छत्रपति यांच्या कारकीर्दीत होऊन गेला. कचेश्वरांची बरीच कविता हल्लीं काव्यसंग्रहांतून प्रसिद्ध झाली आहे. कचेश्वर हे पुणें जिल्ह्यापैकीं खेड तालुक्यांतील चाकण गांवीं एका वैदिक ब्राह्मणाच्या घराण्यांत जन्मले. हे जातीनें ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण, उपनांव ब्रम्हे, गोत्र काश्यप. कचेश्वर हे चाकणच्या रानांत आश्रम बांधून, मुलांबाळांसह अयाचित वृत्तीनें राहत असत. हे मोठे तपस्वी व सत्त्वसंपन्न असल्यामुळें, त्यांचा योगक्षेम चालविण्याच्या कामीं लोकही यथाशक्ति साहाय्य करीत असत. कचेश्वर चाकण येथें असतां, छत्रपति शाहू महाराज हे दिल्लीश्वराच्या कैदेंतून सुटून दक्षिणेंत आले व ताराबाईकडून आपलें राज्य मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला. एके दिवशीं ते चाकण गांवांतून जात असतां, जवळच रानांत कचेश्वराचा आश्रम असल्याचें त्यांनीं ऐकिलें; तेव्हां अशा सत्पुरुषाचें अवश्य दर्शन घ्यावें या हेतूनें ते कचेश्वरांच्या आश्रमीं गेले. कचेश्वरांनीं महाराजांचा यथोचित आदर–सत्कार करून त्यांस भोजनाकरितां ठेवून घेतलें. भोजनोत्तर महाराजांनीं कचेश्वर व त्यांची पत्नी यांस वंदन

करून त्यांचा आशीर्वाद घेतला. पुढें सातार्‍यास जाऊन व ताराबाईचा पराभव करून आपलें राज्य त्यांनीं मिळविलें. नंतर, कचेश्वरांस सातार्‍यास आणून, महाराजांनीं त्यांचा उपदेश घेतला. त्यांनीं कचेश्वरांस पुष्कळ द्रव्य देऊं केलें, पण त्या निरपेक्ष पुरुषानें त्याचा स्वीकार केला नाहीं. कचेश्वर हे पुढें सातारा येथेंच अयाचित वृत्तीनें राहिले. महाराजांकडून त्यांस नित्य शिधा येत असे, पण त्यापैकीं निर्वाहापुरतें घेऊन, बाकीचा शिधा ते परत करीत असत. महाराजांनीं कचेश्वरांचा उपदेश घेतल्यापासून लोक त्यांस 'राजगुरु' म्हणूं लागले. पुढें त्यांच्या वंशासही 'राजगुरु' हें उपनांव पडलें व तें हल्लींही चालू आहे. कचेश्वरांच्या एका शिष्यानें 'आदि' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे, त्यांत त्यानें कचेश्वरांचें वर्णन दिलें आहे. सातार्‍यास कांहीं वर्षे राहिल्यावर, तें शहर सोडून कचेश्वर हे कृष्णातीरीं उंब्रज येथें येऊन राहिले.

आपण देऊं केलेलें वैभव कचेश्वरांनीं घेतलें नाहीं किंवा आपल्या पुत्रांसही घेऊं दिलें नाहीं, हें पाहून महाराजांनीं, रामचंद्र खटाटोपे म्हणून कचेश्वरांचा एक शिष्य होता, त्याच्या हातावर गुरु-दक्षिणोद्देशानें सहा गांवांचें दानोदक सोडिलें. पुढें खटाटोपे यांनीं ते सहा गांव कचेश्वरांच्या पुत्रांच्या नांवें करून दिले. ते सहा गांव येणेंप्रमाणें:—सातारा जिल्ह्यांत १ सासवडें व २ अतीत; आणि पुणें जिल्ह्यांत ३ वाकी बुद्रूक ४ चांडोली ५ धावडी व ६ पांगरी. कचेश्वरांस दोन पुत्र होते, त्यांपैकीं एकाच्या वंशजांकडे अतीत, वाकी बुद्रूक व चांडोली हीं तीन गांवें चालतात; व बाकीचीं तीन गांवें दुसर्‍या मुलाच्या वंशजांकडे आहेत. हे वंशज हल्लीं अतीत व सासवडें ह्या गांवीं राहतात. ह्या सहा गांवांचें एकंदर उत्पन्न सुमारें पंधरा–वीस हजारांचें आहे; पण दुःखाची गोष्ट ही कीं, ह्या इनामाचा बहुतेक भाग हल्लीं ऋणग्रस्त आहे.

रा० रा० विश्वनाथ काशीनाथ राजवाडे ह्या शोधक गृहस्थांनीं सरस्वतीमंदिर मासिकपुस्तकांत ह्या कवीसंबंधानें जी माहिती दिली आहे, तिचा सारांश येणेंप्रमाणें:—कचेश्वरांचे वंशज हल्लीं पुणें जिल्ह्यांत खेड येथें राहतात, ते आपणांला 'राजगुरु' म्हणवितात. जुन्या कागदपत्रांत कचेश्वरांचा उल्लेख 'कचेश्वरभट' या नांवानें केलेला आढळतो. शाहुमहाराज शके १६०३ मध्यें साताऱ्यास जात असतां, खेड येथें कचेश्वरांनीं त्यांस 'तुला राज्य मिळेल' असा आशीर्वाद दिला. एकदां अवर्षण पडलें असतां, चाकणच्या मुसलमान किल्लेदारानें कित्येक ब्राह्मणांस कोंडून ठेविलें व 'तुमच्या देवास पाऊस पाडण्यास सांगा' असें म्हणून त्यांस चिडविलें. ब्राह्मणांनीं कचेश्वराकडे बोट दाखवून, हा पाऊस आणील, असें सांगितलें. किल्लेदारानें कचेश्वरांस धमकी दिली. कचेश्वरांनीं भर दोन प्रहरीं भजनास प्रारंभ केला; तों एकावर एक मेघ येऊन दोन घटकांत सर्वत्र पाणीच पाणी झालें, आणि सर्व ब्राह्मणांची बंदींतून सुटका झाली. 'राजगुरूं'च्या दप्तरांत कचेश्वरांसंबंधाचे कांहीं कागदपत्र सांपडले, त्यांत शिवाजी महाराजांसंबंधानें खालील कविता आढळली:—

आला असे वीरवतंस राजा । मार्गे तुम्ही मोगल हो जरा जा ॥
मी सांगतों हें जरि आइकाना । तुम्ही गमावालहि नाकका ना ॥ १ ॥
पृथ्वीवरी पाप बहूत केलें । तें तों तुम्हा सर्व फळास आलें ॥
गाई द्विजांला बहु पीडिलेंसे । शापें तयांच्या तप वेंचलेंसे ॥ २ ॥

ह्या श्लोकांतील 'वीरवतंस' हा शब्द कवीनें शिवाजीस अनुलक्षून योजिला आहे, अर्थात् या कविता शिवाजीसंबंधाच्याच

१ प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांत गोपाळनाथ मळगांवकरांचें चरित्र दिलें आहे, त्यांतही अशाच एका चमत्काराचें वर्णन आलेलें वाचकांस आठवत असेलच.

आहेत, असें रा० राजवाडे म्हणतात. हे श्लोक कचेश्वरांनीं शके १५९६ च्या सुमारास लिहिले, अशी माहिती मिळाल्याचा उल्लेखही रा० राजवाडे यांनीं केला आहे; यावरून, शके १५९९ त निगमसार ग्रंथ लिहिणाऱ्या वामनाशीं, शके १६०१ त रसमंजरी काव्याची रचना करणाऱ्या विठ्ठल कवीशीं, शके १६०३ मध्यें समाधिस्थ झालेल्या समर्थांशीं व शके १६४३ त सुलोचनागहिंवर काव्य रचणाऱ्या अनंतकवीशीं कचेश्वर समकालीन होते, हें उघड होत आहे. शिवाजी, संभाजी, राजाराम, दुसरा शिवाजी व शाहू या पांच राजांच्या कारकीर्दी कचेश्वरांनीं पाहिल्या होत्या असें दिसते. शिवाजीमहाराजांच्या उदयकालीं सगळ्या महाराष्ट्रांत जी एक प्रकारची स्फूर्ति व चेतना उत्पन्न झाली होती, तिनें आमच्या परमार्थमार्गानुयायी संतांसही सोडिलें नाहीं, हें कचेश्वर व देवदास यांच्या उदाहरणांवरून स्पष्ट होत आहे. असो.

खेड येथील राजगुरूंच्या दफ्तरांतील कांहीं पत्रें रा० राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत, त्यांपैकीं एका पत्रांत कचेश्वरांनीं बाळाजी विश्वनाथ यांस 'श्रीमत् भगवद्भजनपरायण सद्गुणाधिष्ठान विवेकसागर राजमानविराजित नाना स्वामी गोसावी यांसी' असा मायना लिहून 'अपलें कचेश्वरें नमस्कार विशेप' असें म्हटलें आहे, ह्यावरून बाळाजी विश्वनाथांपेक्षां कचेश्वर हे वयानें ल्हान होते, असें दिसतें. कचेश्वर स्वामी शके १६५३ त वारले, त्यानंतर त्यांचे चिरंजीव देवराव कचेश्वर व जयकृष्ण कचेश्वर यांस राव रंभाजी निंबाळकर यांनीं लिहिलेलें पत्र प्रसिद्ध झालें आहे, त्यांत पुढील वाक्यें आहेत:--मौजे वांकी बुद्रुक पा। चाकण हा गांव सरकारतर्फेनें जागीर, फौजदारी व जिल्हेदारी कुलबाब कुलकानू वेदमूर्ति महाराज राजश्री कचेश्वरबावा कैलासवासी यांस दिल्हा असे. त्यास, ईश्वर इच्छेनें कैलासवास जाला. म्हणोन

सरकारच्या अमिलांनीं तो गांव जप्त केला होता, म्हणोन तुम्ही लिहिलें. त्याजवरून बदस्तूर रसाविला जागीर फौजदारी व जिल्हेदारी कुलबाब कुलकानू दरोबस्त तनखा तुम्हां उभयतांस दिल्हा असे. तरी जोंवर जागीर सरकारांत बहाल, तोंवर सुखरूप गांव खाऊन स्नानसंध्या करून आम्हास आशीर्वाद* देऊन राहणें. ये बाबे सकारच्या अमिलांस व जमीदारांस ताकीद परवाने सादर केले असत, तरी याउपरी कोणी मुजाहीम होणार नाहीं.

कचेश्वरांनीं बाळाजी विश्वनाथांस पाठविलेल्या पत्राचा मागें उल्लेख केला आहे, त्यांत चऱ्होली गांवचें उत्पन्न व खर्च यांचा हिशोब देऊन, शेवटीं 'आमच्या ऋणाची चिंता स्वामीस आहे' असे उद्गार कचेश्वरांनीं काढले आहेत, यावरून, इतिहाससंग्रहांत

---

* समर्थांशिवाय महाराष्ट्रांतले सगळे साधु प्रपंचपराङ्मुख अर्थात् 'पंगु' होते, असें कांहीं पुणेरी विद्वानाचें मत आहे. इतिहासाकडे पाहतां, शहाजी, शिवाजी, शाहू, बाळाजी विश्वनाथ, बाजिराव, विजापूरचा एक बादशहा, चिमाजी आप्पा, महादजी शिंदे, अहल्याबाई होळकरीण, कोल्हापुरचा संभाजी व तिसरा शिवाजी, सावंतवाडीचे सरदेसाई, शिधोजीराव निपाणकर, बापू गोखले या सगळ्या राजकारस्थानी स्त्री-पुरुषांचा, आनंदतनय, रामदास, तुकाराम, स्वानंदस्वामी, कचेश्वर, धावडशीकर स्वामी, मुक्तेश्वर, सिद्धेश्वर, गोपाळनाथ, चिदंबर दीक्षित इत्यादि सत्पुरुषांशीं शिष्यसंबंध होता व त्यांच्या आशीर्वादाची त्यास फार आवश्यकता वाटत होती, ही गोष्ट स्पष्टपणें सिद्ध होत आहे. आतां हे सगळे साधु जर अगदीं 'पंगु' होते, तर त्यांच्या आशीर्वादाची वर नमूद केलेल्या राजकारणी पुरुषांस एवढी आवश्यकता वाटण्याचें कारण काय, याचा खुलासा रा० मुंडले करतील काय ? स्वतः प्रपंचपराङ्मुख असलेले लोक समजसुखासंबंधानेंही पराङ्मुखच होते, असें कां मानावें ? ज्यांच्या आशीर्वादानें आपण स्वराज्य चालवूं, अशी मोठमोठ्या राजकारणी पुरुषांस खात्री वाटत होती ते सत्पुरुष पंगु होते, असें म्हणणें म्हणजे स्वराज्यस्थापनेस पुण्यबलाची आवश्यकताच नाहीं, असें प्रतिपादन करणें होय.

म्हटल्याप्रमाणें कचेश्वरस्वामी अगदींच प्रपंचपराङ्मुख होते, असें दिसत नाहीं. कचेश्वरांनीं आत्मचरित्र लिहिलें होतें, त्याचे पाहिले ९७ अभंग गहाळ झाले असून, पुढचे ५४ अभंग मात्र रा० राजवाडे यांस सांपडले, ते येणेंप्रमाणें:—

ठेवियला माझ्या माथ्यावरी हात । स्वयें जाला गुप्त स्वप्नामाजी ॥
तेथूनियां स्फूर्ति तुकोबानें दिल्ही । येर दिवशीं केली कथा दीनें ॥
स्वरताळ ज्ञान नव्हतें ठाऊकें । कथा कवतिकें करविली ॥
व्यथा जे जे होती ते ते सर्व गेली । प्रचित घडली माझी मज ॥
मग म्यां सोडिली लौकिकाची लाज । इतरांसी काज काय माझें ॥
ब्राह्मण म्हणती यास काय झालें । कांहीं संचरलें महद्भूत ॥
बापापाशीं द्वेषें सांगती गाऱ्हाणें । तूमच्या पुत्रानें बूडविलें ॥
लाज येते आम्हां वैदिक आमचा । पुत्र हा तुमचा म्हणोनियां ॥
नाचतो बाजारीं यासी शिक्षा करा । येऊं नका घरा देऊं तुम्ही ॥
भलत्यासी हा हो करितो नमन । देतो आलिंगन लघू वर्णा ॥
ऐसें आइकिलें ब्राह्मणाच्या मुखें । अत्यंत त्या दुःखें कष्टी जालों ॥
बोलती कष्टोनी क्रोधें तीर्थरूप । कैसा पापरूप पोटा आला ॥
यासी पढविलें सर्व शिकविलें । वृथा वायां गेलें काय करूं ॥
कष्टाचें सार्थक माझें जालें नाहीं । म्हणवूनी देहीं कष्टी जाले ॥
सांडी करूनियां वेगळें घातलें । अन्नवस्त्र दिल्हें थोडें बहू ॥
संतांसी करीती गाळीप्रदानातें । अर्भक आमुचें वेडें केलें ॥
वाळींत घालावें कोणी बोलियलें । मजपाशीं आलें कैसें आतां ॥
अवश्य म्हणोनी आशा(ज्ञा?) म्यां दीधली । उक्ति तों खुंटली ब्राह्मणांची॥
सांभाळाया आले हरिभक्त कोणी । देखिले दूरोनि दीनवाणें ॥
चिंता नको करूं आशीर्वाद देती । धनधान्य येती आपेंआप ॥
आशीर्वाद त्यांचा मानिला विश्वासें । जीव श्वासोच्छ्वासें दाटलासे ॥
ईश्वराची माया कोणाही कळेना । प्रेषिलें सदना पत्र पंतीं ॥
नारायणें दिल्हा चऱ्होली मोकासा । जालासे भर्वसा आहे देव ॥
इच्छा जाली चित्तीं निस्पृही असावें । स्थळ दिल्हें देवें तळ्यापाशीं ॥

काष्टें तोडावीं ना संकल्प म्यां केला । देवें सिद्धी नेला पण माझा ॥
विहीर खणावी ऐसी जाली वांच्छा । देवें तीही इच्छा पुरवीली ॥
पूजावीसी वाटे महाविष्णुमूर्ति । देवें अवचितीं तेही दिल्ही ॥
विस्तीर्ण असावें स्थळ कथेसाठीं । देवानें शेवटीं पूर्ण दिल्हें ॥
अग्निहोत्र घ्यावें स्मार्ताग्नीसहित । देवें तें साहित्य घडवीलें ॥
करावीसी वाटे स्वयें देवस्तुती । देवे दिल्ही स्फूर्ति कवित्वाची ॥
जो जो हेत माझ्या मनामध्यें येतो । तो तो पुरवितो स्वामी माझा ॥
कोठेंही अंतर पडों नेदी कांहीं । संसाराची नाहीं मज चिंता ॥
माझा अंगीकार पूर्ण देवें केला । अनुभव आला अंतरासी ॥
मागें पुढें देव मज संभाळितो । बाळातें पाळितो माय–बाप ॥
आतां वणवण करूं कशासाठीं । हृदयसंपुटीं आला देव ॥
माझा योगक्षेम चालवितो देव । त्यासी अहंभाव पूर्ण माझा ॥
त्याणें उणें कांहीं केलें नाहीं मज । इच्छिलें सहज पावतों मी ॥
स्नान संध्या माझी नित्य चालवितो । कथा करवितो अहोरात्रीं ॥
जाऊं नेदी कोठें आपुल्या वेगळें । न धरी निराळें बाळकासी ॥
संकटाचा कांहीं येवों नेदी वारा । वारितो पसारा स्वामी माझा ॥
होणारासारिखी करितो सूचना । सादवीतो दीना होई जागा ॥
किती उपकार आठवूं स्वामीचे । सर्व खेळ याचे अगणित ॥
अनंत ब्रह्मांडें व्यापूनि भरला । पुरोनी उरला निराळाची ॥
इच्छेविना काडी पानही न हाले । जग चाले बोले सत्ता त्याची ॥
हानी मृत्युलाभ उत्पति प्रळय । स्थिति समुदाय कर्ता तोची ॥
याचा पार वर्णी ऐसा आहे कोण । शेषाही संपूर्ण वर्णवेना ॥
वेद नेति नेति स्तवितां शिणले । तटस्थ राहिले अधोमुखें ॥
ब्रह्मादिक अंत पाहतां भागले । साधक शिणले ठायीं ठायीं ॥
तोचि कृपा करी जरी दीनावरी । भुक्ति मुक्ति चारी दासी होती ॥
वर्म आहे थोडें स्वामीचें आईका । भक्तिभावें एका वश्य होतो ॥
कलयुगामाजी वर्णाश्रमधर्म । करूनि सत्कर्म आचरावें ॥
ऐसें प्रेरूनियां कथा करवितो । नित्य चालवितो महाविष्णु ॥

पुढील प्रसंग जाणे नारायण । अवस्थेचा प्रश्न ऐसा आहे ॥
पृच्छेचें उत्तर वदवितो देव । बोले अनुभव कचेश्वर ॥

हे सगळे अभंग अतिशय प्रेमळ आणि फार गोड आहेत. 'पृच्छेचें उत्तर वदवितो देव' या वाक्यावरून, कोणाच्या तरी प्रश्नास उत्तर म्हणून कचेश्वरांनीं हें आत्मचरित्र सांगितलें असावें, हें उघड दिसतें. ह्या चरित्रांत कवीची ईश्वरनिष्ठा आणि साधुत्व यांचा ठसा अगदीं स्पष्ट उमटला आहे. 'तुकोबांनीं स्वप्नांत उपदेश दिल्यापासून आपणास कीर्तनाची स्फूर्ति झाली व त्यामुळें फार दिवसांची व्यथाही दूर झाली, असें कचेश्वर म्हणतात; ही व्यथा कोणती, हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. लौकिकाची लाज सोडून हीन वर्णाच्या लोकांशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागल्याबद्दल तत्कालीन भटाभिक्षुकांनीं व प्रत्यक्ष कवीच्या बापानें त्याचा जो छळ केला, तो आमच्या जुन्या साधु-संतांच्या चरित्रांत अगदीं सर्वसाधारण असल्यामुळें, त्याबद्दल कोणास आश्चर्य वाटण्याचें करण नाहीं; पण ह्या छळास भिऊन आमचे संत आ ल्या अंगीकृत कार्यापासून परावृत्त झाले नाहींत, हें मात्र खरोखर मोठें आश्चर्य होय सदर चरित्राचे पहिले ५७ अभंग उपलब्ध नाहींत, ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. थोरले शाहूमहाराज, बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, चिमाजी अप्पा, नानासाहेब, सदाशिवराव भाऊ, रावरंभा निंबाळकर, फत्तेसिंग भोसले, फत्तेसिंगाची स्त्री अहल्याबाई भोसले, कान्होजी आंग्रे, तुकोजी होळकर, दुसरे बाजीराव, माधवराव, नारायणराव व सवाईमाधवराव पेशवे इत्यादि स्त्री–पुरुषांची कचेश्वरांवर व त्यांचे पुत्रपौत्रांवर भक्ति असे, असें राजवाडे यांनीं लिहिलें आहे' कचेश्वरांस तुकारामबुवांनीं स्वप्नांत दृष्टांत दिला व पुढें महिपतींसही स्वप्नांत दृष्टांत देऊन, तुकारामांनीं त्यांजकडून संतचरित्रें वदविलीं,

ह्या गोष्टींचें रहस्य काय आहे, ह्याचा खुलासा करणें माझ्या सामर्थ्या-बांहेरची गोष्ट आहे. असो.

कचेश्वरांचें देहावसान कृष्णातीरीं उंब्रज येथें शके १६५३ फाल्गुन शुद्ध द्वितीया, या दिवशीं झालें. त्यांचे गुरुभक्त शिष्य रामचंद्र खटाटोपे यांनीं त्यांच्या देहाचें दहनादि सार्थक कृष्णावेणी-संगमीं माहुली येथें केलें व तेथेंच आपल्या अंगणांत कचेश्वरांच्या अस्थी पुरून, त्यांजवर समाधि बांधिली. ह्या समाधीचा एक मजला जमिनींत असून, त्यांत कचेश्वरांच्या पादुका आहेत. ह्या ठिकाणीं कचेश्वरांचे अतीत येथील वंशज प्रतिवर्षी येऊन, फाल्गुन शुद्ध द्वितीयेस त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव करितात; इतर वंशज आप-आपल्या गांवींच हा उत्सव साजरा करतात.

पुणें जिल्ह्यांत खेड व चांडोली या गांवीं कचेश्वरांनीं श्रीपांडुरं-गाच्या मूर्ति स्थापन केल्या आहेत. कचेश्वरांची बरीच कविता त्यांचे वंशज व शिष्यसंप्रदायी लोक यांच्या संग्रहीं आहे; त्यांपैकीं सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष हीं त्यांचीं दोन काव्यें मात्र काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत. याशिवाय, काव्यसंग्रहांत विठ्ठल कविकृत कवितासंग्रह या मथळ्याखालीं एक श्लोकबद्ध द्रौपदीवस्त्रहरण प्रसिद्ध झालें आहे, तेंही कचेश्वरांचेंच असावें असें वाटतें. शेवटचे कांहीं श्लोक कमी असल्यामुळें त्यांत कचेश्वरांच्या नांवाचा उल्लेख नाहीं; पण त्या काव्याची एकंदर रचना कचेश्वरी थाटाची दिसते. सुदामचरित्राचे १०३, गजेंद्रमोक्षाचे ९९ व द्रौपदीवस्त्रहरणाचे २३१ श्लोक आहेत. कचेश्वरांचीं पदें वगैरे इतर कविता अद्याप अप्रकाशित आहे. कचेश्वरांची एकंदर कविता मध्यम प्रतीची आहे; तींत यमक-चमत्कार नाहींत, अलंकार नाहींत किंवा फारसें भाषासौंदर्यही नाहीं. तथापि त्या कवितेंत प्रसाद आहे व भक्ति रस विशेष आहे. कचेश्वर हे वामन-मोरोपंतांसारखे भाषापंडित नव्हते, ते

एक प्रेमळ हरिभक्त होते व याच दृष्टीनें त्यांच्या कवितेचें अवलोकन केलें पाहिजे. त्यांच्या काव्यांची भाषा साधी, प्रेमळ व रसवती आहे; त्यांनीं वृत्तेंही निरनिराळीं उपयोजिलीं आहेत, तथापि क्वचित् स्थलीं वृत्तसुखार्थ शब्दांची ओढाताण झालेली दृष्टीस पडते. सुदामचरित्र व गजेंद्रमोक्ष हे दोन्ही विषय करुणरसप्रधान असून यांपैकीं पहिल्या विषयावर आजपर्यंत निरनिराळ्या दहा बारा कवींनीं कविता केली आहे, पण कचेश्वरांच्या सुदामचरित्रांतल्या इतका करुणरस दुसऱ्या कोणत्याही कवीस साधला नाहीं. पुढील उतारे पहा:—

सुदाम्याचें दारिद्र्य:—

श्लोक.

सुदामा दरिद्रें बहू पीडिलासे। कुटुंबी गृहामाजि तो बैसलासे ॥
गृहाची रिती वर्णितां वर्णवेना। कुठें ऊपमा द्यावया पूरवेना ॥ ५ ॥
गृहा पांच वांसे, अरो एक आडें। असावीं तिथें कासयाचीं कवाडें ? ॥
शिरीं उष्ण पाऊस वारा भरारा। तिळातुल्यही नाहि तेथें निवारा ॥ ६ ॥
अशाही गृहामाजि त्या अन्न नाहीं। मुलें माणसें पीडिलीं फार देहीं ॥
समस्तां मिळोनी असे एक वस्त्र। कदाही नसे स्वप्निं त्या पाकपात्र ॥ ७ ॥

सुदामा व त्याची पत्नी यांचा संवाद:—

श्लोक.

तदां बोलली पत्नि सूदामजीला। 'नका हो स्मरूं सांगतें कृष्णजीला ॥
तुम्हाला नसे नाम तें धारजीणें। किती सीकवूं, नायका, कोण जीणें !'॥ ९ ॥
स्त्रियेसी म्हणे 'कृष्णजी मित्र माझा। बरा जाण गे। पांग फेडील तूझा ॥
गुरुदक्षिणे पुत्र दीला जयानें। बळें मारिले कंस चाणूर ज्यानें ॥ १० ॥
प्रतापी पहा कृष्ण माझा कसाहे। अहंकार त्या पापबुद्धी न साहे ॥
असे लक्ष्मीसारिखी ज्याचि रामा। उणें काय आतां ? प्रिये ! सांग आम्हां'॥
'बोलतां असें नित्य मंदिरीं। वाटतें मला व्यर्थ अंतरीं ॥
कासया मला नित्य सांगतां। मित्रथोरवी व्यर्थ वानितां ॥ १२ ॥

करितों उपवास मला घरिं हो! । कथितों बहिवार कसा तुम्हि हो ! ॥
मज वस्त्र नसे, अशि हे अपदा । किति सांगतसां हरिची संपदा ॥ १३ ॥
जरि मित्र असे हरि हो तुमचा । तरि भोग कसा न सरे अमुचा ? ॥
दिसती अगदीं बहु दीन मुलें । हरिभेटिस जा, मज हें सुचलें ॥ १४ ॥

'रिक्तपाणि काय जाऊं, सांग सांग सुंदरी ।
कृष्णजीस काय नेऊं, बोल शीघ्र लौकरी ॥
मीळते जरी पृथू हरीस शुद्ध न्यावया ।
वाटतें तरी मनांत साध्य तेथ जावया ॥ १५ ॥
लागला बहूत हेत जावयास अंतरीं ।
*कंद मूळ पत्र पुष्प कांहिं पाहिं मंदिरीं' ॥
म्हणे 'घरांत अस्ति नास्ति सर्व ठाउकें असे ।
कसें हळूच पूसतां ? प्रपंच यांत हा दिसे ॥ १६ ॥
कृष्णजीस न्यावया असून काय ठेवितें ? ।
मी तुम्हास कासयास भेदरीति दावितें ॥
मला तुम्हापरीस फार ध्यास लागला असे ।
परंतु काय मी करूं ? घरांत अर्थ ना दिसे" ॥ १७ ॥

सुदामा द्वारकेस जाऊन पोंचल्यावर त्याच्या मनांत काय विचार उत्पन्न झाले व नागरिकांनीं त्याच्याशीं कशी वर्तणूक केली, त्याचें वर्णन:—

जशी द्वारका देखिली कांचनाची । तशी फीरली वृत्ति भावें मनाची ॥
म्हणे 'येवढें भाग्य, हा कृष्णराजा । तिथें रंक मी कायसा पाड माझा ॥ २४ ॥
वोळखी जरी ना धरी हरी । बूडिजे तरी शोकसागरीं' ॥
एक पाय तो टाकितां पुढें । पाउलापदीं वृत्ति नातुडे ॥ २५ ॥
श्रमें पावला द्वारकाद्वारदेशीं । पुसों लागले ग्रामिंचे ग्रामवासी ॥
'अहो ! कोण कोठून आलेत तुम्ही?' म्हणे 'कृष्णजीचे सखे बंधु आम्ही' २६
म्हणे आयका 'नाम माझें सुदामा । बरा जाणतो कृष्णजी पूर्ण आम्हां ॥
त्वरें जाणवा राउळीं मात माझी । नका रे करूं हेळणा बुद्धि दूजी' ॥ २७ ॥

* 'पत्रं पुष्पं फलं तोयं' इत्यादि गीतावचनावर येथें कटाक्ष आहे.

असें ऐकतां हांसले द्वारपाळ । वदों लागले ' कृष्णजीचें कपाळ ॥
विनोदार्थ सांगूं चला राउळासी ' । त्वरें जाउनी बोलती माधवासी ॥२८॥

पण त्या द्वारपालांची ही विनोदवृत्ति लवकरच मावळली, कारण—

' दरिद्री असे विप्र नामें सुदामा । उभा राहिला द्वारिच्या द्वारधामा' ॥
असें ऐकतां धांवला दीनबंधु । त्वरें शीघ्र आलिंगिला विप्रबंधु ॥ २९ ॥

सुदाम्याचा भोजनाचा थाट:—

वाजती बहू ढोल दुंदुभी । भेरिया तुरें गर्जती नभीं ॥
हर्ष वाटला कृष्णअंतरीं । पांक्ति मांडिल्या रत्नमंदिरीं ॥ ३६ ॥
पक्वान्नें बहु वाढिलीं षडरसें, शाका बहूतांपरी ।
नाना पापड सांडगे लघुवडे मांडे पुऱ्या भीतरीं ॥
सांबारीं क्वथिका बहू ठिकरिच्या मेथ्याकुटें लोणचीं ।
बेलें कोमल आम्ल तीक्ष्ण मिरें नाहीं कदा वाणिचीं ॥ ३७ ॥
साळी शुभ्र सुवास ओदन बरें पीतें वरान्नें वरी ।
क्षीरि मालति बोटवेच गहुंले क्षिप्रा अनेका परी ॥
चीनी साखर पांढरी मगदुमी तैशीच नाबादही ।
अंब्याचे रस पींवळे शिखरिणी नाना मधूरें दहीं ॥ ३८ ॥

स्वयं विंझणे वारिती कृष्णनारी । करी प्रार्थना फार आंगें मुरारी ॥
असो, यापरी सारिलें भोजनातें । बसूं घातलें उत्तमा आसनातें ॥४०॥
विडे दीधले कर्पुरेला लवंगा । अनेकापरी चर्चिलें गंध अंगा ॥
सुवासीकही लाविलीं सर्व तेलें । करें आपुल्या मर्दिलीं चापियेलें ॥ ४१ ॥

पक्वान्नवर्णनाचे वरील श्लोक कोंकणांतल्या भोजन-समारंभांत वरचेवर ऐकूं येतात. यासंबंधानें काव्यसंग्रहकार म्हणतात:— ' हा कचेश्वराच्या वेळचा भोजनाचा थाट ! साखरभात, लाडू, जिलब्या, श्रीखंड इत्यादि पक्वान्नें रसास्वादनिविष्ट भट्टाचार्यांनीं पेशवाईंत, विशेषतः रावबाजींच्या अमदानींत सुरू केलीं असावीं. ' यावरून पेशवाईच्या पूर्वीं हीं पक्वान्नें, निदान महाराष्ट्रांत तरी अस्तित्वांत नव्हती, असें काव्यसंग्रहकारांचें मत दिसतें. पण वस्तुतः तसें

समजण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. कारण कचेश्वर हे पक्वान्न-भोजनपंडित रावबाजींच्या पूर्वी सुमारें १०० वर्षें होऊन गेले व दुसरें असें कीं, कचेश्वरांपूर्वी १०० वर्षें लिहिलेल्या मुक्तेश्वरी भारतांत यांतील बहुतेक पक्वान्नांचीं नांवें* आढळतात.

सुदामश्रीकृष्णसंवादः—

'वोहिनी सुखी ?' श्रीहरी पुसे । 'काय संतती संपती असे ?
योगक्षेम तो चालतो कसा ? । काय खातसा काय लेतसां ?' ॥ ४३ ॥
येरु बोलिला 'ऐक श्रीहरी । काळ तीनही नांदती घरीं ॥
संतती बहू फारशी असे । संपती कदां स्वप्निंही नसे ॥ ४४ ॥
सर्वही सुखी बाळकें मुलें । स्नेह हा तुझा याचियामुळें ॥
काळ कर्मिती तूज चिंतिती । तूजवेगळें आन नेणती' ॥ ४५ ॥
कृष्ण बोलिला 'आठवे मला । उज्जनीमधे खेळ मांडिला ॥
गुरुपत्निनें धाडिलें वना । आठवे बहू माझिया मना ॥ ४७ ॥
पावसांत रे ! फार भीजलों । वायुसंकटीं थोर कष्टलों ॥
धोत्र तूं तधीं आपुल्या करीं । घातलें असे माझिया शिरीं ॥ ४८ ॥
काष्ठाच्या लघु कावडी धरुनियां होतों वटाखालते ।
वारा पाउस घेतला वटतळीं, मोठी अवस्थाचि ते ॥
तेव्हां त्वां लघु धोत्र रे ! मजवरी घालोनियां राखिलें ।
कांसे लावुनि कावडी मज तुवां क्षिप्रेमधें तारिलें ॥ ४९ ॥
लागली मला भूक रे जशी । कावडी तुवां घेतली तशी ॥
आठवूं किती काय रे तुझें । नाहिं दाविलें त्वां कधीं दुजें' ॥ ५० ॥
सुदामा म्हणे 'तूं भलें आठवीशी । बहुतांपरी तूं मला गौरवीशी ॥
तरी रे तुला राज्य कां प्राप्त झालें । मला रे कसें दैन्य धावूनि आलें' ? ५१
'विचारीं मनीं' श्रीहरी गुह्य ऐसें । दिल्यावांचुनी पाविजे सांग कैसें ? ॥
परी पूर्वपुण्यें मला भेटलासी । श्रुतीच्यानि योगें मला पावलासी ॥ ५२ ॥

---

* मुक्तेश्वरी महाभारत, वनपर्व, अध्याय १२ (दुर्वासभोजन); विराटपर्व, अ० ८ (अभिमन्युविवाह) व सभापर्व, अ० ९ (राजसूययज्ञसमारंभ) पहा.

कदा ब्राह्मणालागिं कांहीं न दीलें । कदा स्वप्निंही पुण्य कांहीं न केलें ॥
कदा तीर्थयात्रा तुवां नाहिं केली । कदा सत्कथा स्वप्निंही नायकीली ॥५३॥
नसे देह हा लाविला ऊपकारा । नसे भक्तिचा लागला लेश वारा ॥
नसे आदरें साधुसन्मान केला । नसे वस्तिला ब्राह्मणा ठाव दीला' ॥ ५४ ॥

द्वारकेंत श्रीकृष्णमंदिरीं सुखानें कालक्रमणा करणाऱ्या सुदामदेवास जेव्हां आपल्या स्त्री–पुत्रांची आठवण झाली, तेव्हां त्यानें आपल्या गांवीं जाण्यास श्रीकृष्णाचा निरोप मागितला. सुदामाच्या भक्तीनें संतुष्ट होऊन, विश्वकर्म्याकडून भगवंतांनीं आपल्या द्वारकेसारखीच सुदामनगरी तयार करवून, तेथें सुदाम्याची स्थापना करण्याचा विचार केला होता. परंतु, सुदाम्याच्या मनाची परीक्षा करण्यासाठीं, तो जेव्हां आपल्या गांवीं जाण्यास निघाला, तेव्हां भगवान् त्यास म्हणतात:—

' परी ऐक रे ! एक ती मात माझी । नको आणुं तूं मानसीं बुद्धि दूजी ॥
बहु फीरती चोरटे भिल्ल मार्गीं । [1]असा देखतां खंडिती शस्त्रखड्गीं ॥ ६५ ॥
वस्त्रभूषणें सर्व ठेवुनी । जाइजे घरा शुद्ध होउनी ॥
मार्गिं रे बहू चोर फिरती । अर्थ देखिल्या जीव मागती ' ॥ ६६ ॥

या भाषणाचा भावार्थ असा आहे:–भगवान् म्हणतात, सुदाम्या! तूं आपल्या गांवीं खुशाल जा; पण मी एक महत्त्वाची गोष्ट तुला सांगतों ती लक्ष्यांत घे; तींत कांहीं कपट आहे असें समजूं नको. तूं आतां ज्या वाटेनें जाणार आहेस, त्या वाटेंत चोरटे फार आहेत, ते तुला असा वस्त्राभरणमंडित पाहून तुला ठार करावयाला चुकणार नाहींत; म्हणून हीं सगळीं वस्त्रेंभूषणें येथेंच ठेवून, तूं शुद्ध होऊन जा.' वरील श्लोकांचा सकृद्दर्शनीं असा अर्थ दिसतो खरा, पण त्यांत दुसरा कांहीं गूढार्थही आहे. भगवान् म्हणतात–ह्या ज्या दृश्य ( नश्वर ) वस्तु आहेत, त्या सर्व टाकून देऊन शुद्ध म्हणजे निष्काम

---

१ वस्त्रभूषणयुक्त.

हो. म्हणजे षड्रिपूंच्या त्रासांतून तूं सहज मुक्त होशील.' पण संसारांत निमग्न झालेल्या सुदामदेवास हा उपदेश कसचा रुचतो ? कचेश्वर म्हणतात:—

ऐकतां असें वस्त्रभूषणें । ठेवुनी पुढें, शब्ददूषणें ॥
कष्टला, बहू शोक वाटला । 'चोरटा' म्हणे हाचि भेटला ॥६७॥
जाउं मी कसा रिक्त त्या घरा । काय दाखवूं पत्निकूमरां ॥
चोरटा ठकू ठाउका हरी । गोरसा मिसें गौळियां घरीं ॥ ६८ ॥
घरद्वारि हा गोरखा गौळियांचा । कसा मांड हा मांडिला आजि याचा ॥
घरीं घातल्या गौळणी जार नारी । मला ठाउका पूर्ण होता मुरारी ॥६९॥
रडायास मी कासया व्यर्थ आलों । अरे ईश्वरा ! फार मी कष्टि झालों ।
रिन्या हस्तकें काय म्यां व्यर्थ जावें । कसें पत्निला तोंड हें दाखवावें ॥७०॥
घरीं सांगतों थोरवी नित्य याची । न माये कुठें, लाज मोठी जनाची ॥
जरी वाटखर्चीस हा पीठ देता । तरी लौकिकी फारसें येश घेता ॥७१॥
बहू फार होती मला आस याची । निराशा परी थोर झाली मनाची ॥
पहा हो ! कसें सर्वही व्यर्थ झालें । मुलांमाणसांमाजि मूर्खत्व आलें ॥७२॥
स्त्रियेसी नसे वस्त्र नेसावयासी । करावें कसें काय आतां तियेसी ? ॥
जरी रुक्मिणी जीर्णसें वस्त्र देती । तरी अंतुरी फार संतुष्ट होती ॥७३॥

× × ×

मार्ग चालतां फार गहिंवरे । आपुल्या मनीं आठवी झुरे ॥
' धांवती मुलें देखतां मला । काय मी करें देउं त्यांजला ॥ ७६ ॥
ब्राह्मणीस मी काय रे कथूं ? । कोणती कशी गोष्ट मी जथूं ' ॥
हेंचि भावितां पंथ चालिला । पाहतां पुढें ग्राम देखिला '॥ ७७ ॥

वरील श्लोकांत सुदामदेवाच्या अज्ञान्यजन्य निराशेचें व निराशाजन्य करुणास्पद स्थितीचें किती समर्पक वर्णन केलें आहे ! भगवंतानें आपल्यासाठीं सुदामपुरी निर्माण केली असून, ती आपणास लवकरच प्राप्त होणार आहे, हें ठाऊक नसल्यामुळें व श्रीकृष्णाच्या कपटचरित्राशीं पूर्वपरिचय असल्यामुळें, अशा निराशेच्या

वेळीं, श्रीकृष्णासंबंधानें सुदामाच्या तोंडांतून जे उद्गार बाहेर पडले आहेत ते क्षम्य होत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुदामाचे हे उद्गार वाचून हसूं येतें व त्या वेळच्या त्याच्या मनःस्थितीबद्दल अनुकंपा उत्पन्न होते. एखादा अत्यंत दरिद्री मनुष्य, आपल्या श्रीमान् मित्राकडून आपणास खचित साह्य होईल अशा भावनेनें त्याजकडे गेला असतां, त्याची जर सर्वस्वी निराशा झाली, तर त्या वेळीं त्याच्या मुखांतून वरच्यासारखे उद्गार निघावे, हें अगदीं साहजिक होय व हा मनुष्यस्वभाव लक्ष्यांत घेऊन, त्याचें यथार्थ चित्र रेखाटण्यांत कचेश्वरांनीं मोठें कौशल्य दाखविलें आहे यांत शंका नाहीं. असो.

वर लिहिल्याप्रमाणें, बिचारा सुदामा विचारमग्न होऊन मार्ग क्रमीत असतां, भगवदाज्ञेवरून विश्वकर्म्यानें नुकतीच वसविलेली सुदामपुरी त्याच्या दृष्टीस पडली. द्वारकेसारखीच तिची एकंदर रचना पाहून, आपण वाट चुकून पुनः द्वारकेंतच आलों कीं काय असा संशय त्यास उत्पन्न झाला. कचेश्वर म्हणतातः––

कळस देखिले कांचनाकृती । 'चूकलों' म्हणे 'मार्ग मागुतीं ॥
भ्रांत जाहलो काय अंतरीं ?।' लागला पुसों 'कोण हे पुरी ? ॥७८॥
अहो पांथि हो ! चूकलों मार्ग मी रे !। पुढें ग्राम हा कोण सांगा मला रे ! ॥
नसे ठाउका आपुला कीं दुजा रे ! । बरा सोनियाचा दिसे चांगला रे !' ॥७९॥
पुसों लागले 'नाम रे काय तूझें' ?। 'सुदामा असें बोलती नाम माझें' ॥
'पुरीचें तुझें नाम रे एक जालें !'। म्हणे 'लोकही बोलती दैन्य बोलें'॥८०॥

पण पुढें लवकरच नागरिकांनीं सुदामदेवास ओळखून त्यास पालखींत बसविलें व मोठ्या थाटानें त्याची मिरवणूक काढिली. हा अकल्पित प्रकार पाहून सुदामदेवास तर वेड लागण्याचा प्रसंग आलाः—

मात फांकली राजमंदिरीं । मंत्रि धांवले मुख्य आदरीं ॥
पालखीमधें घालिती बळें । कंप सूटला ब्राह्मणा चळें ॥ ८३ ॥

भेरी दुंदुभि वाजती चवघडे धो धो धमामे किती ।
यंत्रांचे भडिमार थोर सुटती नादें कडे फूटती ॥
आवाजें नभ कोंदलें उडुगणें धाकें पडों पाहती ।
*विप्राचे मनिं भीति फारचि दिसे, गात्रें बहू कांपती ॥ ८६ ॥
करीं आरत्या सुंदरी नागरीका । बहू पातल्या दामिनी कामिनीका ॥
अनंतापरी हेमपुष्पें वहाती । करीं अक्षवाणें द्विजाते पहाती ॥ ८७ ॥
पुढें पालखी मंदिरामाजि गेली । प्रिया आरती शीघ्र घेऊनि आली ॥
झणत्कारले हो ! अलंकार तीचे । तसे झांकले नेत्र सूदामजीचे ॥८८॥
$ बहू विप्र व्याकूळ पाहूनि तीला । मनीं घाबरोनीं निचेष्टीत झाला ॥
प्रिया हालवी डोलवी दिव्य हस्तें । म्हणे 'ओळखाना कसें स्वामि मातें ?
कांता मी तुमची सुशीळ गृहिणी कां ओळखाना पती ? ।
झाली ज्या परिसासि भेट तुमची, तो ओळला श्रीपती ॥
प्रीतीनें पृथु भक्षिले मटमटां तो तूमचा हो सखा ।
तेणें हेमपुरी तुम्हांसि दिधली जैशी दुजी द्वारका ' ॥ ९० ॥

कांतेच्या तोंडून हा सगळा खरा प्रकार ऐकेपर्यंत, बिचाऱ्या सुदामदेवाची स्थिति, आरबी भाषेतील सुरस गोष्टींतल्या अबु हुसेनासारखी झाली होती. बगदादच्या कालिफानें अकस्मात् राज्यपद दिल्यामुळें अबुहूसेनाची काय विलक्षण स्थिति झाली; त्यानें डोळे कसे मिटले; सभोंवतालच्या दासींस, आपण कोण आहों, म्हणून किती प्रश्न केले; आपण जागृत आहों कीं झोंपेंत आहों हें समजून घेण्यासाठीं एका दासीकडून आपला हात कसा चालविला व शेवटीं आपण खरोखरच बादशहा झालों आहों अशी खात्री झाल्यावर, लगेच आपला बादशाही अंमल गाजविण्यास त्यानें कसा प्रारंभ

---

* हा चरण काव्यसंग्रहांत असा दिला आहे:—' तेव्हां देव समस्त संस्तविति त्या पुष्पें द्विजा ओपिती. ' $ ह्या श्लोकाचे पहिले दोन चरण काव्यसंग्रहांत असे आहेतः—' कदा ओळखेना घरामाजि दारा । बहु देखिला संपतीचा पसारा ' ॥

केला, हें वाचकांस माहीत आहेच; व हाच प्रकार सुदामदेवाच्या बाबतींतही झाला असला पाहिजे हें उघडच आहे. मात्र येथें ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे कीं, सुदामदेव हा अबूहुसेनासारखा निव्वळ प्राकृत मनुष्य नव्हता; तो मोठा सात्विक व प्रेमळ हरिभक्त होता व याच प्रकृतिभेदामुळें त्या दोघांच्या चरित्रांत पुढें जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहे. असो.

ज्या श्रीकृष्णाची आपण इतका वेळ निंदा केली, त्यानेंच हें सगळें वैभव आपणास दिलें आहे, ही गोष्ट लक्ष्यांत येतांच सुदामदेवास अतिशय पश्चात्ताप झाला. कचेश्वर म्हणतात:—

ऐकतां असें खोंचला मनीं । नीर सूटलें फार लोचनीं ।
कृष्णदेव म्यां व्यर्थ द्रोहिला । निंदिला बहू अंत पाहिला ॥ ९१ ॥
सिंधु जो उडे त्यासि पोहणें । कायसें पृथू काय त्या उणें ? ।
भक्तिचा बहू आळका हरी । देत संपदा आपदा हरी ॥ ९२ ॥
अरे कृष्णजी काय कौशल्य केलें ! । तुझ्या दर्शना चित्त माझें भुकेलें ॥
तयालागिं तूं ग्रास दे दिव्य हस्तें । करीं रे क्षमा तारिं तूं शीघ्र मातें ९३

अंतःकरणावर आलेलें तात्कालिक निराशापटल दूर होतांच सुदामाचा मूळचा उदात्त स्वभाव लागलाच प्रगट झाला. तो आपल्या स्त्रीस म्हणतो:—

'हरीचा नमस्कार हा तूजला ग । निरोपामध्यें कोणि ठेवूं नये गे ॥
म्हणोनी तुला सांगतों आदरेंशी । हरीतें स्मरीं अंतरीं निश्चयेंशी' ॥९४॥

मग सुदामदेवानें आपल्या प्रजाजनांस काय आज्ञा केली ?:—

समस्तांसि आज्ञा दिली राजयानें । अलंकार वस्त्रें दिलीं शोभमानें ॥
म्हणे '**प्रार्थना हेचि सर्वां जनांसी । करा कीर्तनें, रंजवा माधवासी**'

कवीनें येथें, सुदामदेवाच्या तोंडीं 'प्रार्थना' हा शब्द घातला आहे व त्यावरून, प्राप्तनवश्रीपुरुषाप्रमाणें सुदामदेव उन्मत्त न होतां, उलट तो विशेष विनयसंपन्न झाला, असें दाखविलें आहे. एकंदरींत

या लहानशा काव्यांत कवीनें आपलें काव्यरचनाचातुर्य बऱ्याच स्पष्टतेनें दाखविलें आहे, यांत संशय नाहीं. हें काव्य मला इतकें सरस वाटलें कीं, त्यांतले उतारे देतां देतांच हा लेख इतका लांबला. आतां कचेश्वरांच्या गजेंद्रमोक्षांतले कांहीं निवडक श्लोक येथें देऊन कचेश्वरांची तूर्त रजा घेऊं.

द्रवीड देशचा विष्णुभक्त राजा इंद्रद्युम्न हा पुष्कर सरोवराच्या कांठीं ध्यानस्थ होऊन बसला असतां, तिकडून अगस्तिऋषि आले. राजानें आपणांस उत्थापन दिलें नाहीं म्हणून अगस्ति ऋषींनीं त्यास 'मदोन्मत्त तूं हत्ति होशील रानीं ' असा शाप दिला. त्यावेळीं इंद्रद्युम्न त्यांस म्हणतो:—

'जरी तुम्हांसि देखिलें असेल आजि लोचनीं ।
तरी घडेल देहपात त्वरित याचि भुवनीं ॥
असें असोनि शापिले अनाथनाथ बंधुजी !
बरें तुम्हांसि मानलें अहा ! अनाथनाथ ! जी ! ॥ १० ॥

अन्यायाविण शापिलें मज तुम्हीं स्वामी अगस्ती मुनी ।
ध्यानीं मी निजमंदिरीं नदितिरीं ध्यानस्थ होतों मनीं ॥
कर्माची गति ना टळे विधि हरी लक्ष्मीपतीलागुनी ।
बोलों काय कुडे तुम्हां ऋषि मला उःशाप द्यावा झणीं ' ॥ ११ ॥

पुढें राजा इंद्रद्युम्न हत्ती होऊन, पुष्करसरोवरांतल्या नक्राच्या दाढेंत सांपडला असतां, त्याच्या पुत्रांनीं कशी वर्तणूक केली, हें कवि सांगतात:—

' काय पाहतां सोखळी करा । सोंड पुच्छ हो सर्वही धरा ॥
एक नेट घ्या सर्वही बळें ' । वोढिती बहू शक्तिच्या बळें ॥ ३५ ॥

ओढ मांडिली त्यासि दोंकडे । यातना बहू कुंजरा घडे ॥
स्थूळदेहि तो ओढिती किती । त्रास पावले आस टाकिती ॥ ३६ ॥

‘ मरावें कसें मेलिया पाठिसी हो ! ।
क्षुधा लागली फार आतां चला हो ॥
परी सर्वही एकची नेट घ्या हो ।
जळीं स्वामिसी लोटुनी शीघ्र द्या हो ॥ ३७ ॥

जीव जायसें सत्वरें करा । लोभ मोह त्यां नीकरा करा ॥
येश हें तुम्हां येइ हे घडी । स्वामि लोटुनी द्या चला तडी ॥ ३८ ॥

आपल्या संकटकाळीं, आपल्या पुत्र-पौत्रांची ही वर्तणूक पाहून व असले उद्गार ऐकून बिचाऱ्या गजेंद्रास काय वाटलें असेल ! एकंदरींत ‘ कठिण समय येतां कोण कामास येतो ? ’ या रघुनाथ-पंडितांच्या वचनाचा प्रत्यय प्रत्यहीं येतो; यांत संशय नाहीं. असो. कचेश्वर म्हणतातः—

सरोवरांत लोटिला गजेंद्र पुत्रपौत्रकीं ।
निघोन सर्व चालिले जळांत तोचि एक कीं ॥
पूर्वभक्ति धांवली मनांत हर्ष वाटला ।
सर्व दुःख वीसरोनि सद्गदीत दाटला ॥ ३९ ॥
स्मरोनि विष्णु अंतरांत धाय फार मोकली ।
म्हणे ‘ असा तसाचि धांव शक्ति फार वेंचली ॥
व्यर्थ फार पीडिलों जळांत नक्रसंगतीं ।
तयाकडून सोडवीं त्वरीत तूंचि श्रीपती ॥ ४० ॥

पीडिलों बहू पावगा हरी । पायिंची व्यथा शीघ्र तूं हरीं ॥
लागल्या कळा थोर या पदां । पीडिलें मला नक्रआपदीं ॥ ४१ ॥
नक्रगांठिसी अग्नि लागला । पाहतोस तूं काय ऊगला ? ॥
पाव गा हरी ! दासपालका ! मोकलूं नको विश्वव्यापका ॥ ४२ ॥

भक्तवत्सल दीनमोचन पाव सत्वर तूं हरी ।
थोर संकट विघ्न उद्भट पातलें मज केसरी ॥
नक्रगांठिसि सोडुनी पद मोकळें करिं यादवा ।
झोंबला करुं काय तस्कर नाकळे मज माधवा ॥ ४३ ॥

विधीकारणें मत्स्य झालासि वेगें । त्वरें दानवां मारिलें शीघ्र आंगें ॥
बळें आणिले वेद हीरोनि चारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ४५ ॥
महीमाजि मंदागिरी चालियेला । तई कूर्म होवोनियां स्थीर केला ॥
अशी कीर्ति केली महीमाजि भारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥४६॥
धरित्री बळें दानवीं चालवीली । वराहेरुपें स्वामि तूं थांबवीली ॥
हिराण्याक्ष मर्दोन भक्तास तारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ४७ ॥
तुवां नारसिंहें बहू खेळ केला । महाभक्त प्रल्हाद तो रक्षियेला ॥
अरी मर्दुनी फोडिला स्तंभ भारी । गजेंद्रास वेळेस आलास हारी ॥ ४८ ॥
क्षितीकारणें वामना धांवलासी । बळीदान घेऊनियां राहिलासी ।
तया कारणें तूं उभा नित्य द्वारीं । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ४९ ॥
अरे भार्गवा! थोर अद्भूत केलें । सहस्रार्जुनालागिं तूं मर्दियेलें ॥
जहालासि तूं ब्राह्मणां साहकारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ५० ॥
तुझी राघवा! वर्णु मी काय लीला । पदस्पर्शनीं तारिली शापलीला ॥
सुरां सोडुनी मर्दिला तो सुरारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ५१ ॥
अरे कृष्णजी कालिया नाथिला रे ! । रिकामा तिव्हां काय होतास तूं रे ? ॥
अरी मर्दुनी तारिल्या गोपनारी । गजेंद्रास वेळेस आलासि हारी ॥ ५२ ॥
पहा बौद्धरूपा कलंकी स्वरूपा । बहू वेंचला प्राण रे ! नामरूपा ॥
न देखों तुझी स्वामिजी वाट येतां । क्षणामाजि हा टाकीन आतां ॥ ५३ ॥
तुझें नाम घेतां हरे सर्व व्यथा । असें ऐकिलें संतमूखें अनंता ! ॥
तयालागिं त्वां लाविला वोल आतां' । असें ऐकतां धांवला जीवदाता ॥५४॥

गजेंद्राचा हा धांवा ऐकून भगवान् त्या ठिकाणीं प्राप्त झाले, व आपल्या चक्रानें नक्रमुख विदारून त्यांनीं गजेंद्रास मुक्त केलें. वैकुंठास जाण्याकरितां गजेंद्र विमानारूढ झालेला पाहतांच, नक्रानें काय केलें? कचेश्वर म्हणतातः—

असें देखुनी हांसला नक्र दृष्टीं । म्हणे 'वर्तलें थोर आश्चर्य सृष्टीं' ॥
पुसे श्रीहरी 'कां तुवां हास्य केलें?' । 'म्हणे म्यां तुला लोचनीं देखियेलें ॥
विमानीं गजा घालुनी चालवीसी । मला रे कसा हे वनीं मोकलीसी? ॥७२

पतितपावन नाम तुझें हरी । तरि कसा मज टाकिसि तूं दुरी ? ॥
नवल थोर मनीं मज वाटलें । त्रिदचि काय तुझें हरि सूटलें ? ॥ ७४ ॥
गजराज कसा वरि चालविला । हरि नक्र तुवां वनिं सांडियला ॥
जरि पातकि मीच खरा असतों । तरि हेच जळीं हरि रे नसतों ॥ ७५ ॥
कितिएक तुतें भजती पतितें । कितिएक तुतें जपती मुनि ते ॥
कितिएक गिरीवर ते असती । कितिएक उदास तुतें भजती ॥ ८० ॥
कितीएक ते पर्वतीं राहताती । कितीएक ते कर्वतीं देह देती ॥
कितीएक ते अग्निसंगा सहाती । तुझेवीण अन्या न जोडूं पहाती ॥ ८१ ॥
परी नातुडे स्वप्नि त्यां ध्यान तूझें । तयां आगळें श्रीहरी पुण्य माझें ॥
अकस्मात म्यां तूजला देखियेलें । मला टाकुनी इंद्रद्युम्नासि नेलें ॥ ८२ ॥
म्हणोनि मला हास्य आलें दयाळा । त्वरें उद्धरीं श्रीहरी हो कृपाळा ' ॥
असें बोलतां देव भक्ताभिमानी । म्हणे ' चालवा नक्र आधीं विमानीं ' ॥ ८३

अशी कथा सांगून, कथेश्वर सत्संगाचा महिमा वर्णन करितात —

सत्संग होता तरली दुरात्मे । सत्संगयोगे परब्रह्म आत्मे ॥
सत्संग होता बहु सौख्य आहे । सत्संग नक्रा फळलाचि पाहें ॥ ८७ ॥
संतसंग करितां हरि भेटला । संतसंग करिता शिण फीटला ॥
संतसंग करिता सुख आहे । संतसंग करिता तरलाहे ॥ ८८ ॥

असा हा थोर सत्संग आम्हांस प्राप्त होवो, अशी त्या भगवंताची प्रार्थना करून हा लेख येथे पूर्ण करितो.



# शिवदिन केसरी.

गावें नतपश्चातें जो दे निःसीम शिव दिनकरा या ।
पटु हित उपासकांचें, श्रीशिवदिन तेंवि शिवदिन कराया ॥ १ ॥

**सन्मणिमाला-मोरोपंत.**

हे प्रसिद्ध सत्पुरुष सुमारें १५० वर्षांपूर्वी श्रीक्षेत्र पैठण येथे होऊन गेले. **मोरोपंत, अमृतराय, मध्वमुनीश्वर, सोहिरोबा, महिपति** व **निरंजनमाधव** हे महाराष्ट्रकवि शिवदिनकेसरींचे समकालीन होत. शिवदिनांच्या मातुःश्रीचें नांव सरस्वती व तीर्थरूपांचें नांव कृष्ण यादव जोशी. यांचें जन्म शके १६२०, बहुधान्य नाम संवत्सरे वैशाख वद्य ७, भृगुवासर या दिवशीं सूर्योदयीं झालें. पंतांच्या शिरोभागीं दिलेल्या आर्येतील दिनकर शब्दाचा याच गोष्टीशीं संबंध असावा, असे वाटतें. शिवदिनस्वामींची गुरुपरंपरा* येणेंप्रमाणें:—

श्रीआदिनाथ
|
मत्स्येंद्रनाथ
|
गोरखनाथ
|
गैनीनाथ
|
निवृत्तिनाथ
|

* ही परंपरा केसरीनाथांचे एक शिष्य मालोनाथ यांनीं आपल्या संप्रदायावर १५ श्लोक लिहिले आहेत, त्यांवरून घेतली आहे.

ज्ञाननाथ (ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव)

|

सत्यामलनाथ

|

गैबीनाथ

|

गुप्तनाथ

|

उद्बोधनाथ

|

केसरीनाथ

|

शिवदिननाथ

शिवदिन केसरी या नांवांत शिवदिननाथ आणि त्यांचे गुरु केसरीनाथ या दोघांचाही समावेश झाला आहे, हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. केसरीनाथांचा जन्म शके १९८५ मार्गशीर्ष शुद्ध पंचमी या दिवशीं झाला व शके १६४६ मार्गशीर्ष शुद्ध २ या दिवशीं ते समाधिस्थ झाले. शिवदिननाथ हे यजुर्वेदी कौशिक गोत्री देशस्थ ब्राह्मण; ह्यांना जन्मापासून समाधि साधली होती, यावरून

'प्राप्य पुण्यकृतॉंल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभि जायते ॥
तत्र§ तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यततेच ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥'

§ 'तैसी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां । बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ तये सिद्धप्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे । मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥

**श्रीज्ञानेश्वरी, अध्याय ६ वा.**

या गीतावचनांत सांगितलेल्या योगभ्रष्टांच्या वर्गांतले ते होते, असें वाटतें. शिवदिननाथ पांच वर्षांचे होते, त्या वेळीं कांहीं मुलांनीं गोदेच्या वाळवंटावर त्यांस खेळावयास नेलें. खेळतां खेळतां, त्यांनीं शिवदिननाथांस मौजेनें वाळवंटांत पुरलें व वर माती टाकली. पुढें, खेळण्याच्या भरांत तें ठिकाण विसरल्यामुळें सगळीं मुलें मिळून आपापल्या घरीं निघून गेलीं. मुलगा वेळेवर घरीं आला नाहीं म्हणून शिवदिननाथांचे तीर्थरूप कृष्णाजीपंत यांनीं पुष्कळ शोध केला, परंतु मुलाचा पत्ता लागेना. पुढें गांवांतील मुलांनीं त्यास वाळवंटांत पुरल्याची हकीकत त्यांस समजल्यावरून, तिकडे जाऊन त्यांनीं पुष्कळ शोध केला, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं, पैठण येथें 'केसरीनाथ' नामक एक सिद्ध पुरुष होते, त्यांजकडे जाऊन, मुलाचा पत्ता लावण्याविषयीं कृष्णाजी-पंतांनीं त्यांस विनंति केली. केसरीनाथ कृष्णाजीपंतांस घेऊन वाळवंटावर गेले व शिवदिनाचें नांव घेऊन त्यांनीं मोठ्यानें हाक मारिली. त्या क्षणींच शिवदिनस्वामी वाळूंतून वर आले! आपल्या मुलास पाहून कृष्णाजीपंतांस अत्यानंद झाला. त्यांनीं त्यास केसरीनाथांच्या पायांवर घातलें. नाथांनीं त्यास आपल्याजवळ ठेवून घेतलें व पुढें शके १६२८ सालीं त्याचा व्रतबंध करून, त्याजवर आपल्या संप्रदायानुसार अनुग्रह केला. एके दिवशीं गोदातीरीं, शिवदिननाथ हे पार्थिवलिंगार्चन करीत असतां, त्यांच्यावरून नदीचें पाणी गेलें तरी त्यांनीं आपलें स्थान सोडिलें नाहीं अशी एक आख्यायिका आहे. शिवदिननाथ हे जन्मापासून अत्यंत सात्त्विक व प्रेमळ होते; पुढें केसरीनाथांपासून गुरूपदेश मिळाल्यावर तर ते अगदींच पूर्णत्वास पोंचले. प्रसिद्ध महाराष्ट्र कवि अमृतराय व शिवदिननाथ हे समकालीन असून, रायजींची नाथांचे ठायीं अत्यंत पूज्यबुद्धि असे. वेरूळ येथें शिवदिननाथांचीं कीर्तनें चालू

असतां, तेथें जर्जरीबक्ष नामक एक मुसलमान अवलिया होता, तो तीं कीर्तनें ऐकण्यास येत असे. शिवदिननाथांचें कवित्व, त्यांची निरूपणशैली व त्यांचा अधिकार पाहून, तो अवलिया फार खूप झाला व आपल्या डोक्यावरची टोपी शिवदिनांच्या मस्तकीं ठेवून, त्यानें त्यांस ' दीन ' ( धर्म ) अशी पदवी दिली. यापूर्वी लोक त्यांस ' शिवनाथ ' म्हणत असत; परंतु यापुढें ते त्यांस ' शिवदिननाथ ' या नांवानें संबोधूं लागले. त्यावेळी पैठण येथें शहादावल नामक एक अवलिया राहत असत, त्यांचा व शिवदिननाथांचा फार स्नेह असे. त्यांच्या एकांतांत नेहमीं बैठकी होत असत. शिवदिननाथांनी या अवलियावर ' वाहवा शहदावल शहदावल । पीर जागते आवल । ' असें एक पद केलें आहे.

शिवदिननाथांचा विवाह त्यांच्या बाराव्या वर्षी झाला. त्यांच्या पत्नीचें नांव उमाबाई. ही मोठी पतिव्रता होती. शिवदिननाथांच्या मृत्यूची खोटी बातमी एकदां पैठणभर प्रसिद्ध झाली असतां, या साध्वीनें क्षणैक ध्यानस्थ होऊन सांगितलें कीं, माझें मंगळसूत्र माझ्या गळ्यांत आहे, यावरून ते सुखरूप असले पाहिजेत. शिवदिनांस दोन पुत्र होते, त्यांनीं आपल्या तीर्थरूपांचाच उपदेश घेतला होता. त्यांचीं नांवें नरहरिनाथ व गदाधरनाथ. नरहरिनाथ व त्यांचे पुत्र लक्ष्मीनाथ हे मोठे अधिकारी पुरुष होते. लक्ष्मीनाथांची समाधि आळंदी येथें केसरीनाथांच्या समाधीजवळ आहे. शिवदिननाथ रूपानें फार सुंदर होते. त्यांचा शिष्यसमुदाय मोठा होता. त्यांपैकी उमाबाई, रमाबाई व मुकुंद यांनीं शिवदिननाथांस पाठविलेलीं पत्रें पैठण येथील मठांत अद्याप आहेत. रमाबाईनें आपलें पत्र ओवीवृत्तांत लिहिलें आहे. आमच्या जुन्या साधुसंतांशीं ज्या स्त्रियांचा शिष्यत्वसंबंध जडला, त्या बहुतेक स्त्रियांनीं कविता केली आहे; यावरून स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत

आमचे प्राचीन सत्पुरुष उदासीन नव्हते, हें स्पष्ट होत आहे. मुक्ताबाई, प्रेमाबाई, जनी, नामदेवाच्या घरच्या स्त्रिया, चोखामेळ्याची पत्नी, अक्का, वेणू व मिराबाई ह्या सगळ्या स्त्रिया उत्तम कवयित्री होत्या. हल्लीं स्त्रीशिक्षण वाढलें आहे म्हणतात, पण जनाबाईच्या अभंगांसारखे प्रासादिक अभंग रचणारी किंवा वेणूबाईच्या 'निवृत्तिराम' ग्रंथासारखा सरस ग्रंथ लिहिणारी एकही विदुषी हल्लींच्या शिक्षणानें अद्याप तयार केली नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असो.

शिवदिननाथ हे, आमच्या इतर साधुसंतांप्रमाणें, अगदीं निःस्पृह व वैराग्यसंपन्न होते; तथापि, त्यांनीं स्वतःच म्हटल्याप्रमाणें 'प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ जयानें केला। तो नर भला रे भला' या कोटींतले ते होते. प्रपंच व परमार्थ या दोन्ही विषयांकडे त्यांचें सारखेंच लक्ष्य होतें. बडोद्याचे दिवाण रावजी बापुजी यांस शिवदिननाथांनीं शके १६९१ या वर्षीं उपदेश केला. त्यांना देणग्या व उत्पन्नें बरींच मिळालीं होतीं; त्या सर्वांचें एक संस्थान करून, त्याचे द्वारें भजन-पूजनाची परंपरा चालू राहील, अशी व्यवस्था त्यांनीं करून ठेविली आहे. शके १६९६ माघ वद्य १० सोमवार रोजीं त्यांनीं संस्थानपत्र करून, ते आपल्या वडील मुलाच्या स्वाधीन केलें. हें पत्र बरेंच मोठें असल्यामुळें, त्याची नक्कल येथें दिली नाहीं. या संस्थानपत्रांत पुढील वाक्यें आहेतः—

"आमचे गुरु श्रीकेसरीनाथजी व आमचे गुरूंचे गुरु श्रीउद्बोधनाथजी या उभयतां नाथजींविषयीं तुम्हांस आज्ञा करितों कीं, आपण स्मरणपूर्वक मनन, पठण, निजध्यास हृदयांत धरून, श्रीउद्बोधनाथजी यांचा उत्सव, महोत्सव, कथा, कीर्तन, भजन-पूजन, चार दिवस आनंद करावा. दुसरे श्रीगुरु केसरीनाथस्वामी आमचे गुरु यांचा उत्सव, महोत्सव, कथा, कीर्तन भजन-पूजन, ध्यान, मनन,

चार दिवस श्रीक्षेत्र आळंदीस जाऊन समारंभ करावा. यांत अंतर पडूं नये हेंच माझें सांगणें आहे. आमचा उत्सव न झाल्यास आपण काळजी करूं नये, परंतु गुरु श्रीगुरुनाथजी यांचे उत्सव आपण संतोप आनंदमय करावे, यांत आम्हांस बहुत संतोष आहे. आपला संस्थानीं वांट्याचा सांप्रदाय नाहीं. असें माझें सांगणें आहे कीं, दोन होऊं नये. दोन झाल्यास त्याजला यश प्राप्त होणार नाहीं. वडिलांनीं पुढें होऊन कथाकीर्तन करावें. सर्व समान असून सर्वांनीं स्वामीचे सेवेंत वडिलांचे आज्ञेनें चालावें. अनुक्रम ऐसा चालवावा..... प्रपंचास दोन रुपये कमजास्त लागल्यास भिक्षा करावी अगर कर्जवाम सावकाराचें घ्यावें." या पत्राच्या खालीं 'हस्ताक्षर शिवदिन कृष्ण जोशी, संस्थान क्षेत्र प्रतिष्ठान' अशी सही आहे. हें पत्र करून दिल्यावर तीनच दिवसांनीं, म्हणजे शके १६९६ माघ वद्य १३ या दिवशीं स्वामी समाधिस्थ झाले. त्या वेळीं त्यांचें वय ७६ वर्षांचें होतें व अशा वयांत, मरणापूर्वीं तीन दिवस, इतकें व्यवस्थित संस्थानपत्र तयार करण्यास किती मनःस्वास्थ्याची आवश्यकता आहे, याचा विचार वाचकांनींच करावा. वरील उताऱ्यावरून, शिवदिननाथांची उत्कट गुरुभक्ति जशी स्पष्टपणें दिसून येत आहे, त्याचप्रमाणें त्यांचें व्यवहारज्ञानही उघड उघड दृश्यमान होत आहे. शिवदिननाथांची समाधि पैठण येथें गोदातीरीं आहे. याप्रमाणें या सत्पुरुषाचें हें संक्षिप्त चरित्र आहे.

शिवदिननाथांच्या गुरुपरंपरेंतील बहुतेक सत्पुरुषांनीं थोडीबहुत कविता केली आहे. निवृत्तिनाथ व ज्ञाननाथ ( ज्ञानदेव ) हे तर महाराष्ट्र कविमंडळांत प्रसिद्धच आहेत. गैबीनाथ व गुप्तनाथ यांचे कांहीं अभंग आढळतात. गुप्तनाथांच्या अभंगांची एक वही डॉ० विल्सन यांच्या संग्रहीं होती, ती हल्लीं मुंबई विश्वविद्यालयाच्या पुस्तकसंग्रहालयांत आहे. ह्या वहींतील एकदोन अभंगांच्या आधारें,

मुंबईतील सुबोधपत्रिका पत्राच्या ता० ७ जुलई १९०१ च्या अंकांत एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्याच अंकांत, पत्रिकाकारांनीं, '**गुप्त स्वामी कोण ?**' या मथळ्याखालीं एक लहानसा लेख लिहून, या कवीसंबंधाची माहिती भारद्वाज, भिंगारकर, अशांसारख्या कोणीं गृहस्थांनीं आपल्याकडे अवश्य पाठवावी, अशी विनंति केली होती, परंतु तिकडे कोणाचेंही लक्ष्य गेल्याचें दिसत नाहीं. असो; या गुप्तस्वामीचे एकदोन अभंग पुढें दिले आहेत:—

१

सर्व करी देवाधिदेव । त्यासी नेणती मानव ॥ १ ॥
वाहती देह अभिमान । देव सर्व कांहीं जाणें ॥ २ ॥
अहंपणें आतां । देव न दिसे सर्वथा ॥ ३ ॥
अहंकर्ता जो मी म्हणे । तेणें केली आपुली हानी ॥ ४ ॥
चाले देवासी भिऊन । गुप्त म्हणे तोचि धन्य ॥ ५ ॥

२

माता पिता त्राता अरि पुत्र भ्राता । गुरूवीण आतां नाहीं दुजा ॥ १ ॥
पशुपक्षी याती गुरुरूप भासती । ऐसी ज्याची स्थिति तोचि जाणें ॥ २ ॥
वृक्षवल्ली पाही अणुरेणु तेही । गुरूविण नाहीं रितें कोठें ॥ ३ ॥
ऐसा गुरुराज भज पूर्ण व्यापक । गुप्त बोले रंक राज सम ॥ ४ ॥

गुप्तनाथांचे शिष्य उद्बोधनाथ यांचीं कांहीं पदें व अभंग आढळतात; त्यांपैकीं तीन अभंग पुढें दिले आहेत:—

३

काय उतराई पाया । होऊं तुझ्या गुरुराया ॥ १ ॥
नित्य नूतन विठ्ठलवीर । केला डोळियां गोचर ॥ २ ॥
साध्य साधनें नातुडे । तया केलें मागें पुढें ॥ ३ ॥
चौस आठरा कानडें । तें त्वां दाविलें ऊघडें ॥ ४ ॥
म्हणे उद्बोध सर्वदा । नाहीं उत्तीर्णता कदा ॥ ५ ॥

४

स्वर्ग मृत्यु आला वाटे येतां जातां । परि नाहीं गुंता कांहीं येथें ॥ १ ॥
जेथें तूं असशी तेथें मी येईन । स्वरूप पाहिन याचि डोळां ॥ २ ॥
न करि ध्यान मी सिद्ध तूं असतां । न धरी सर्वथा दुरस्ता ते ॥ ३ ॥
दुरी मी न जाय तुज जाऊं नेदी । उद्बोध गोविंदीं लीन पायीं ॥ ४ ॥

५

दृष्टि पुंजाळली निजरूपीं बैसली । पाहतां पाहतां परतली ठायींच मुराली ॥ १ ॥
दृश्य लया गेले देखणें पारुषलें । दर्शन ठसावलें तन्मय झालें ॥ २ ॥
जालें म्हणतां नये आटली मनाची सोये । कोण कोणासि पाहे रे सहज आहे रे ॥ ३ ॥
उद्बोधनाथकृपें नसतें हें हारपे । दाविलें निजप्रतापें या केसरीसी ॥ ४ ॥

हा शेवटचा अभंग, उद्बोधनाथांचे शिष्य व शिवदिनस्वामींचे गुरु केसरीनाथ यांचा आहे. केसरीनाथांचीं कांहीं पदें व सिद्धांतसार या नांवाचा ग्रंथ इतकी कविता उपलब्ध आहे. शिवदिन स्वामींची बरीच कविता पैठण येथें त्यांच्या वंशजांच्या संग्रहीं आहे; त्यांत सुमारें ५०० पदें व शके १६९२ मध्यें लिहिलेला **ज्ञानप्रदीप** नामक २१ अध्यायांचा ओंवीबद्ध ग्रंथ, इतकी कविता अप्रकाशित आहे. एकंदरींत, शिवदिन केसरी व त्यांच्या गुरुशिष्यपरंपरेंतील इतर साधु यांची बहुतेक कविता अद्याप अप्रकाशित असून, ती प्रकाशांत आणण्याचें जर कोणी सज्जन मनावर घेईल, तर महाराष्ट्रावर त्याचे मोठे उपकार होतील. शिवदिनस्वामीचीं ‘ माझी देवपुजा, देवपुजा ’ ‘ सद्गुरुमार्तंडा, मार्तंडा ’ ‘ भाव धरा रे । आपुलासा देव करा रे ! ’ इत्यादि पदें ज्यांनीं ऐकलीं असतील त्यांस त्यांच्या कवितेच्या योग्यतेसंबंधानें विशेष कांहीं सांगितलें पाहिजे, असें नाहीं. रा० पांगारकर यांच्या भाषेंत बोलावयाचें म्हटल्यास ‘ मराठी भाषेंतला पदसंग्रह म्हणजे अनुभवी साधूंचे सहजोद्गार आहेत, त्यांची किंमत करतां येणार नाहीं; ’ व शिवदिननाथ यांची बहुतेक कविता याच मासल्याची

आहे. शके १६४४ पासून १६४८ पर्यंत शिवदिननाथांनीं तीर्थयात्रेसाठीं सगळ्या हिंदुस्थानभर प्रवास केला. त्यांनीं कित्येक पदें जगदंबा, गणपति, मारुती, खंडोबा, विठ्ठल, दत्त, भैरवनाथ इत्यादि देवांवर केलीं आहेत. शिवदिननाथांचीं पदें अत्यंत प्रासादिक, तेजस्वी आणि ठसकेदार अशीं आहेत. शिवदिननाथ हे पार्थिव-पूजा करणारे शिवभक्तपरंपरेचे होते. प्रसिद्ध कविवर्य अमृतराय यांच्या संगतीमुळें, शिवदिननाथांनीं कटावांच्या धर्तीवर कांहीं कावती केली आहे. पंढरीच्या विठ्ठलावरील त्यांचे अभंग फार साधे आणि गोड आहेत.

पैठण हें क्षेत्र आमच्या साधुसंतांची प्रसवभूमि होय. ज्ञानदेवांनीं रेड्याकडून वेद म्हणविले ते पैठण येथेंच; एकनाथस्वामींचें वास्तव्य-स्थान पैठणच होय; कृष्णदासमुद्गल हा कवि पैठण येथेंच होऊन गेला; रंगनाथ मोगरेकरांनीं याच ठिकाणीं वास्तव्य केलें; श्रीमत्-कृष्णदयार्णव, त्यांचे गुरु गोविंद व शिष्य उत्तमश्लोक हे सगळे पैठणचेच रहिवासी. शिवदिननाथ व त्यांच्या शिष्यपरंपरेंतील सत्पुरुष पैठण येथेंच वास करून समाधिस्थ झाले; मुक्तेश्वर आणि त्यांचे तीर्थरूप चिंतामणि ऊर्फ विश्वंभरस्वामी यांच्या आयुष्याचा बहुतेक भाग पैठणांतच गेला; शहादावल नामक मुसलमान सत्पुरुष पैठण येथेंच राहत असत; अमृतरायांनीं पैठण येथें बरेच दिवस वास्तव्य केलें होतें असें दिसतें व थोड्या वर्षांपूर्वीं समाधिस्थ झालेले अनंतनाथस्वामी यांनींही आपलें अवतारकार्य पैठणांतच केलें! याशिवाय, ह्या सगळ्या सत्पुरुषांच्या गुरुशिष्यपरंपरेंतील किती तरी सत्पुरुष पैठण येथेंच होऊन गेले आहेत, ही गोष्ट लक्ष्यांत घेतली म्हणजे सत्पुरुषनिर्माणाच्या बाबतींत पंढरपुराच्या खालोखाल पैठणासच महत्त्व द्यावें लागतें. अस्तु.

महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत हे पैठणास गेले होते, त्या वेळीं त्यांची व शिवदिननाथांची भेट झाली होती, असें प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दिलेल्या सन्मणिमालेंतील आर्येवरून दिसतें. त्या आर्येत, 'दिनकर' हें पद केवळ यमकपूर्तीसाठीं पंतांनीं घातलें असावें असें आरंभीं वाटतें, पण शिवदिननाथांचे पुत्र नरहरिनाथ यांनीं केलेल्या आरतींतला 'दिव्य मूर्ति अति सुंदर पाहतां थक्कित अमरादि' हा चरण पाहिला म्हणजे 'दिनकर' हें पद पंतांनीं शिवदिननाथांची तेजस्विता व्यक्त करण्यासाठीं मुद्दाम घातलें आहे, हें उघड होतें. शिवदिनकेसरीचें दर्शन घेणारा मनुष्य त्यांच्या ईश्वरनिष्ठाजन्य दिव्यकांतीनें थक्क होऊन जाई व हा स्वानुभव व्यक्त करण्यासाठींच पंतांनीं 'दिनकर' शब्दाची योजना करून शिवदिननाथ हे सूर्यासारखे तेजस्वी होते, असें ध्वनित केलें आहे. सदर आर्येच्या उत्तरार्धांत शिवदिन हे शिवभक्त असून, 'शिवदिनीं' (शिवरात्रीस) समाधिस्थ झाले म्हणून त्यांना शिवदिनाची उपमा पंतांनीं दिली आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या लक्ष्यांत आलेंच असेल. एकंदरींत या एका आर्येत, शिवदिननाथांचें संक्षिप्त चरित्रच पंतांनीं सांगितलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

शिवदिनकेसरींचीं कांहीं निवडक पदें येथें देऊन हें चरित्र पूर्ण करितों:—

पदें

१

**बाळ करी अन्याय। त्यासी माता मारी काय?।**
**तैसें माझें सर्व साहे। जाण सद्गुरूराया॥ १॥**
**राजपुत्र अन्यायी। त्याचा न्याय कोणे ठायीं?।**
**तैसा मी तुझे पायीं। जाण सद्गुरूराया॥ २॥**
**चंद्रीं कळंक नव्हाळी। तरी बैसे रुद्रभाळीं।**
**तैसें मजलागुनी पाळी। जाण सद्गुरुराया॥ ३॥**

दासी जाली रावराणी । फिरून वाहे काय पाणी ? ।
तैसा मीही तुझे ध्यानीं । जाण सद्गुरुराया ॥ ४ ॥

पद २. ( जगदंबेचे ).

व्यास वाणी गीर्वाणीं तुज वाणी । प्राकृत भाषा वर्णन वाणी ।
काय भवानी ॥ ध्रु० ॥
हे जगदंबे विश्वकदंबे । निरावलंबे । तूं शिवसांबे । मज अविलंबे ।
धाव पाव निर्वाणी ॥ १ ॥
कृपाकटाक्षे सर्वहि साक्षे । अलक्षपक्षे । प्रताप दक्षे । मज संरक्षे ।
पुण्यभाग्य परवाणी ॥ २ ॥
केसरिनाथे तुर्य समर्थे । तूं परमार्थे । शिवदिनार्थे । स्वहितसार्थे ।
जागृत कीं शर्वाणी ॥ ३ ॥

३

विठ्ठल गाइलाचि गाऊं । विठ्ठल पाहिलाचि पाहूं ॥ ध्रु० ॥
सत्रावी भिवरेच्या तीरीं पंढरपुरासि जाऊं ।
चंद्रभागे स्नान करूनी मुक्तिपताका लावूं ॥ १ ॥
मृदंग वीणा टाळघोळ संतसमागमीं वाहूं ।
प्रदक्षिणेसि नाचत कीर्तनीं नेमनिष्ठ राहूं ॥ २ ॥
जीवजंतु पंढरिचे वतनी विठ्ठलरूप भावूं ।
स्वहितशिक्षित वचनें त्याचीं अनाक्रोश साहूं ॥ ३ ॥
वेणूनादीं संतत काला केसरि गुरुचा खाऊं ।
शिवदिन गरुडपारीं प्रसाद हरिदासाचा लाहूं ॥ ४ ॥

४

भाव धरा रे । आपुलासा देव करा रे ॥ ध्रु० ॥
कोणी कांहिं म्हणो यासाठीं । बळकट प्रेम असावें गांठीं ।
निंदास्तुतिवर लावुनि काठी । मी तूं हरा रे ॥ आपुलासा० ॥ १ ॥
सकाम साधन सर्वहि साडा । निष्कामें मुळ भजनिं मांडा ।
नाना कुतर्के वृत्तिसि दवडा । आलि जरा रे ॥ आपुलासा० ॥ २ ॥
केसरिनाथ गुरूचे पायीं । सृष्टी आजि बुडालि पाहीं ।
शिवदिनिं निश्चय दुसरा नाहीं । भक्त खरा रे ॥ आपुलासा० ॥ ३ ॥

आता मी नाहीं । मी नाहीं । नरहरिवांचुनि कांहीं ॥ ध्रु० ॥
विकल्प अवघा सरला । दोहीं डोळां नरहरि भरला ॥ १ ॥
अनुभव पाउल वाटे । जिविंचें जीवन नरहरि भेटे ॥ २ ॥
सच्चिद्घनरुप सारा । नरहरिविरहित काय पसारा ॥ ३ ॥
विसरुनि साधन क्षुद्रा । त्यालों सबाह्य नरहरिमुद्रा ॥ ४ ॥
शिवदिन-जिवपण गेलें । केसरि गुरुनें नरहरि केलें ॥ ५ ॥

६

माझी देवपुजा देवपुजा । पाय तुझे गुरुराजा ॥ ध्रु० ॥
गुरुचरणाची माती । तेच माझी भागीरथी ॥ १ ॥
गुरुचरणाचा बिंदु । तोचि माझा क्षीरसिंधु ॥ २ ॥
गुरुचरणाचें ध्यान । तेंचि माझें संध्यास्नान ॥ ३ ॥
शिवदिन केसरिपायीं । सद्गुरुवांचुनि दैवत नाहीं ॥ ४ ॥

७

निष्ठाभावें व्यापक सकळांतर्यामीं ।
तरती पापी ज्याच्या पावन निजनामीं ।
आता चित्तीं चिंतन उन्मन सुखसिंधु ।
तो हा वंदा ज्ञानेश्वर गुरु दिनबंधु ॥ १ ॥
योगीयाचा मुकुटमणि जो अविनाशी ।
लक्षी लक्षातीतचि जडला नयनासी ।
कृपादृष्टी वारित जन्ममरणबंधु ।
तो हा वंदा ज्ञानेश्वर गुरु दिनबंधु ॥ २ ॥
सत्ता साक्षी लीला कौतुक करि नाना ।
सोज्वळ साधु विष्णु अवतारचि माना ।
वदला म्हैसा वेदऋचेचा उद्बोधु ।
तो हा वंदा० ॥ ३ ॥
जागृत केली प्राकृत गीता गुढ अर्थी ।
वाची नेमें तो न पडे विघ्न अनर्थी ।
बोली भींती चालवि जड देह समंधु ।
तो हा वंदा० ॥ ४ ॥

अर्ध मात्रा इंद्रायणि तट सुरगंगा ।
सिद्धांतांच्या सिद्धेश्वर शिवनिजलिंगा ।
अद्वैताचे अळंकार क्षेत्र निबंधु ॥
तो हा वंदा० ॥ ५ ॥

निवृत्तीच मुळें जो विश्वरूपि नटला ।
ज्याच्या बोधें नाना संशय भ्रम फिटला ।
डोळस डोळा सर्वहि जाला जिव अंधु ॥
तो हा वंदा० ॥ ६ ॥

अजान दंड फुटला ऊर्ध्व पक्षि वृक्ष ।
शांति सन्मुख बाह्यांतरिं दक्ष ।
दर्शन दृष्टि यात्रा प्रेमभरे धुंधु ।
तो हा वंदा० ॥ ७ ॥

ज्याचे द्वारीं सुंदर पिंपळ कनकाचा ।
निष्कामाचें अक्षयि फळ देत फुकाचा ।
निःशब्दार्थ वदला पदग्रंथप्रबंधु ।
तो हा वंदा० ॥ ८ ॥

वेदाक्षर हा मंत्र अनुष्टित निजभक्ति ।
ज्ञानियांच्या तो नर बसला निजपंक्ती ।
संचित क्रियमाणाचें खोडित प्रारब्धु ।
तो हा वंदा० ॥ ९ ॥

अर्थ स्वार्थ वदनीं दशक स्तोत्र पढा ।
यशप्रतापें उतम कीर्तीलागिं चढा ।
शिवदिनासि पूर्ण सदा केसरी लब्धु ।
तो हा वंदा० ॥ १० ॥

ह्या पदावरून, आळंदीचेच ज्ञानदेव ज्ञानेश्वरीचे कर्ते होत, या गोष्टीस आणखी एका सत्पुरुषाची साक्ष मिळून, कै. भिंगारकर-बुवांच्या लेखास बळकटी येत आहे.

## अभंग नरहरिनाथांचे

१

गुरुरायें बरवें केलें । माझें मीपण हरुनी नेलें ॥ १ ॥
काय सांगूं आतां बाई । सांगायाची सोय नाहीं ॥ २ ॥
ठेवितांचि माथां हात । षड्रिपूंचा झाला घात ॥ ३ ॥
दिठी मुरडोनी दावितां । जाली मनासि उन्मनता ॥ ४ ॥
सहन करितां अवलोकन । गेलें तुटोनी बंधन ॥ ५ ॥
शिवनाथें धरितां करीं । तेव्हां जाला नरहरी ॥ ६ ॥

२

जित असतां मारिलें । मेलियासी जित केलें ॥ १ ॥
मोठें कौतुक सद्गुरु आई । तुझें, वाचे बोलूं मि कायी ॥ २ ॥
रात्रीं सूर्याचा प्रकाश । दिवसा चंद्रतारा भास ॥ ३ ॥
आकाशाचें फोडुनि पोट । त्यांत दाविलें निघोट ॥ ४ ॥
मेघावांचुनि पाणी वर्षे । पीक अचाट नयनीं दिसे ॥ ५ ॥
शिवकेसरी न करी काय ? । नराचा हा हरि होय ॥ ६ ॥

नरहरिनाथ हे शिवदिनकेसरीचे पुत्र होत; त्यांची कविताहीं त्यांच्या परंपरेंतील इतर सत्पुरुषांच्या कवितेप्रमाणेंच प्रासादिक आणि स्वानुभवयुक्त अशी आहे. नरहरिनाथांनीं पुढील पदांत शिवदिननाथांचें वर्णन केलें आहे:--

‘ सीमा ज्याच्या स्वरूपाची हो न कळे कोणासी ।
शिणले चौ सा अठरा नेणों करितां स्तवनासी ।
सिद्धांचा कीं परमगुरू हा तारक अविनाशी ।
शिक्षा करुनी दुष्ट जगाला लावी भजनासी ॥ १ ॥
‘ शिवदिन शिवदिन ’ चतुराक्षरि मंत्र जपतां हा भावें ।
आसनमुद्रेवीण सहज तारिल स्वभावें ॥ ध्रु० ॥
वसला सर्वां ठायीं जो कीं आपण स्वयमेव ।
वणवण चुकवी चौऱ्यांशींची देउनि अनुभव ।

वत्सल पुरता भक्तजनांचा हा सद्गुरुराव ।
वदला नाना श्लोकादिक बहुत अपूर्व ॥ २ ॥
दिसतो प्रकट पाहतो कीं, पिंडींचा संधी ।
दिवा रात्री नाहिं जयाला नित्य नवा आदि ।
दिव्यमूर्ति अतिसुंदर पाहतां थकित अमरादि ।
दिठीस मुरडुनि लक्षुनी घे अरे तूं हृदयीं ॥ ३ ॥
नयनिं दाखवि...सध्यां अकळ कळा खूण ।
न दिसे कांहीं त्याविण मजला द्वैताचें भान ।
नग कनकाचे होती जैसे तैसें जग जाण ।
नरहरि अखंड निशिदिनिं ध्याई शिवदिन ॥ ४ ॥

शिवदिननाथ यांस मराठीप्रमाणेंच हिंदी भाषेचेंही चांगलें ज्ञान होतें. त्यांचें एक हिंदी पद पुढें दिलें आहेः—

तो मै गुरुका पूत कहाऊं । मान गुमान बहाऊं ॥ ध्रु० ॥
तोरुं बंद पाखंड करमके । विवेक मान चढाऊं ॥ १ ॥
कामक्रोधकूं ठारहि करके । भाव भगतिकुं बढाऊं ॥ २ ॥
दुःखाकर भवसागर... । जननमरणकुं भगाऊं ॥ ३ ॥
जग सब ब्रह्म यही परचितकी । सहज समाधि लगाऊं ॥ ४ ॥
गाऊं नाम रिझाऊं दिलकूं ।...की बात छिपाऊं ॥ ५ ॥
शिवदिनप्रभु केसरिसाहेब । मंगल दर्शन पाऊं ॥ ६ ॥

शिवदिन केसरी यांचें ' सामराज ' नांवाच्या सत्पुरुषावर एक पद आहे. हे सामराज ' रुक्मिणीहरण ' काव्याचे कर्ते असावे असें वाटतें. शिवदिनकेसरीचे गुरुबंधु मालोनाथ हेही मोठे साक्षात्कारी पुरुष होते; त्यांचीं एकदोन पदें येथें देतों; म्हणजे शिवदिन केसरीच्या संप्रदायपरंपरेंतील बहुतेक सगळ्या सत्पुरुषांच्या कवितेशीं वाचकांची ओळख करून दिल्यासारखें होईल.

राखीं माझी लाज । सखया । राखीं माझी लाज ॥ ध्रु० ॥
मी तों तुझें शरणागत स्वामी । तूं तंव गरिब नवाज ॥ १ ॥

या समयीं मज पाव दयानिधि । साडुनि सर्वहि काज ॥ २ ॥
मालो म्हणे अभय कर देई । केसरि जी महाराज ॥ ३ ॥

## आरती केसरीनाथांची.

ओवाळा ओवाळा भावें केसरी राणा ।
सर्वांगें डोळस मूर्ति सर्व देखणा ॥ ध्रु० ॥
सुनीळ आकृती मनोहर गगनाचा गाभा ।
शून्य सिंहासनीं प्रगट दिसतसे उभा ॥ १ ॥
कोंदला प्रकाश दाही दिशा उजळल्या ।
कोटी विद्युल्लता ज्याचे नखीं शोभल्या ॥ २ ॥
विश्वंभर करुणागुणसागर जीव सकळांचा ।
पिंड ब्रह्मांडाचा चाळक स्वामी मालोचा ॥ ३ ॥

## आरती-सांप्रदायिक पुरुषांची.

आरती आदिनाथा महाराज समर्था ।
तूंचि तूं एक अंश सर्व विश्वंभरिता ॥ ध्रु० ॥
मत्स्येंद्र बाळ तुझा गुरुराज योगियांचा ।
कारुण्य कामधेनु वत्स गोरक्ष जीवा ॥
पीयूष पीउनियां रसें भरली वाचा
तेथोंचि समरसला नाथ गैनी देवाचा ॥ १ ॥
आनंदसागरासी महापूर लोटला ।
निवृत्ति राजयोगी अष्टांगी निवाला ॥
शांति अरुणतेजें ज्ञान उदयो झाला ।
ज्ञानार्के उगवतां विश्वब्रह्म धवळला ॥ २ ॥
किरण प्रगटले दशदिशा व्यापुनी ।
सत्यासी सत्यवादी मोह अंध निरसुनी ॥
लीला विचित्र कैसी गैबीरूप धरुनी ।
गुप्त प्रकटविलें निजसुखनयनीं ॥ ३ ॥
पाहतां पाहतांचि लक्ष उद्बोधावरी ।
चैतन्य शुद्धज्योति उद्भवली अंतरीं ॥

प्रभेसी पार नाही उजळले केसरी ।
मंगळ गीत-वाद्यें अनुहात गजरीं ॥ ४ ॥
नवलक्ष आरती हे सांगू कवणा काई ।
मन हें उन्मन जालें बुद्धि ठाइंच्या ठाई ॥
संकल्प हारपोनी गेला देहिचा देही ।
केसरीनाथ योगें मालो शोभतो पायीं ॥ ५ ॥

शिवदिनकेसरीच्या संप्रदायांतील पुरुषाची उपलब्ध असलेली कविता थोडी आहे, पण तिच्यावरून त्या पुरुषांच्या वाणीची तेजस्विता, तिचे पारमार्थिक महत्त्व व तिच्यांतील ईश्वरी प्रसाद हे गुण इतक्या उत्कटत्वाने दृश्यमान होतात की, त्यावरून हे सगळे कवि मोठे महात्मे असले पाहिजेत, असे वाटल्यावाचून रहात नाही.



# विठोबा अण्णा दफ्तरदार.

।बोधलाभजनरंजनोजनिप्रेमगीतरसिकः कवीश्वरः ।
ब्रह्मपद्धतिसुतोपभागयं विठ्ठल' स इति को न संवदेत् ॥ १ ॥

रघुवीर विठ्ठल बेद्रे.

विठोबा अण्णा दफ्तरदार हे प्रसिद्ध विद्वान् कवि सुमारें ४० वर्षांपूर्वी कऱ्हाड येथें होऊन गेले. त्यांचें मूळचें आडनांव बेद्रे. मोंगलाईंत कलबुर्ग्यानजीक, हैदराबाद शहरापासून ७५ मैलांवर बेदर नामक शहर आहे, तेथें अण्णांचे पूर्वज रहात असत. अण्णांचे पितामह बाळाजीपंत बेद्रे हे शांडिल्यगोत्री देशस्थ ब्राह्मण, सुमारें १३० वर्षांपूर्वी बाळाजीपंतांनी पेशव्यांपासून कऱ्हाड पेठ्यांत दफ्तरदारीची सनद मिळविली व बेदर सोडून ते कऱ्हाड येथें येऊन राहिले. बाळाजीपंतांस महादजी बल्लाळ आणि त्र्यंबक बल्लाळ असे दोन पुत्र होते. बाळाजीपंतांचा काळ झाल्यावर, त्यांची दफ्तरदारीची जागा आपणास मिळावी म्हणून महादजी बल्लाळ यांनीं पेशवे सरकाराकडे अर्ज केला. त्यावरून, पेशवेसरकारचे मुख्य कारभारी नाना फडनवीस यांनीं सदर जागा महादजीपंतांस दिली. त्यावेळीं पंतांचें वय अवघें पंधरा वर्षांचें होतें, तरी त्यांनीं आपलें काम इतक्या चोख रीतीनें बजाविलें कीं, त्यामुळें त्यांचे वरिष्ठ अधिकारी व प्रजाजन हे सारखेच खुष झाले. महादजी बल्लाळ यांस लोक 'तात्या' म्हणत असत. तात्या मोठे धार्मिक

---

। ह्या उत्कृष्ट श्लोकाचें विवरण जुन्या केरळकोकिळाच्या ७ व्या वर्षाच्या ९ व्या अंकांत केलें आहे, तें वाचकांनीं अवश्य पहावें. त्याचप्रमाणें त्याच अंकांत अण्णांचें विस्तृत चरित्र दिलें आहे, तेंही अवश्य वाचण्यासारखें आहे. त्याच चरित्राच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिण्यांत आला आहे.

१ रघुवीर विठ्ठल हे अण्णांचे वडील चिरंजीव. त्यांच्यासंबंधाची कांहीं माहिती याच लेखांत पुढें दिली आहे.

बल्लाळ यांस लोक ' तात्या ' म्हणत असत. तात्या मोठे धार्मिक आणि सत्वस्थ ब्राह्मण होते. महादजीपंतांस रामचंद्र नांवाचा एक मुलगा होता, तो फार हुशार होता; परंतु तो पंधरा वर्षांचा असतांच मरण पावल्यामुळें, तात्यांस फार दुःख झालें. या मुलाच्या मागें तात्यांस आणखी कांहीं मुलें झालीं, पण तीं फार दिवस जगलीं नाहींत. शेवटीं, शके १७३५ (इ० स० १८१३) पौष वद्य अमावास्या या दिवशीं त्यांस एक पुत्र झाला; तेच हे विठोबा अण्णा दफ्तरदार होत. ह्यांचा जन्म अमावास्येस झाल्यामुळें, त्यांच्यासंबंधानें त्यांच्या आई-बापांस व इष्टमित्रांस फार काळजी वाटत असे; पण ईश्वरकृपेनें त्याच अमावास्येवर जन्मलेल्या विठ्ठलानें उत्तम प्रकारें संसार केला, बुद्धिप्रभावानें गुरूसही लाजविलें; कीर्तनांतील रंगदेवतेनें मुमुक्षुजनांच्या नयनांत प्रेमाश्रु आणले; कवित्वशक्तीनें रसिक जनांस आनंदभरांत डोलावयास लाविलें; वक्तृत्वशक्तीनें विद्याविलासी जनांस तृप्त करून धन्यधन्य म्हणवून घेतलें; याज्ञिकी ज्ञानानें काशीवासी पंडितांस तोंडांत बोट घालावयास लाविलें; आणि शेवटीं एकनिष्ठ भक्तीनें भगवंतास वश करून घेतले. ह्यावरून तुकोबांचें एक वाक्य आठवतें—" तुका म्हणे हरिच्या दासा। शुभकाळ सर्व दिशा " तेथें अमावास्या नाहीं आणि व्यतिपातही नाहीं. असो.

अण्णांची शरीरप्रकृति बालपणापासूनच सुदृढ होती, पण अभ्यासाकडे त्यांचें लक्ष्य मुळींच नव्हतें. मुलगा आई-बापांचा लाडका असल्यामुळें, त्यांनींही त्यास शिक्षणाच्या बाबतींत फारसा त्रास दिला नाहीं. अशा स्थितींत, अण्णा दहा वर्षांचे झाले, तरी त्यांस अक्षरओळखही झाली नाहीं. पुढें, दसऱ्याच्या दिवशीं, विठोबास चांगला नटवून सजवून तात्या आपल्याबरोबर त्यास वाड्यांत घेऊन गेले. त्या वेळीं बाबाजीराव लिमये सुभेदार

होते, त्यांनीं अण्णांस जवळ घेऊन अनेक प्रश्न विचारले, व अण्णांनींही त्या प्रश्नांचीं समर्पक उत्तरें दिलीं अण्णांची तरतरी पाहून सुभेदारसाहेब म्हणाले ‘ विठोबा, तुझा अभ्यास कोठपर्यंत झाला आहे ? ’ यावर, विकटोपर्यंत अध्ययन झालेले अण्णा काय उत्तर देणार ? त्यांनीं लज्जेनें खालीं मान घातली त्या वेळीं, तात्यांनीं सांगितलें कीं, विठोबास अद्याप अक्षरसंस्कारही झालेला नाहीं. हें ऐकून सुभेदारांस मोठें आश्चर्य वाटलें. ते म्हणाले, ‘ विठोबा, तुला अद्याप अक्षरओळखही नाहीं ना ? असा अक्षरशत्रु राहून तात्यांचें नांव तूं पुढें कसें चालविणार ? ’ सुभेदारांचें हें भाषण अण्णांच्या मनास फार लागलें दसऱ्याचें सोनें वांटून घरीं आल्यावर, अण्णांची चित्तवृत्ति अगदीं उदासीन अशी दिसली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते मोठ्या पहांटेस उठले व मुखमार्जनादि प्रातर्विधि सारून, तात्यांस म्हणाले, ‘ तात्या मी आजपासून शाळेंत जाऊन लिहावयास शिकणार व सुभेदारसाहेबांस परीक्षा देऊन त्यांजकडून शाबासकी मिळवणार. ’ मुलाच्या मनोवृत्तींत हा आकस्मिक फेरफार झालेला पाहून तात्यांस फार समाधान वाटलें. तात्यांच्या घराजवळच देशपांडे यांच्या वाड्यांत एका थोड्या पंतोजीची गांवठी शाळा होती, त्या पंतोजीकडून ‘ अण्णांस बिलकूल शिक्षा करणार नाहीं ’ असें कबूल करून घेऊन, तात्यांनीं आपल्या मुलास त्याच्या शाळेंत पाठविलें. तेथें अण्णांनीं इतका झटून अभ्यास केला कीं. ‘ सहा महिन्यांच्या आंत थोड्या गुरुजींचें बारदान रिकामें पडून त्यांसच उलट अण्णांचें शिष्यत्व करण्याचा प्रसंग आला ! ’ सहा महिन्यांत अण्णाचें मोडी अक्षर इतकें चांगलें वळलें कीं, शाळेंतील सगळीं मुलें त्यांचे हातचे कित्ते घेऊं लागलीं ! अण्णांची अशी प्रगति होत चाललेली पाहून, तात्यांचा आनंद त्रिभुवनांत माईना. पुढें, एके दिवशीं, तात्यांबरोबर अण्णा कचेरींत गेले व आपल्या पुत्या त्यांनीं सुभे-

दारांस दाखविल्या. सहा महिन्यांत इतका पालट झालेला पाहून सुभेदार आश्चर्यचकित झाले. ते म्हणाले, ‘ शाबास विठोबा. तूं फार तैलबुद्धि आहेस, आपल्या घराण्याचें नांव राखशील यांत शंका नाहीं. ’ सुभेदारांचे हे शब्द ऐकून अण्णांस मोठें समाधान वाटलें, हें सांगावयास नकोच.

पुढें, कोल्हापुरचे राजगुरु भाऊ महाराज ह्यांचे आश्रित चिमणाजीपंत विरमाडकर हे सदाशिवगडीं राहत असत, त्यांची कन्या गयाबाई हिच्याशीं अण्णांचा विवाह मोठ्या थाटानें झाला. अण्णांच्या पत्नीस तिच्या घरांतली मंडळींही गयाबाईच म्हणत असत. विवाहसमयीं अण्णांचें वय अवघें १२ वर्षांचें होतें ! असो. अण्णा हळुहळू मोठे होत चालले, तसतसा अभ्यासाबरोबर त्यांस तालमीचाही नाद लागत चालला. राघोपंत आपटे नामक कऱ्हाडांतील एक ब्राह्मण मोठे तालीमबाज होते, त्यांचा स्नेह संपादन करून अण्णा पोहण्याची कलाही शिकले. राघोपंत व अण्णा नित्यशः श्रीकृष्णा नदीवर स्नानास जात असत. एके दिवशीं दोघांच्याही मनांत आलें कीं, नदीच्या तीरीं आपल्या हातांनीं एक मारुतीचें देऊळ बांधावें; पण नदीच्या कांठीं देऊळ बांधावयाचें तें दगडी असलें तरच टिकणार, नाहींतर पुरानें वाहून जाणार. या विचारानें दोघेही दगड शोधूं लागले, पण अलीकडच्या तीरास कोठेंही दगड मिळेनात. नदीच्या पलीकडे मात्र मोठी दरड असून दगडही पुष्कळ होते. नदी तुडुंब भरून चालली होती, उतार नव्हता. तरी तशा स्थितींत दररोज चारपांच मोठाले दगड घेऊन पोहत येऊन आलीकडे टाकण्याचा क्रम त्यांनीं सुरू केला; व थोड्याच दिवसांत, वाळवंटांत देवालय बांधून त्यांत मारुतीची स्थापना केली ह्या मारुतीस आपट्यांचा मारुती असें म्हणत असत, पण तें स्थान स्मशानांत असल्यामुळें, हल्लीं तो ‘ मढ्या मारुती ’

या नांवानें प्रसिद्ध आहे. सांप्रत, रेलवेस्टेशनावरून कऱ्हाडास जातांना वाटेंत वाळवंटामध्यें देऊळ दृष्टीस पडतें तें हेंच होय.

त्या कालीं कऱ्हाड येथें केदारपंत नामक एक सत्पुरुष होते, त्यांचे चिरंजीव कृष्णा व अण्णा दफ्तरदार ह्यांनीं संस्कृत शिकण्याचा संकल्प करून, तेथें अप्पा पुराणिक म्हणून एक शास्त्री राहात असत, त्यांच्याकडे हे उभयतांही संस्कृत शिकण्यासाठीं गेले व त्यांनीं त्यांस आपला हेतु कळविला. ‘ ठीक आहे ’ असें म्हणून शास्त्रीबुवांनीं त्यांस रूपावळी व समासचक्र आणावयास सांगितलें. त्या वेळीं हीं पुस्तकें हल्लींच्यासारखीं स्वस्त झालीं नव्हतीं. कोणापाशीं तरी विरळा एकादी हस्तलिखित प्रत असावयाची. आणि ती एक किंवा दोन दिवसांच्या बोलीनें प्रत करून घ्यावयास मिळावयाची. त्याप्रमाणें, अण्णांनीं एक प्रत मिळवून तिची नक्कल करण्यास सुरुवात केली. पण अण्णांचा भर सगळा मोडी अक्षरावर; बालबोध लिपीचा विशेष अभ्यास त्यांस नव्हता. म्हणून त्यांनीं समासचक्राची प्रत मोडी लिपींतच लिहून घेतली; व त्यासाठीं ऱ्हस्वदीर्घाचे नियम बसवून ते दोघेही संस्कृत शिकूं लागले. ह्या विद्येंतही अण्णांच्या बुद्धीची तेजस्विता तत्काल दिसून आली. रघुसर्गाचे दहावीस श्लोक होतात न होतात, तोंच ते दुसऱ्यास समजावून देण्याची शक्ति त्यांच्या अंगीं आली. कृष्णा केदार बिचारे तसेच रेंगाळत राहिले ! दफ्तरदारांच्या घरांतील बायका पुराण ऐकण्यास बाहेर कधीं जात नसत. अण्णाचे अध्यापक अप्पा पुराणिक हे एके दिवशीं दफ्तरदारांकडे पुराण सांगण्यास आले असतां, शेवटचे दहावीस श्लोक बाकी ठेवून ते उठले व उरलेले श्लोक अण्णांच्या मुखानें श्रवण करावे, अशी इच्छा त्यांनीं प्रदर्शित केली. हें पाहून तात्यांस मोठें आश्चर्य वाटलें. कारण, अण्णांच्या संस्कृताध्ययनासंबंधानें त्यांस मुळींच माहिती नव्हती. गुर्वाज्ञेप्रमाणें,

अण्णांनीं गुरूंस व तीर्थरूपांस वंदन करून व्यासपीठावर आरोहण केलें आणि राहिलेला भाग संपविला. पंतांची रसाळ वाणी व श्लोकार्थ विशद करून सांगण्याची शैली पाहून तात्यांस जी धन्यता वाटली असेल तिची कल्पनाच केली पाहिजे. त्यांनीं शास्त्रीबुवांचे फार आभार मानिले व त्यांच्या शाळेची सगळी व्यवस्था करून त्यांस आपल्या घरींच ठेवून घेतलें. त्या वेळीं, शास्त्रीबुवांस जो आनंद झाला, त्याच्या भरांत ते विठ्ठलपंतांस हाक मारून म्हणाले, ‘ पंत ! तुम्ही आमच्या अन्नास कारण झालां, ह्याकरितां आम्ही तुम्हांस आजपासून **‘ अण्णा ’** म्हणूनच हाक मारणार. ’ ह्या दिवसापासून पंतांस सगळे लोक **विठोबा अण्णा** म्हणूं लागले व ह्याच नांवानें ते महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत.

अण्णांचे गुरु अप्पा पुराणिक फार विद्वान् होते, त्यांच्या अध्यापनांत अण्णांचें पंचमहाकाव्यांचें व्युत्पत्तिज्ञान पुरें झालें. गुरूंची शाळा अण्णा स्वतःच चालवूं लागले. गुरुजींची बहुतेक सगळी विद्या अण्णांनीं संपादन केली. अण्णांस सांगण्यासारखें गुरुजींपाशीं कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. अशा स्थितींत, आपल्या मागचा ‘ आणखी सांगा ’ हा अण्णांचा तगादा चुकविण्यासाठीं शास्त्रीबुवा एके दिवशीं पहांटेस उठून निघून गेले ! त्यांचा पुढें पत्ता लागला नाहीं. याबद्दल अण्णा व तात्या यांस पराकाष्ठेचें वाईट वाटलें. शास्त्रीबुवांकडून अण्णांस व्युत्पत्तिज्ञान चांगलें झालें; व्याकरणाचा अभ्यास मात्र तसाच राहिला.

वामनाचार्य टोणपे इत्यादि कांहीं मित्रांच्या साहाय्यानें अण्णांनीं आपल्या घराशेजारींच, प्रतिवर्षी चैत्रमासीं श्रीकृष्णाबाईचा उत्सव सुरू केला. वर्गणीनें थोडासा पैसा जमवून त्यांत हा उत्सव ते करीत असल्यामुळें, हरिदासास बिदागी देण्याचें सामर्थ्य त्यांस नव्हतें. यासाठीं अण्णांनीं कीर्तन करावें व अप्पा परशुराम आपटे,

प्रसिद्ध गोविंदबुवा कुरवलीकर व शंकर अण्णा यांनीं पाठीमागें साथ करावी असें ठरलें; व त्याप्रमाणें पहिला उत्सव साजरा करण्यांत आला पहिल्या वर्षीं कीर्तनास रंग साधारणच होता; तथापि त्या दिवसापासून, प्रयत्न केल्यास आपण चांगले कीर्तनकार होऊं, अशी भावना अण्णांच्या ठायीं उत्पन्न झाली. कीर्तनास रंगदेवतेचा प्रसाद व्हावा, या हेतूनें त्यांनीं अनुष्ठान सुरू केलें; प्रत्यहीं प्रातःस्नान करून दोन प्रहरच्या आंत अध्यात्मरामायणाचा पाठ संपवावयाचा, हें व्रत त्यांनीं चातुर्मास्य चालविलें.

दुसऱ्या वर्षाचा उत्सव जवळ येत चालला; या वर्षीं तरी कीर्तन चांगलें व्हावें म्हणून अण्णांनीं शक्य तेवढे परिश्रम केले. त्यांनीं कांहीं आख्यानें पाठ केलीं होतीं, त्यांत नवीन पद्यें रचून घातलीं. शेवटीं उत्सवाच्या दिवशीं अण्णांचें कीर्तन होऊन तें इतकें लोकप्रिय झालें कीं, ' अण्णा फारच उत्तम कीर्तन कारितात ' अशी कीर्ति सर्वतोमुखीं पसरली. कऱ्हाडांत बाबा जोशी नामक एक सत्पुरुष होते, त्यांनीं सर्पदंश झालेल्या एका माणसाचें विष कालियामर्दनाचें आख्यान लावून उतरविलें, अशी प्रसिद्धि होती. कांहीं लोकांनीं बाबांस अण्णाचें कीर्तन ऐकण्यास येण्याचा आग्रह केल्यावरून ते कीर्तनास आले होते. त्यांस ' ध्रुवाख्यान ' फार प्रिय असल्यामुळें अण्णांनीं तेंच आख्यान लाविलें व ध्रुवास दर्शन देणाऱ्या भगवन्मूर्तीचें ध्यान स्वतः वर्णिलें:—

हरि हा आनंदाचा कंद । आनंदाचा कंद ।
उभा पुढें भक्तसखा गोविंद ॥ हरि० ॥ ध्रु० ॥
सजल नीरदश्यामतनू नवरत्नखचितसौवर्ण-
मुकुट शिरपेंच तुरा वरि कलगि विराजित
कुटिलालक निटिलासि कस्तुरी-तिलक
केशरीगंध ॥ हरि हा आनंदाचा कंद ॥ १ ॥

श्रवणिं मनोहर मकरकुंडलें फुल्ल गल
कर्णांत दीर्घ-सुप्रसन्नलोचन इंदुवदन तिल-
पुष्पनासिका कुंदरदन हनु अधराबिंबगत
हास्य मंदमंद ॥ हरि हा आनंदाचा कंद ॥ २ ॥
कंबुकंठ कौस्तुभाभरण शुभपटीरपंक नव-
द्रवकषितपविरांस केयूरविभूषित कनक-
कटकसह-रत्नतोडर-प्रभानुभासित शंख
सुदर्शन-गदा-सरोरुह लसच्चतुर्भुज
ललितांगुलिधृत रत्नमुद्रिकावृंद ॥ हरि० ॥ ३ ॥
विशाल वक्षस्थलीं रमाकुचकुंभकुंकुमालेप-
लिप्त श्रीवत्सलांछिता सुवर्णयज्ञोपवीत
मध्य वालित्रयबंधुर निम्ननाभि तनु
रोमराजि लुठदुत्तरीयपट पारिजातनव-
कुसुम तुलसिकामिश्रहार-पादाग्रचुंबि
नभ भरुनि जयाचा मधुर सूटला गंध ॥ हरि० ॥ ४ ॥
कटीतटीं जरिकांठि पीतकौशेयवासपट
वास सुवासित विचित्र शृंखल अगणित
मणि झणझणित मंजुलक्वणित किंकिणी
विपुलतरोरुद्वंद्व विराजित जानुजंघ सुकुमार
सरलतर कनकवलययुत रत्नतोडरें मंजुमजु
सिंजान हीर मंजीर परिष्कृत सहज रक्त
मृदु वज्र अंकुश ध्वजांबुजांकित वृत्तवृत्त
उत्तुंग-रक्तनखचक्रवाल सत्पुण्यचंद्रिका ध्वस्त
महध्दृदयांधतमस मंदाकिनी माहेर चरणयुग
भूतरणरणिक जयाच्या क्षणिक ध्यानें तुटती
झटिति सर्व भवबंध ॥ हरि० ॥ ५ ॥
कोटिकोटि कंदर्प रूपलावण्य-दर्पहर ध्यान
मनोहर अनंतजन्म मनोमल पटली निर्मूलनकर

भक्तिगम्य तापत्रयभंजन आसेचनक ध्यानिं पाहतां
वाटे जणुं नयनांत भरावें हुंगावें दृढ आलिंगावें
कीं चुंबावें विसरतसे संसार सर्वही संतत
याचा पंत विठ्ठला सहज लागला छंद ॥ हरि० ॥ ६ ॥

ही अण्णांची पहिली कविता होय. ह्यांतील पदलालित्य, यमक-प्राचुर्य, अर्थसौष्ठव व प्रसाद हे गुण वाखाणण्यासारखे आहेत. या एकाच पद्यावरून अण्णांची कवनशक्ति असामान्य होती, असें वाटतें. रसिकता व भगवत्प्रेम हीं वरील पद्यांत जणूं काय खेळत आहेत, असें दिसतें. वरील पद्यांत संस्कृत शद्ब फार आहेत, ही गोष्ट खरी, पण भगवंताचें संस्कृत स्वरूप वर्णितांना संस्कृत मनाच्या कवीच्या तोंडून संस्कृत शद्बच बाहेर पडावे, हें अगदीं साहाजिक आहे. हें पद्य ऐकून व अण्णांची एकंदर कीर्तनशैली पाहून बाबा जोशी आनंदानें डोलूं लागले. कीर्तन समाप्त झाल्यावर त्यांनीं असे उद्गार काढले कीं, " अण्णावर भगवत्प्रसाद आहे, म्हणूनच असें कवन व असें वक्तृत्व त्यांस साध्य झालें, भगवत्प्रसादावांचून ह्या गोष्टी केवळ अशक्य होत. "

कीर्तन लोकप्रिय होण्यास गायनाची विशेष आवश्यकता असल्यामुळें, अण्णांनीं त्या कलेचें ज्ञान, उत्तर-हिंदुस्थानांतले एक संन्यासी कऱ्हाडांतील गोविंदस्वामीच्या मठांत राहत असत, त्यांजपासून संपादन केलें. ह्या संन्याशांनीं ' आपल्या आश्रमास गायनकला वर्ज्य आहे ' या सबबीवर अण्णांस प्रथमतः गायनाची माहिती करून देण्याचें नाकारिलें होतें; पण मागाहून अण्णांनीं गोविंदस्वामींस विनंति केल्यावरून, त्यांचे आज्ञेनें संन्यासीबुवांनीं अण्णांस रात्रीच्या वेळीं मठांत बोलावून, तेथें त्या कलेचें त्यांस उत्तम प्रकारचें ज्ञान करून दिलें.

पुढें, अण्णांनीं प्रसिद्ध वैयाकरण गुंडाचार्य घळसाशी यांचे वडील आबाचार्य यांजपाशीं कौमुदी म्हणण्यास प्रारंभ केला. पूर्वार्ध संपला तों आचार्य वारले; तेव्हां कौमुदीचा उत्तरार्ध अण्णांनीं स्वतः बसविला. नंतर, भिकू पाध्ये व राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर यांजपाशीं त्यांनीं पूर्वमीमांसेचें अध्ययन केलें. कोणताही संस्कृत ग्रंथ लावण्यांत अण्णांचा अगदीं हातखंडा, अशी त्यांची सर्वत्र प्रख्याति झाली. कांहीं वैद्य लोकही वैद्यक-ग्रंथांतल्या शंकांचें निरसन करून घेण्यासाठीं अण्णांकडे येऊं लागले. व्यंकटराव जांबळे नामक एक गृहस्थ अण्णांचे ऋणानुबंधी होते, त्यांनीं अण्णां-पाशीं वैद्यकग्रंथ वाचण्यास प्रारंभ केला. त्यांच्या शंकासमाधानार्थ अण्णांस त्याही शास्त्राचें अध्ययन करणें भाग पडलें; व त्यासाठीं त्यांनीं प्रसिद्ध वैद्य भाऊ टोणपे यांजपाशीं वैद्यशास्त्राचा अभ्यास केला. पुढें, अण्णांनीं ह्या ज्ञानाचा उपयोग लोकांस धर्मार्थ औषधें देण्याकडे केला.

व्युत्पत्ति आणि व्याकरण-शास्त्रांत चांगली पारंगतता संपादन केल्यावर, संस्कृत भाषेंत कविता करण्याकडे अण्णांची प्रवृत्ति झाली. औंध येथील पंतप्रतिनिधींचे आश्रित विनायक बाबुराव बापट हे रसिक गृहस्थ एके दिवशीं अण्णांच्या भेटीस आले असतां, त्यांनीं अण्णांस सहज म्हटलें, ‘ आम्ही जो मजकूर देऊं, त्याजवर आम्ही सांगूं त्या वृत्तांत आपण कविता कराल काय ? ’ अण्णा म्हणाले, ‘ आपण मजकूर लिहावा, मग आम्ही त्याचा विचार करूं.’ बापट यांनीं एका कागदावर बराच लांबलचक मजकूर लिहून दिला; व हा सगळा मजकूर श्लोकबद्ध लिहून द्या, असें अण्णांस सांगितलें. अण्णांनीं तत्काल तो सगळा मजकूर एका श्लोकांत गोंवून, तो श्लोक बापट यांस उतरून घेण्यास सांगितलें. ह्या श्लोकांत मूळ लेखांतील यत्किंचित्‌ही मतलब जाऊं न देतां,

वृत्ताच्या सर्व अटींची यथायोग्य रीतीनें परिपूर्तता करण्यांत आली होती. हा प्रकार पाहून बापट यांस अण्णाच्या शीघ्र कवित्वासंबंधानें मोठें आश्चर्य वाटलें. त्यावेळीं तेथें जे लोक हजर होते, त्यांतील एकाच्या तोंडून असें ऐकण्यांत आलें कीं, हा श्लोक बापट यांस देतेवेळीं अण्णांनीं असें बोलून दाखविलें कीं, 'अहोरात्र माझ्या मुखांतून ज्या कविता होऊन जातात, त्या सर्वांचा जर कोणी संग्रह केला असता, तर तो ठेवावयास माझें घर तरी पुरलें असतें कीं नाहीं, याचा संशयच आहे.'

अण्णांनीं आपल्या विसाव्या वर्षीं संस्कृतांत शिवस्तुति नामक आर्याबद्ध स्तोत्र रचिलें. त्यानंतर गजेंद्रचंपू लिहिला, त्याच्या शेवटीं असें पद्य आहे:-' पंचविंशति वर्षेण महादेवस्य सूनुना। ग्रंथोयं कल्पितः संतः पंत विठ्ठलशर्मणाः ॥ ' यावरून हा चंपू अण्णांनीं आपल्या वयाच्या पंचविसाव्या वर्षीं लिहिला, हें उघड होतें. गजेंद्रचंपू हा ग्रंथ काव्येतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झाला आहे. अण्णांनीं आपलें उपास्य दैवत श्रीरामचंद्र याजवर ' सुश्लोकलाघव ' नामक ग्रंथ लिहिला आहे. ह्या ग्रंथांत श्लेष फार आहे व त्यावरून अण्णांचें भाषाप्रभुत्व व अप्रतिम बुद्धिमत्ता हे गुण प्रामुख्यानें दृश्यमान होतात. सुश्लोकलाघवाचा कांहीं भाग काव्येतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ पुरा होण्याच्या पूर्वींच, त्यांतील कांहीं श्लोकांचा उपयोग हरिदास लोक आपल्या कीर्तनांत करूं लागले. एकदां नाशिकचे एक हरिदास अण्णांस भेटावयास आले होते, त्यांनीं एक सुंदर संस्कृत श्लोक म्हटला व त्याचा अर्थही सांगितला. त्यांस अण्णांनीं विचारलें, ' हा कोणत्या कवीचा श्लोक ? ' हरिदासबुवांनीं कोणा भलत्याच कवीचें नांव सांगितलें. त्यावर अण्णा हांसून म्हणाले, ' हा श्लोक माझ्या सुश्लोकलाघवांतला आहे. ' व लागलीच त्यांनीं सदर ग्रंथ बुवांपुढें ठेवून तो श्लोक त्यांस दाखविला. पुढें आपल्या

श्लोकांचें कर्तृत्व भलत्याचकडे जाऊं नये, म्हणून अण्णांनीं अन्योक्ती-सारखा एक श्लोक करून तो आपल्या सुश्लोकलाघवांत ठेवून दिला ! सुप्रसिद्ध जगन्नाथपंडित यांच्या भामिनीविलासाचाही असाच प्रकार झाला होता, हें वाचकांस ठाऊक असेलच.

अण्णांचा तिसरा संस्कृत ग्रंथ हेतुरामायण हा होय. यांत सीतास्वयंवरापर्यंतच रामायणांतील कथाभाग वर्णिला आहे व बाकी भाग आपल्या पुढील जन्मांत पुरा करण्यासाठीं शिल्लक ठेवला आहे. अण्णांला पुनर्जन्मासंबंधानें किती विश्वास होता हें पुढील गोष्टी-वरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल. एके दिवशीं कर्नाटकांतला एक मनुष्य कऱ्हाड येथें ताडपत्रांवरील कोरींव ग्रंथांचे जुडगे विकण्यासाठीं घेऊन आला. हे ग्रंथ ' विठ्ठल ' नामक कवीनें कानडी भाषेंत लिहिले होते. ' ह्या माझ्या पूर्वजन्मांतील कविता आहेत ' असें म्हणून अण्णांनीं ते सगळे ग्रंथ विकत घेतले. ' माझा पूर्वजन्म कर्नाटकांत झाला होता,' असें अण्णा कधीं कधीं म्हणत असत, असें सांगतात. सुमारें १५० वर्षांपूर्वी कर्नाटकांत विठ्ठल पुरंदर नामक कानडी भाषेचा एक कवि होऊन गेला, ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

अण्णांनीं लिहिलेल्या सगळ्या ग्रंथांचीं नांवें किंवा माहिती मिळत नाहीं. वर दिलेल्या तीन ग्रंथांशिवाय प्रबोधोत्सवलाघव, प्रयोगलाघव, नित्यक्रमलाघव, संकल्प, रामतापिनी, विवाहतत्त्व, साधुपार्षदलाघवम्, एकादशीविचार असे अण्णांचे आठ ग्रंथ प्रसिद्ध आहेत. संस्कृत भाषेचें अध्ययन सुलभ व्हावें म्हणून ' सत्पदार्थ-लाघव ' या नांवाचा एक कोश ते रचीत होते, तो शेवटीं अपुराच राहिला आहे. हे सगळे ग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत. याशिवाय अण्णांनीं भजनासाठीं पुष्कळच पदें रचिलीं, त्यांपैकीं जीं थोडींशीं प्रसिद्ध आहेत, त्यांतील कांहीं निवडक पदांचा संग्रह ह्या लेखाचे अखेरीस केला आहे.

अण्णांनीं ही सगळी विद्या अगदीं अल्प कालांत संपादन केली, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आपल्या वयाच्या विसाव्या वर्षापासून ते आपल्या वडिलांचें दफ्तरदारीचें काम स्वतः पाहूं लागले. पुढें त्यांचे वडील साठ वर्षांचे होऊन वारले, तेव्हां अण्णा अठ्ठावीस वर्षांचे होते. दुर्दैवानें, पुढें लवकरच पेशवाई बुडाली, यामुळें अण्णाची वंशपरंपरेची नोकरीही गेली ! परंतु सातारच्या महाराजांनीं त्यांस एक दुय्यम कारकुनाची जागा दिली व त्या जागीं ते लागलेच रुजू झाले. पेशव्यांनीं दिलेली दफ्तरदारी गेली, तरी अण्णांचा वंश दफ्तरदार याच नांवानें अद्याप प्रसिद्ध आहे.

सातारकरांची नोकरी पतकरल्यापासून, अण्णांनीं श्रीकृष्णोत्सवांतून मन काढलें व कीर्तन करण्याचेंही सोडून दिलें. मात्र श्रीकृष्णाबाईच्या प्रतिवार्षिक उत्सवांत एक कीर्तन करण्याचा क्रम त्यांनीं चालू ठेविला होता. कीर्तनास मोठमोठे लोक येत असत. एका कीर्तनास शेषगीरराव मामलेदार, हरिबा नाना नेवासकर इत्यादि गृहस्थ आले होते, त्यांपैकीं हरिबांसंबंधानें अशी प्रसिद्धि होती कीं, त्यांनीं ज्यास चांगलें म्हटलें, त्यास हटकून दृष्ट लागावयाची ! ह्या गृहस्थांनीं, अण्णांचें कीर्तन श्रवण करून त्यांस प्रसन्न मनानें शाबासकी दिली; त्याबरोबर अण्णा घेरी येऊन पडले ! पुढें ते सावध झाल्यावर, ' तुम्ही कीर्तन करण्याचें सोडून द्या ' असें शेषगीररावांनीं त्यांस सांगितलें व तें त्यांनीं मान्य केलें.

अण्णांचे तीर्थरूप मृत्यु पावले, त्यास दोन वर्षें लोटलीं नाहींत तोंच त्यांची प्रियपत्नीही त्यांस सोडून परलोकीं गेली ! त्यावेळीं अण्णांस सीतारामपंत ऊर्फ बापूसाहेब व रघुवीरराव ऊर्फ भाऊसाहेब हे दोन पुत्र व भवानीबाई नामक कन्या, अशीं तीन अपत्यें होतीं. भवानीबाई ही पुढें सातारा येथील सुभेदारांच्या घरीं दिली. मातृवियोगसमयीं अण्णांच्या ज्येष्ठ चिरंजीवाचें

वय अवघें बारा वर्षांचें होतें, यावरून धाकटीं दोन मुलें किती लहान असतील, हें वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. भर तारुण्यांत कुलीन, सुशील व गुणवती अशा पत्नीचा विरह अण्णां-सारख्या सहृदय व रसिक कविवरास किती दुःसह झाला असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी. त्यांतल्या त्यांत अण्णांची मातुश्री त्या वेळीं हयात होती, हें एक सुदैवच म्हणावयाचें. असो; पुढें नागेशराव मामलेदार, गोविंदभाऊ गरुड, इत्यादि सद्गृहस्थांनीं अण्णांस द्वितीय विवाह करण्याविषयीं फार आग्रह केला; परंतु अण्णांनीं ती गोष्ट कबूल केली नाहीं. त्यांस उपरति झाल्यामुळें त्यांनीं आपलें चित्त भक्तिमार्गाकडे लाविलें. अण्णांचे विवाहविषयक विचार किती उदात्त होते, हें ह्या गोष्टीवरून अगदीं स्पष्ट होत आहे. पूर्वीं, अण्णांच्या मनांत अग्निहोत्र घेण्याचा फार हेतु होता; परंतु हा अकल्पित प्रसंग गुदरल्यामुळें, तो हेतु अर्थातच पूर्ण झाला नाहीं. पत्निवियोगानंतर, थोड्याच दिवसांनीं अण्णांस अर्धांगवायु झाला; तेव्हां ती गोष्ट त्यांस पूर्वींच ज्ञात झाल्यामुळें त्यांनीं द्वितीय विवाहास आपली संमति दिली नसावी, असेंही मानण्यास हरकत नाहीं; कां कीं, त्यांच्या अंतर्साक्षित्याचीं एक—दोन उदाहरणें पूर्वीं घडून आलीं होतीं. असो. अण्णांची पत्नी परलोकवासी झाली, त्यानंतर दोन वर्षांनीं त्यांची मातुश्रीही निवर्तली. ह्या प्रसंगामुळें अण्णांच्या कोमल मनास मोठाच धक्का बसला. मातुश्रीच्या मरणापासून अण्णांनीं पागोटें घालण्याचें सोडून दिलें व मस्तकास धोतर, शालजोडी यांसारखें कांहीं तरी वस्त्र गुंडाळण्याचें व्रत आजन्म पाळिलें. पुढें अण्णांच्या मनाची वैराग्याकडे प्रवृत्ति होत चालली. राजगुरु बाबामहाराजांचे वडील चिरंजीव आबामहाराज यांजपाशीं अण्णांनीं वेदांतशास्त्राचा अभ्यास

केला; आणि अमृतराय नामक एक सत्पुरुष होते त्यांजपासून त्यांनीं गुरूपदेश घेतला. नंतर त्यांनीं पुराण सांगण्यास प्रारंभ केला.

सातारच्या महाराजांकडून अण्णांस जी नोकरी मिळाली होती, ती प्रथमतः कऱ्हाड येथेंच मिळाली होती, पण पुढें लवकरच त्यांची बदली मसूर येथें होऊन, तेथें त्यांनीं तीन वर्षें काम केलें. तेथून ते साताऱ्यास कागदपत्र समजावून देण्याकरितां गेले असतां, तेथें त्यांस केशवभट माटे हे भेटले, व त्यांजकरितां ' साधुपार्षदलाघवम् ' हा ग्रंथ अण्णांनीं लिहिला, ही गोष्ट पूर्वीं सांगितलीच आहे. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं अण्णांस पक्षघाताचा विकार जडला. त्यांचें अर्धें अंग लटकें पडलें व बोलणेंही बंद झालें ! फक्त राम हा शब्द मात्र ते उच्चारीत असत. नंतर, अनेक औषधोपचार केल्यावर त्यांची प्रकृति थोडीशी सुधारली. ते हिंडूं फिरूं लागले व पुराण सांगूं लागले. अण्णांचे ज्येष्ठ चिरंजीव बापूसाहेब हे अण्णांच्या समागमांत फारसे राहत नसत. अण्णांनीं आपल्या दोन्ही चिरंजिवांकडून व्युत्पत्तिशास्त्राचें अध्ययन करविलें, पण त्या विषयांत बापूसाहेबांची फारशी गति झाली नाहीं. दुसरे चिरंजीव रघुवीरराव ऊर्फ भाऊसाहेब हे मात्र रात्रंदिवस अण्णांपाशीं असत; व त्यांची बुद्धीही तीक्ष्ण होती; यामुळें थोड्याच वर्षांत ते चांगले विद्वान् झाले. अण्णांनीं भाऊसाहेबांस श्रीमद्भागवताचें रहस्य उत्तम प्रकारें समजावून दिलें होतें.

शरीर परस्वाधीन झाल्यामुळें, अण्णांनी नोकरी सोडली व राहिलेलें आयुष्य कऱ्हाड क्षेत्रांत, ईश्वरभजनांत, शास्त्रविचारांत व काव्यरचनेंत घालविलें. शके १७८१ सिद्धार्थी संवत्सरांतील चैत्र महिन्यापासून श्रीरामनवमीचा उत्सव अण्णांनीं आपल्या घरींच सुरू केला उत्सवांत ते प्रेमानें भजनपूजन करून पुराण सांगत असत. ' अहो जातां येतां उठत बसतां कार्य करितां ' हा वामन-

पंडितांच्या श्लोकांतला सदुपदेश अण्णांच्या ठायीं अगदीं पूर्णपणें बाणला होता; रामनामोच्चाराशिवाय त्यांनीं आपली एक घटकाही जाऊं दिली नाहीं.

श्रौतस्मार्त यज्ञकर्मविधींत अण्णा फार निष्णात होते; त्या कामीं काशींतील पंडितांकडूनही त्यांस आमंत्रणें येत असत. कऱ्हाड येथें काळे नामक गृहस्थांनीं यज्ञ केला, त्या वेळीं मोठमोठ्या विद्वान् याज्ञिकांनीं होमकुंडें वगैरे यथाशास्त्र तयार केलीं होतीं, तीं पाहून अण्णांनीं त्यांतील कांहीं चुका दाखविल्या, तीं शास्त्रनियमाप्रमाणें दुरुस्त केलीं; तेव्हांपासून या विषयाच्या संबंधानें अण्णांच्या निपुणतेची फारच प्रसिद्धि झाली. पुढें पुढें तर कोणत्याही यज्ञक्रियेसंबंधानें कांहीं वाद उपस्थित झाला, तर तो निकालासाठीं अण्णांकडे यावयाचा! श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्य हेही तीर्थप्रसाद देतांना प्रथम अण्णांस देऊन त्यांचा बहुमान करीत.

अण्णांचे थोरले चिरंजीव बापूसाहेब हे औंध येथें पंतप्रतिनिधींच्या आश्रयास होते. पुढें इ. स. १८६८ त मुंबईचे विष्णुशास्त्री पंडित यांनीं विधवाविवाह सशास्त्र आहे, असा वाद उपस्थित केल्यामुळें, त्यांचा पराजय करणें श्रीशंकराचार्य यांस भाग पडलें. आचार्यांनीं व सगळ्या शास्त्री–पंडितांनीं हें महत्कार्य अण्णांकडे सोंपविल्यामुळें ते औंधास जाऊन राहिले व निरनिराळे शास्त्रार्थ पाहण्यांत त्यांनीं कांहीं दिवस घालविले. पुढें ते अष्टे येथील वकील कै० गोविंदराव लिमये यांचे घरीं संस्कृत ग्रंथांचा मोठा संग्रह होता त्याचा उपयोग करून घेण्यासाठीं, तेथें जाऊन दोन महिने राहिले. श्रुतिस्मृतींतील वचनांचा मोठा संग्रह घेऊन अण्णा पुनः औंधास आले व तेथें त्यांनीं 'विवाहतत्त्व' या नांवाचा ग्रंथ तयार केला. त्या इतक्या खटपटींत त्यांस दीड हजार रुपये कर्ज झालें. पुढें विधवाविवाहासंबंधानें पुणें येथें

मोठा वाद झाला; तेव्हां आचार्यांबरोबर अण्णाही पुण्यास गेले होते. आचार्यपक्षाचे मुख्य वाद करणारे नारायणाचार्य गजेंद्रगडकर यांस अण्णांनीं पुष्कळ साह्य केलें. ह्या वादाचा निकाल कोणत्या प्रकारें झाला, हें बहुतेक महाराष्ट्रीयांस विदितच आहे. अण्णा पुण्यास असतां, तुळशीबागेंत व श्रीमान् लोकांच्या घरीं त्यांचीं पुष्कळ पुराणें झालीं. अण्णांच्या रसाळ वाणीनें पुण्यपत्तनस्थ रसिक जनसमूहास इतकें वेड लाविलें कीं, मुंगीस रीघ नाहीं, अशी लोकांची दाटी होऊं लागली. पुढें अण्णा मुंबईस गेले, तेथेंही त्यांची चांगली वाहवा झाली. तेथून ते कुरुंदवाड, जमखिंडीकडे आमत्रंणावरून गेले. बहुत आदरसत्कार झाला. ह्या प्रवासांत अण्णांस पुष्कळ द्रव्य मिळालें, त्यामुळें पुनर्विवाहाच्या वादाच्या तयारीसाठीं त्यांस झालेलें कर्ज फिटलें, ही एक मोठ्या संतोषाची गोष्ट होय.

अण्णांस झालेला अर्धांगवायूचा विकार मधून मधून उलट घेत असे; परंतु अण्णा स्वतः वैद्यशास्त्रपारंगत असल्यामुळें, त्यांनीं स्वतः-च्याच उपचारावर त्या विकारास पंचवीस वर्षें दाद दिली नाहीं. मात्र केव्हां तरी एखादा झटका येत असे. एके दिवशीं कऱ्हाड येथील रा० काळे यांचे घरीं सप्ताह चालला असतां, अण्णांस अर्धांगवायूचा झटका आला, आणि त्यामुळें ते निपचित पडले. बोलणेंसुद्धां बंद झालें; ‘ राम ’ येवढा शब्द मात्र तोंडांतून काढीत. अशी स्थिति होतांच बापूसाहेब औंधास होते, त्यांस बोलावून आणिलें. औंध येथील नामांकित राजवैद्य बाळशास्त्री बापट यांचे उपचार सुरू होऊन थोडासा गुण पडला. “ ते चालूं लागले, रामायण वाचूं लागले, स्वतः जेवूं लागले, रात्रंदिवस रामनाम, रामाचें ध्यान व रामाचें भजन. असें त्यांचें एक वर्ष गेलें. ” पुढें चैत्रमासीं रामनवमीचा उत्सव आला, तो अण्णांनीं यथासांग व सप्रेम सिद्धीस

नेला. वद्य पक्षांतील दशमीच्या दिवशीं, उत्सवासाठीं आलेल्या कित्येक विद्वान् वैदिकांबरोबर अण्णा बोलत बसले होते. गणेश सीताराम शास्त्री गोळवलकर, इंदुरचे सुभे, हे कांहीं सरकारी कामानिमित्त विलायतेस गेले होते, ते शुद्ध होण्याचा शास्त्रार्थ विचारण्यासाठीं, एकदोन दिवसांपूर्वीं येऊन गेले होते. त्यांस शुद्ध होण्यास हरकत नाहीं, म्हणून,अण्णांनीं शास्त्रार्थ काढून देऊन,मुहूर्तही काढून दिला व त्यांची इंदुरास रवानगी केली.दशमीच्या दिवाशीं त्यांच्या पाठींत एकाएकीं कळ निघून ते फार घाबरे झाले त्यांनीं आपले स्नेही विष्णुपंत भागवत यांस बोलावून आणून सांगितलें कीं माझा आतां भरंवसा नाहीं.मागें रामनवमीचा उत्सव चालू रहावा,मुलांनीं नोकरी करूं नये, इत्यादि आपले हेतु अण्णांनीं विष्णुपंतांस कळविले. नंतर नेहमीप्रमाणें त्यांचें प्रेमळ भजन चालू झालें. पाठींतील कळ अंमळ कमी झालीशी वाटली. दुसरे दिवशीं–शके १७९५ चैत्र वद्य एकादशी–प्रातःकालींच स्नान, संध्या, पूजा इत्यादि नित्यकर्म आटोपून खारकांच्या क्षीरीचा नैवेद्य श्रीरामचंद्रास समर्पण केला. नंतर 'अपराधस्तोत्र' म्हणून तीर्थ घेऊन तुलसीपत्राचा स्वीकार केला व अतिशय तृषा लागली होती म्हणून थोडी क्षीर सेवन करून, उदक प्राशन करण्याकरितां पाण्याचें पंचपात्र हातीं घेतलें. नित्यसंप्रदायाप्रमाणें प्राशनापूर्वीं 'श्रीराम' असा मोठ्यानें नामघोष करून उदक मुखांत घातलें. झालें, संपलें! त्यांचे पंचप्राण श्रीरामनामाबरोबरच चित्स्वरूपीं मिळून त्यांचा नाशवंत देह मात्र अवशेष राहिला. हातांतील पंचपात्र धाडकन खालीं पडलें. जीवास क्लेश न होतां, एकादशीला मुखानें रामनामोच्चार करीत असतां मृत्यु येणें म्हणजे कांहीं सामान्य पुण्याई नव्हे! असो घरांतील मनुष्यें बाहेर येऊन पाहतात, तों हा शोचनीय प्रकार त्यांच्या दृष्टीस पडला! अण्णांचे दोन्ही मुलगे औंधास होते, त्यांस तावडतोब मनुष्य पाठवून आणलें

व सर्वांनीं अण्णांचें देहसार्थक केलें. अण्णाच्या मागें, रामनवमीचा उत्सव कऱ्हाडास अद्याप चालू आहे.

अण्णाचे द्वितीय चिरंजीव रघुवीरराव ऊर्फ भाऊसाहेब हे अण्णांच्या सान्निध्यास असून, चांगले व्युत्पन्न व कवि होते, हें पूर्वी सांगितलेंच आहे. अण्णाच्या गजेंद्रचंपु या काव्यावर भाऊसाहेबांनीं टीका केली आहे, ह्यावरून अण्णाच्या इतर संस्कृत काव्यांवरही त्यांनीं टीका केली असावी असें वाटतें. एकंदरीत रघुवीररावजींची विद्वत्ता व कवित्वशक्तीही त्यांच्या परमपूज्य तीर्थरूपांच्या सत्कीर्तीस साजेल अशीच होती. अण्णांच्या पश्चात् रघुवीररावही फार दिवस वांचले नाहींत; दोन वर्षांच्या आंतच तेही निवर्तले. असो; येथें विठोबा अण्णाचें संक्षिप्त चरित्र समाप्त झालें. हें चरित्र, अण्णाचे वडील चिरंजीव सीतारामपंत यांनीं दिलेल्या माहितीच्या आधारानें रा० रा० आठल्ये, माजी करळकोकीळकर्ते यांनीं लिहिलें असून, तें स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें आहे; व त्याच्याच आधारानें प्रस्तुत लेख मीं संक्षेपरूपानें लिहिला आहे.

मोरोपंतांच्या मागें, जुन्या पद्धतीनें कविता करणारे जे कवि होऊन गेले, त्यांत विद्वत्तेनें, सदाचरणानें व काव्यगुणांनीं युक्त असा कवि विठोबा अण्णासारखा दुसरा झाला नाहीं. अण्णाची विद्वत्ता अवर्णनीय होती. मोरोपंत, सोहिरोबा इत्यादि कवींची कविता त्यांनीं लक्ष्यपूर्वक वाचली होती, हें त्या कवींसंबंधानें त्यांनीं जे उद्गार काढले आहेत, त्यांवरून उघड होतें. अण्णांच्या सुश्लोकलाघवांतील श्लोकांचा उपयोग करून, रसिक हरिदास लोक आपल्या कीर्तनास कसा रंग आणितात, याचा अनुभव पुष्कळांस असेल. अण्णांनीं आपल्या संस्कृत काव्यांप्रमाणें, मराठींत एकही मोठें काव्य लिहिलें नाहीं, ही गोष्ट खरी, पण त्यांची जी काय थोडीशी मराठी कविता उपलब्ध आहे, तिचें अवलोकन केलें असतां, कवि या नात्यानें

अण्णाची योग्यता फार मोठी आहे, असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. त्यांच्या कवितेंत विद्वत्ता, रसिकता, प्रसाद, प्रेम, भक्ति, गायनकला, निपुणता, नम्रता व पवित्रता हे गुण सारख्या प्रमाणांत वसत असल्यामुळें, ती कविता वाचतांना किंवा ऐकतांना रसिकाच्या चित्तवृत्ति क्षणभर वेडावल्याशिवाय राहात नाहींत. अण्णांच्या मराठी कवितेचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. त्याशिवाय त्यांची बरीच कविता अलिबागच्या बाजूस त्यांच्या एका शिष्याच्या घरीं आहे, असें केसरींतील एका पत्रावरून समजतें. ही सगळी कविता कोणी प्रसिद्ध करील तर महाराष्ट्रावर त्याचे मोठे उपकार होतील. अण्णांच्या संस्कृत कवितेसंबंधानें विवेचन करण्याचें हें स्थल नव्हे व तसें करण्याचा माझा अधिकारही नाहीं. जुना केरळकोकिळ, वर्ष ७ अंक १० यांत अण्णांच्या संस्कृत प्राकृत कवितेसंबंधानें फार उत्कृष्ट व्याख्यान केलें आहे, तें वाचण्याची वाचकांस शिफारस करून पुढें वळतों.

अण्णांचीं सामाजिक मतें कोणत्या प्रकारचीं होतीं, हें त्यांच्या चरित्रांतील एक दोन महत्त्वाच्या गोष्टींवरून अगदीं स्पष्ट दिसून येतें. विधवाविवाह त्यांस मान्य नव्हता, हें त्या वादांत त्यांनीं जो भाग घेतला होता, त्यावरून उघड दिसतें, तथापि हल्लींच्या आधिदैविक संकटांनीं वृद्धिंगत केलेली बालविधवांची भयंकर संख्या अण्णांच्या अवलोकनांत आली असती, तर त्या थोर, उदार व सहृदय कविवरानें, या विषयासंबंधानें आपल्या मतांत थोडासा बदल केला असता कीं नसता हें सांगतां येणें शक्य नाहीं. परदेशगमन धर्मशास्त्रास असंमत नाहीं, अशी अण्णांची समजूत होती, हें गणेशशास्त्री गोळवलकरांस त्यांनीं जो शास्त्रार्थ काढून दिला, त्यावरून स्पष्ट होतें. भर तारुण्यांत प्रथम पत्नीचा विरह झाला असतां, त्यांनीं द्वितीय विवाह केला नाहीं. यावरून विवाहसंस्कारासंबंधानें त्यांची कल्पना किती

उदात्त होती, हें तात्काळ ध्यानांत येतें, व विधवाविवाहास ते प्रतिकूल कां होते, याचाही खुलासा सहज होतो. असो.

अण्णाचीं पदें किती कवित्वपूर्ण आणि हृदयंगम आहेत, हें पुढील वेंच्यांवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल.

पद ( कां मनि धरिली अढी. )

रामकृष्ण नरहरे स्वामिन् । कधिं करिशिल बा दया दयाळा ।
गर्भवास हा पुरे ॥ ध्रु० ॥
काय करूं मी बरें ? सांगा । कळों येति मज माझे दोषगुण ।
चित्त परी नावरे ॥ १ ॥
विषयीं मन बावरे । सदोदित । कामक्रोध हे चोर लुटति मज ।
प्राण होति घाबरे ॥ २ ॥
धांव धांव धाव रे ! । सत्वर । बुडतो भवसागरीं दीन हा ।
उद्धरिं आपुल्या करें ॥ ३ ॥
विचार मज न स्फुरे । कांहीं । केंवी गति होईल म्हणुनियां ।
जिव हा अंतरिं झुरे ॥ ४ ॥
प्रार्थितसें आदरें । अतां एक । असें करीं तव नाम निरंतर ।
पंतविठ्ठल स्मरे ॥ ५ ॥

स्वात्मनिवेदन.

पद ( धुमाळी. )

उत्तम जन्मा येउनि रामा ! गेलों उगा वाया ।
दुष्ट पातकी शरण मि आलो सत्वर तव पाया. ॥ ध्रु० ॥
आधीं चुकलों मुकलों मी निज वेदस्वाध्याया ।
कर्म श्रौतस्मार्त न घडलीं सद्गति साधाया ।
पुराण परिसुान सादर झालों यशाहि न तव गाया ।
स्वस्थपणें कधिं नाहिं फावलें तुजला पूजाया ॥ १ ॥
आर्जविलें बहु कवणभजनें व्याह्या जांवाया ।
क्षुधित अतिथि कधिं नाहिं घेतला प्रेमें जेवाया ।

उदार कर कधिं केला नाहीं पैसा एक द्याया ।
नाम फुकटचें तेंहि न आलें स्वामी वदना या ॥ २ ॥

कपट करुनियां निपट भोंदिल्या बहु आया बाया ।
केलि धनगृह–क्षेत्र–स्त्रीपशु–शिशुवर बहु माया ।
नित्य सजविली वसनभूषणें निंद्या ही काया ।
सिद्ध ठेविली सदाहि रसना सज्जन निंदाया ॥ ३ ॥

वटवट निशिदिनिं केलि चहुंकडे मन हें रमवाया ।
केलें स्नान न संध्या जपतप दुष्कृत शमवाया ।
क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ।
स्वयःकामुक झालों पाहुनि परधन परजाया ॥ ४ ॥

नाहीं विद्या कलाकुशलता तुजला रिझवाया ।
शुद्ध मधुर वाणीही नाहीं तुजला विनवाया ।
बुद्धिहि नाहीं नकळे कांहीं शरणागत व्हाया ।
थकलि मजल सर्वथा दयाळा स्वहित आचराया ॥ ५ ॥

हरि कनवाळू करि दीनावरी करुणेची छाया ।
निगम नगारा गर्जे ऐसा निखिलां कळवाया ।
यावरि विश्वासुनियां आलों जवळ तुझ्या पायां ।
शुद्ध दगड हा पंतविठ्ठल स्वामी रघुराया ॥ ६ ॥

वरील पदांत नमूद केल्याप्रमाणें, अण्णांची स्थिति खरोखरच होती कीं काय, याबद्दल शंका वाटते. अण्णांची वाणी इतकी ‘ मधुर व शुद्ध ’ असतां, ‘ शुद्ध मधुर वाणीही नाहीं ’ असे उद्गार त्यांनी काढिले आहेत. यावरून, वरील पदांतील इतर विधानाच्या सत्यासत्यतेसंबंधानेंही एखाद्यास शंका येणें साहजिक आहे; तरी पण वर दिलेलीं दोन पदें अण्णांच्या मनाचा कोमलपणा व पारमार्थिक कळकळ, हे दोन गुण उत्तम प्रकारें व्यक्त करितात, यांत संशय नाहीं. केरळकोकिळकर्त्यांच्या प्रेमळ भाषेनें बोलावयाचें म्हटल्यास, ‘ हीं दोन पदें ऐकून एखाद्या पाषाण हृदयासमुद्धां द्रव

येईल. मग करुणेचा सागर जो भगवान् तो अण्णांच्या प्रेमळ वाणीनें द्रवला असेल, सुप्रसन्न झाला असेल व त्यानें अण्णांचा उद्धार केला असेल, यांत शंका कशाची?' असो.

पद ( गड्यांनो घ्या हरिच्या नामा. )

मातर्जनकराजतनये! । त्रिजगज्जननि सदयहृदये! ।
विनंति करुनि चित्त वळवा । प्रभुला केव माझि कळवा ॥ ध्रु० ॥
मारुतिराया बलभीमा! । द्या मज हरिभजनीं प्रेमा ।
अजि लक्ष्मणजी । जगजेठी । करा मज रामचरणभेटी ॥ १ ॥
भरतजी! एवढि करा सवडी । द्या मज रामपदीं आवडी ।
शत्रुघ्नजी! करा करुणा । दाखवा रामरायचरणा ॥ २ ॥
सुग्रीवजी! भीड खर्चा । करा मज दास प्रभु घरचा ।
लंकानाथ बिभीषणजी । द्या प्रभुपाशीं दाद माझी ॥ ३ ॥
अहो! अंगदप्रमुख भक्त । घ्या मज आत्ममंडळांत ।
विठ्ठलपंत उभा द्वारीं । भिकारी दीन हाका मारी ॥ ४ ॥

वरील पद्यांतील शब्दरचनेपेक्षां त्यांतील अर्थगांभिर्याकडे लक्ष्य दिलें असतां, अण्णांच्या मनाची पारमार्थिक स्थिति किती स्पृहणीय होती, याची स्पष्ट कल्पना झाल्यावांचून राहत नाहीं. शिवाय, ज्या रसिकांनीं मोरोपंतांचीं काव्यें वाचलीं असतील, त्यांस वरील पद्यावरून, पंतांच्या 'महद्विज्ञापना' काव्याची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं. विठोबा अण्णा हे अगदीं अर्वाचीन कवि, पण जुन्या मराठी कवितेच्या नित्य परिचयामुळें, त्यांची सगळी कविता अगदीं प्रेमळ, सरस आणि चित्ताकर्षक उतरली आहे.

पद ( माझी विनवणी. )

राघवा! तुझा तुझा लागो छंद । न जडो दुर्मतिचा गंध ॥ ध्रु० ॥
न रुचो विषय विषय विषावाणी । आवडो संतांची वाणी ॥ १ ॥
अंगिं रोमांच रोमांच नयनपाणी । झिरपो तुझिं गातां गाणीं ॥ २ ॥
विठ्ठलपंतासि पंतासि हेंचि काम । आवडो सदा तुझें नाम ॥ ३ ॥

पद (त्रिवट.)

मधुरिपुमधु विपिनीं मधुकाली ॥ ध्रु० ॥
सखि मधु मधुतर मंजुल । वाजवितो मुरली ॥ १ ॥
मधुकरनिकरे मधुररवें मधु- । माधव कां त्यजिली ॥ २ ॥
मधुनि मधुनि विधुसदृश मुख । वधूतानलये मुरली ॥ ३ ॥
विठ्ठलपदिं स्वर्धुनिशी अधुना । चित्तवृत्ति जडली ॥ ४ ॥

वरील पद्य वाचतांना रसिकांस जयदेव कवीच्या गीतगोविंद काव्याची आठवण होणें अपरिहार्य आहे, असें मला वाटतें.

पद (उद्धवा शांतवन कर जा.)

राम राम बोला वाणी, मन लावा राघवचरणीं ॥ ध्रु० ॥
कर्मतत्त्व गहन कळेना, कळलें तरि सांग घडेना ।
कर्तृताभिमान उडेना, कामाचा दोष झडेना ।
ब्रह्मार्पणबुद्धि जडेना, पुण्याशीं गांठि पडेना ।
अंधारि निशा उजडेना, हित कोठुनियां आडरानीं ? ॥ १ ॥
साधूचा संग धरावा, नाहीं ज्या आपपरावा ।
स्वकरें तच्चरण चुरावा, हरिमहिमा श्रवण करावा ।
प्रेमभाव हृदयिं धरावा, कीर्तनीं करा सुगरावा ।
भवसिंधु सुखें उतरावा, जन्माची होय शिराणी ॥ २ ॥
विषय हे विषापरि विटती, स्वयमेव क्लेशही सुटती ।
वासना मूळही आटती, चित्ताच्या वृत्ती तुटती ।
ज्ञानांकुर हृदयीं फुटती, सहज सर्व संशय फिटती ।
कर्मबंध सहसा तुटती, स्वानंदसुखाची खाणी ॥ ३ ॥
शास्त्रदीप घेउनि निघतां, निगमागम शोधुनि पाहतां ।
संतासी हितगुज पुसतां, सुगम हाचि दावी पंथा ।
आहेत मतांतर कंथा, ज्या रुचल्या नाहिं अनंता ।
म्हणुनि हाचि विठ्ठलपंता पथ गमला निर्मल वाणी ॥ ४ ॥

हिंदु धर्माचे असंख्य ग्रंथ पाहून आणि मतमतांतरें ऐकून ज्यांचीं मनें परमार्थ—पथाविषयीं भांबावून गेलीं असतील, त्या मुमुक्षु

जनांनीं अण्णाच्या वरील उपदेशामृतपानानें स्वतःची पारमार्थिक अमरता प्राप्त करून घेण्यास चुकूं नये.

खालील पदांतील अनुप्रास पाहण्यासारखे आहेत:—

पद (दादरा.)

कंजनयन गोपाल । भज भज भज सर्वकाल ॥ ध्रु० ॥
पिच्छोच्छलितावतंस गुंजगुच्छ विलसदंश ।
पिच्छिलता पिच्छकंस कसासुरगिलन काल ॥ १ ॥
हल्लकनव पल्लवपद मंदस्मित फुल्ल गल्ल ।
बल्लवकुल वल्लभ जो मल्लमदन सुभगभाल ॥ २ ॥
हट्ट त्यज धैर्य धरीं घट्ट संतपाय धरीं ।
चट्ट दुरित गट्ट करिल पंतविठ्ठलाऽधिपाल ॥ ३ ॥

पुढील पद तर सुप्रसिद्धच आहे:—

पद (दादरा.)

करिं अतित्वरा । घडि घडि घडि पल पल जप ।
अमृतधाम रामनाम करुनि आदरा ॥ ध्रु० ॥
अति दुर्धर अपरिहरा येइल जंव तुजसि जरा ।
लट लट लट हलल मान धनुसमान तनु पुमान् होत बावरा ॥ १ ॥
अंतसमय परम घोर, दोषत्रय करिति जोर ।
घुरु घुरु घुरु कंठ होय, भरिल श्रम हरिल स्मृति करिल घाबरा ॥ २ ॥
जो इंद्रियसंघदक्ष तो निजकल्याणदक्ष ।
त्यज वटवट खटपट उगि झटपट करिं कपटरहित भज रमावरा ॥ ३ ॥
विनावि पंतविठ्ठल शरम किमपि धरीं विरम विरम विषयिं न रम ।
अमरमहित चरमतनु परम लाभ न करिं मातिरा ॥ ४ ॥

विठोबा अण्णाची कीर्तनशैली अत्यंत चित्तवेधक होती. अगाध विद्वत्ता, प्रासादिक कवित्व, अप्रातिम रासिकता व सरस वक्तृत्व यांहीं करून त्यांच्या कीर्तनांत मोठा रंग येत असे. आपल्या कीर्तनांत ते जीं आख्यानें लावीत असत, त्या आख्यानांवर त्यांनीं स्वतः

कविता केली आहे व ही कविता, त्यांच्या इतर कवितेपेक्षां अधिक रसवती आहे. कित्येक पद्यें तर इतकीं बहारीचीं आहेत कीं, तीं वाचून, अण्णांच्या रसिकतेसंबंधानें प्रत्येक रसिकास मोठें कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाहीं. सीतास्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर व द्रौपदीस्वयंवर हीं अण्णांचीं तीन प्रकरणें केवळ स्त्रियांसाठींच लिहिलीं असून, सगळ्या महाराष्ट्र स्त्रियांनीं तीं अवश्य पाठ करावीं. रामजन्मावरचें पुढील पद्य किती सरस आहे, पहा:—

पद ( धुमाळी. )

पुष्पसमय मधुमास पुण्यतम शुक्लपक्ष तिथि ते नवमी ।
रवि मंगल गुरु शुक्र शनैश्चर ग्रह होते हे उच्चतमीं ॥
कर्क लग्न नक्षत्र पुनर्वसु मेषराशिगत खररश्मी ।
उदगामिजीवेंदु मध्यंदिन असतां संकुल कुसुमीं ॥
हृत्पद्मीं दृढयोग युद्मुनि चिंतिताति ज्या यमनियमीं ।
चिन्मय निष्कल एक शुद्ध इति विविध गायिला जो निगमीं ॥ १ ॥
भक्तकामकल्पद्रुम तो प्रभु करुणरसें पूर्ण द्रवला ।
श्रीमदयोध्या नगरीं दशरथराजगृहीं हरि अवतरला ॥ ध्रु० ॥
सांद्रपयोधर श्याममनोहर रूप जया मन्मथ लाजे ।
हिरेजडित शिरपेंच तुरा वरि शिरिं किरीट बरवा साजे ॥
भाळिं तिलक कविजना न वदवे कुटिलालककृत शोभा जे ।
मकराकृति कुंडलें श्रवणयुगीं सुप्रसन्न लोचनजलजें ॥
इंदुवदन नवकुंदरदन शुचि मंदहास अधरीं भ्राजे ।
ग्रामत्रय मधुरिमार्थ कंठीं जडला जणुं रेखाव्याजें ॥
मौक्तिकहार उदार सुशोभित मध्यें कौस्तुभमणि रुळला ॥

श्रीमदयोध्या० ॥ २ ॥

कटींतटीं उद्दाम पीतपट मंजु किंकिणी गजबजती ।
जानुजंघ सकुमार गुल्फयुग वलयनूपुरें रुणझुणती ॥

सहज मृदुंग आरक्त पदतल ध्वजादि चिन्हें विराजती ।
रम्य मनोहर सरळ अंगुली पूर्णचंद्रसी नखकांती ॥
त्रिभुवन कलुषक्षपणनिपुणतर मंदाकिनि झुळझुळ स्रवती ।
पादयुगुळ यत्क्षणिक चिंतनें कर्मबंध सहसा तुटती ॥
दिव्यरूप पाहतां जननिच्या प्रेमपूर हृदयीं भरला ॥ ३ ॥
प्रसन्न दिक्चक्रवाक सुंदर मंद गंधवह संवहती ।
स्वयें हुताशन आयतनातः प्रदक्षिणार्चिः प्रज्वलती ॥
शृंगारुनि गृह रत्नतोरणें नागरिक ध्वज उभारिती ।
द्वारपरिसरीं कुंभदासिका शातकुंभजल निषिंचती ॥
उजळुनि दीपज्योति कारुजन नीराजनविधि आचरती ।
वारवधू सालंकृति नाचति मंजुल हरिहरगुण गाती ॥
तननं तननं धिगिति धिगिति धिक् थय्य थय्य रव घुंबरगा ॥
श्रीमदयोध्या० ॥ ४ ॥

वरील पद्याच्या शेवटीं अण्णांचें नांव दिसत नाहीं, यावरून तें अपूर्ण असावें असें वाटतें. सदर पद्य किती सुंदर आणि हृदयंगम आहे, हें रसिकांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. श्रीरामजन्मासारखा उदात्त मनोहर विषय आणि अण्णांची अत्यंत भक्तिपूर्ण, प्रासादिक सुसंस्कृत वाणी, यांचा संगम खऱ्या रसिकांस इतका कुतूहलजनक वाटावा, यांत आश्चर्य नाहीं.

श्रीरामरावणयुद्धप्रसंगीं, लक्ष्मण रावणाच्या शक्तीनें मूर्च्छित पडला असतां, त्यास अंकावर घेऊन श्रीरामचंद्र शोक करीत आहेत:—

पद ( अजुनि कां रे न येसी० )

मंदभाग्य मी ऐसा । सुखि होय कसा ॥ मंद० ॥ ध्रु० ॥
राज्यश्रीच्युत झालों विपिनासि आलों ।
मातातातसुहृत्प्रियस्वजनां मुकलों ।
परि तें मी सीतायोगें नाहीं स्मरलों ।
त्याहि तशा देवीला कैसा मुकलों ॥ मंद० ॥ १

या विरहींच मरावें, परि कां चुकलों ।
होते हे डोळ्याचे सोहळे उरले ।
होता बंधु सुहृत्प्रिय, मग या विरलों ।
रक्षुनि बहुधा मजला, बहु धैर्य दिलें ॥ मंद० ॥ १ ॥
म्हणे मी होतों याच्या भुजशक्तिवरी ।
दुष्टशिरोमणि रावण मारिन समरीं ।
अंकीं घेइन पुनरपि क्षितिची कुमरी ।
अर्पिन राज्य बिभीषण निज भक्तकरीं ॥ मंद० ॥ ३ ॥
बा सखया सुग्रीवा ! तुज कष्टविलें ।
तूंही श्रम बहु केले परि नाहिं फळले ।
पाहुनि लक्ष्मणगतिला हृदय चुरलें ।
कैकयिनवस समस्तहि आजि बा ! पुरले ॥ ४ ॥
तूं तरि वृथा कां मरसी मम मित्रवरा ! ।
यश कोठुनियां ? हा मी दुर्दैवि पुरा ।
तूं तरि क्षेम असें बा ! जा निज नगरा ।
लक्ष्मणवद्गति माझी हा नेम खरा ॥ ५ ॥
सर्वहि पूर्वजकीर्ति म्यां मालविली ।
सून सुमित्रेची उगि आजि नागविली ।
जन्मुनि मीं कौसल्या उगि भागविली ।
तत्पदिं विठ्ठलपंतें मति वागविली ॥ ६ ॥

भगवद्भक्त ध्रुव हा आपल्या पित्याच्या अंकावर बसावयास गेला असतां, त्याची सापत्न माता सुरुचि त्यास जे कठोर शब्द बोलली, ते कवि वर्णितात:—

पद ( ध्या हरिच्या नामा० )

पोरा ! ये माझ्या उदरीं ! मग या बैसें मांडिवरी ।
चल उठ येथुनि जा स्वघरीं । कैचें हें सुख तव पदरीं ॥ ध्रु० ॥
केलीस पूर्वी क्रिया खोटी । म्हणुनि जन्म तिच्या पोटीं ।
आतां तुज राज्यसुखासाठीं । लागली आशा बहु मोठी ॥

कैशा घडतिल या गोष्टी ? । पाहिजे पदरिं पुण्य कोटी ।
दुराशा व्यर्थ मनीं न धरीं । कैचें हें सुख तव पदरीं ? ॥ १ ॥
जरि तुज अवश्य हें करण । करिं मद्वचना अनुसरण ।
स्वामी त्रैलोक्याऽभरण । नतजनाविपदब्ध्युद्धरण ।
त्या श्रीहरिला जा शरण । तयाचे घट्ट धरीं चरण ।
त्याचा प्रसाद होय जरी । मग या बैसें मांडिवरी ॥ २ ॥
असे हे शब्द तिचे कांटे । लागतां हृदय जणूं फाटे ।
चित्तीं खेद फार वाटे । तेणें कंठनाळ दाटे ।
निघाला रडत रडत वाटे । ये निजमाउलिला भेटे ।
ती त्या कवळुनि हृदयीं धरी ॥ ३ ॥
तयातें जें जें कां छळलें । सर्वहि जनवदनें कळलें ।
तत्क्षणीं अंतर कळवळलें । अश्रुजळ नयनांतुनि गळलें ।
पळ मन मोहभरें मळलें । विवेकें परि न तिळहि चळलें ।
विठ्ठल तत्पदिं नमन करी ॥ ४ ॥

'गड्यांनो घ्या हरिच्या नामा' हें प्रसिद्ध पदही विठोबा अण्णांचेंच होय; परंतु नवनीतकर्त्यांनीं तें चुकीनें शिवदिन-केसरींचें म्हणून प्रसिद्ध केलें आहे. हें पद बहुतेक सर्वांच्या ऐकण्यांत असल्यामुळें त्याचा येथें समावेश केला नाहीं.

## संन्यासी अर्जुन.

### पद—( चाल वरची ).

अर्जुन होउनि संन्यासी । झाला द्वारावतिवासी ॥ ध्रु० ॥
बरवा परिकर लंगोटी । गुलाबी खडखडीत छाटी ।
प्रणवोच्चार स्थिति ओठीं । स्मरणी चालतसे बोटीं ।
अंगीं विभूतिची ऊटी । कपटी वेष कांति मोठी ।
पाहुनि जन भुलले त्यासी । झाला द्वारावतिवासी ॥ १ ॥
लोटली द्वारावति सारी । झाली खेट मठद्वारीं ।
पुजाया नाना उपचारीं । वेळा साधिताति चारी ।

दुर्लभ यतिदर्शन भारी। ढोंग माजविता कंसारी।
पडल्या भेटींच्या राशी ॥ झाला० ॥ २ ॥
यतिची सतत मौनवृत्ती। समाधिस्थिति बहु एकांतीं।
वेदांतस्थ रहस्योक्ती। बोलतां फार सरस युक्ति।
त्यांतुनि तीव्रतर विरक्ति। उपजली सर्व जनां भक्ती।
येउनि बसति तयापाशीं ॥ झाला० ॥ ३ ॥
वर वर वर वियोगमुद्रा। गडबडतसे मनिं सुभद्रा।
भरतें येत स्मरसमुद्रा। रात्रंदिवस नये निद्रा।
हें एक ठावें यादवेंद्रा। उपजवी प्रीती बलभद्रा।
कुतूहल **पंत विठ्ठलासी** ॥ झाला० ॥ ४ ॥

अण्णांच्या प्राकृत कवितेप्रमाणें त्यांची संस्कृत कविताही अत्यंत रमणीय आहे, परंतु 'महाराष्ट्रकविचरित्र' ग्रंथांत त्या कवितेंतील वेंचे देणें प्रशस्त न वाटल्यावरून, तसा प्रयत्न केला नाहीं. शेवटीं, अण्णांची जी संस्कृत व प्राकृत कविता अद्याप छापून निघालेली नाहीं, ती छापून या सत्कवीच्या काव्याचा कायमचा जीर्णोद्धार करण्याचें श्रेय कोणी तरी उदार व रसिक गृहस्थ लवकरच घेईल, अशी आशा प्रगट करून, हा लेख येथें पूर्ण करितों.



# दामोदर गणेश जोशी उर्फ कृष्णदास.

महाराष्ट्रांत आजपर्यंत कृष्णदास या नांवाचे तीन-चार कवि होऊन गेले, त्या सर्वांत प्रस्तुत लेखविषयक कृष्णदास हा अर्वाचीन होय. ह्या कवीचा 'व्रतसार एकादशीमाहात्म्य' हा ओंवीबद्ध ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे, त्याच्या शेवटीं, शके १७७७, राक्षस नाम संवत्सरे, हा काल दिला आहे, त्यावरून सुमारें ३०-३५ वर्षांपूर्वी हा कवि विद्यमान होता, असें वाटतें. पुणे येथील जगद्धितेच्छु छापखान्याचे मालक के० रावजी श्रीधर गोंधळेकर यांनीं कीर्तनतरंगिणी नामक ग्रंथाचे जे चार भाग प्रसिद्ध केले आहेत, त्यांपैकीं पहिला भाग याच कवीनें तयार करून त्यांस दिला होता; यावरूनही, प्रस्तुत कवीस फार वर्षे झाली नाहींत, हें उघड होतें. रा. गोंधळेकर यांच्या चिरंजिवांपाशी या कृष्णदास कवीसंबधानें मला कांहींएक माहिती मिळाली नाहीं; इतकेंच नव्हे तर हा कवि जातीनें कोण होता, हेंही त्यांस ठाऊक नाहीं. भारतवर्षीय अर्वाचीन कोशांत, "दामोदरदेव या नांवाचा एक कऱ्हाडा ब्राह्मण कवि रत्नागिरी प्रांतीं, सुमारें ५० वर्षांपूर्वी होऊन गेला व त्याचें आडनांव 'नवाटे' होतें," अशी माहिती आढळते. परंतु प्रस्तुत लेखविषयक कवीचें आडनांव 'जोशी' असल्यामुळें, सदर दामोदरदेव आणि हा कवि, ही एकच व्यक्ति होती, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. प्रस्तुत कवीनें, आपण गुहागर* येथील रहिवासी असल्याचें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे; व त्या ठिकाणीं जाऊन चौकशी केल्यास, या कवी-

---

* गुहागर येथील एखाद्या सद्गृहस्थानें या कवीसंबंधाची माहिती मिळवून ती प्रसिद्ध केली, तर सगळ्या महाराष्ट्रावर त्याचे मोठे उपकार होतील.

संबंधानें बरीचशी विश्वसनीय माहिती उपलब्ध होण्याचा संभव आहे; परंतु प्रवासाचें मुख्य साधन जें द्रव्य त्याच्या अभावीं, अशा प्रकारचा प्रयत्न करण्यास मी समर्थ झालों नाहीं, याबद्दल मला वाईट वाटतें. प्रस्तुत कवीनें आपल्या एकादशीमाहात्म्य ग्रंथाच्या शेवटीं, स्वतःसंबंधानें पुढील माहिती दिली आहे:—

ओव्या.

परशुराम क्षेत्र परम पावन । जेथें स्वयें नांदे रेणुकानंदन ।
तेथून पश्चिमेस योजनें तीन । गुहागर क्षेत्र विख्यात ॥ ९४ ॥
तेथींचा गणेश नामें द्विज । वेदशास्त्रनिपुण सतेज ।
आचारसंपन्न तेजःपुंज । गणकाख्य उपनाम कुळींचें ॥ ९५ ॥
तया गुहागर क्षेत्रानिकट । असगोल ग्राम असे धाकट ।
तेथिल पुरोहितपणा वरिष्ठ । वडिलोपार्जित जयाशीं ॥ ९६ ॥
त्या गणेश विप्राचा सुत । दामोदर नामें प्रख्यात ।
कृष्णदास नाम संत भक्त । बाहती दुसरें प्रीतीनें ॥ ९७ ॥
तो कृष्णदास कर जोडूनी । विनवी संतश्रोतयांलागुनी ।
व्रतसार ग्रंथ प्रीतीकरूनी । श्रवण करा अहर्निशीं ॥ ९८ ॥
याव्यतिरिक्त दुसरा ग्रंथ । रचिलासे परोपकारार्थ ।
बोधप्रकाश गाथा प्राकृत । चतुर सज्जनीं विलोकिजे ॥ ९९ ॥
आणिक यापूर्वी अनेक । नानाविध चरित्रें रसिक ।
आर्या साल्या पदें श्लोक । दिव्या छंदादि रचिलेंसे ॥ १०० ॥

या ओव्यांवरून, ‘ व्रतसार एकादशीमाहात्म्य ’ या ग्रंथाशिवाय ‘ बोधप्रकाश ’ नामक प्राकृत गाथा व श्लोक, आर्या, इत्यादि छंदांत रचिलेलीं कांहीं आख्यानें, इतके ग्रंथ या कवीनें लिहिले असें सिद्ध होतें. यांपैकीं, ‘ एकादशीमाहात्म्य ’ हा ग्रंथ शके १७८७ या वर्षीं हरी बापू जोशी यांनीं मुंबईंत शिळाछापावर छापून प्रसिद्ध केला आहे. ग्रंथाच्या शेवटीं, ‘ केळकरोपनाम्नावें पांडु-रंगस्यसूनुना भट्ट नारायणाख्येन लिखितं ’ असा लेखकानें आपला

उल्लेख केला आहे; व यावरून प्रस्तुत कवि, सदर लेखकाप्रमाणेंच जातीनें कोंकणस्थ ब्राह्मण असावा असा तर्क होतो. उपर्युक्त-कथासंग्रह भाग २ व कीर्तनतरंगिणी भाग १ ला या ग्रंथांत प्रस्तुत कवीचीं पुढील प्रकरणें प्रसिद्ध झालीं आहेत.—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मयूरध्वजाख्यान | पद्यसंख्या | ७६ |
| २ | सिंहध्वजाख्यान | ,, | ८४ |
| ३ | उषास्वयंवर | ,, | ४४ |
| ४ | बभ्रुवाहनाख्यान | ,, | ९८ |
| ५ | चंद्रहासाख्यान | ,, | ६६ |
| ६ | सुधन्वाख्यान | ,, | २४ |
| ७ | भानुदासचरित्र | ,, | ८९ |
| ८ | वत्सलास्वयंवर | ,, | ९८ |
| ९ | सेनान्हावीचरित्र | ,, | ९४ |
| १० | कमालचरित्र | ,, | ५१ |
| ११ | मायाचरित्र | ,, | ४८ |
| १२ | हरिश्चंद्राख्यान | ,, | १८० |
| १३ | मार्कंडेयाख्यान | ,, | ९५ |
| १४ | गोमाईचरित्र | ,, | ५२ |
| १५ | मुरलीचरित्र | ,, | ५८ |
| १६ | गरुडगर्वपरिहरण | ,, | |
| १७ | भीमभक्ति | ,, | |
| १८ | भद्रायुचरित्र | ,, | |

'बोधप्रकाश' हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला नाहीं; तो व इतर कांहीं अप्रसिद्ध कविता प्रस्तुत कवीच्या वंशजांपाशीं मिळण्याचा संभव आहे.

ह्या कवीचें मूळ नांव ' दामोदर ' असतां लोक त्यास ' कृष्णदास ' म्हणत असत, यावरून तो श्रीकृष्णाचा प्रेमळ भक्त होता, असें वाटतें. या कवीनें लिहिलेला कीर्तनतरंगिणीचा पहिला भाग व वरील यादींतील त्याचीं आख्यानें पाहिलीं, म्हणजे हा दामोदर कृष्णदास त्या काळीं एक नामांकित हरिदास असला पाहिजे, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. वर ज्या १८ प्रकरणांची यादी दिली आहे, तीं विशेषतः हरिदास लोकांच्याच उपयोगी पडावीं, अशा पद्धतीनें रचिलेलीं दिसतात. तीं रचतांना आर्या, श्लोक, ओंव्या, पदें, हिंदुस्थानी साक्या, दिंडया, कडवीं इत्यादि अनेक वृत्तांचा कवीनें उपयोग केला आहे; व ' एक समैं श्रीविधिसुत नारद ' इत्यादि शद्बांनीं प्रारंभित होणारीं या कवीचीं आख्यानें हरिदास लोक सांगूं लागले, म्हणजे संगीतास लुब्ध झालेला श्रोतृसमुदाय आनंदानें कसा डोलूं लागतो, याचा अनुभव पुष्कळ वाचकांस आलाच असेल. या कवीस संस्कृत, मराठी व हिंदी या तीन भाषांचें चांगलें ज्ञान होतें असें त्याच्या कवितेवरून दिसतें; तथापि काव्य या दृष्टीनें पाहिल्यास त्याची कविता मध्यम प्रतीची आहे, असें स्पष्ट म्हणावें लागतें. त्याचा ' एकादशीमाहात्म्य ' हा ग्रंथ १५ अध्यायांचा असून त्याच्या ओंव्या ९३०७ आहेत. आतां दामोदर कृष्णदासाच्या कवितेंतील कांहीं वेंचे येथें देतों.

रुक्मांगद राजाच्या उपवनाचें पुढील वर्णन पहा:—

ओंव्या.

तीन योजनें लांब विस्तीर्ण । तशा चारी बाजू समसमान ।
त्यांत सुवासयुक्त पूर्ण । अनेक तरु लाविले ॥ ४६ ॥
कडेनें वृक्षांचिया हारी । लाविल्या असंख्य नानापरी ।
न्यग्रोध शमी अशोक पिंपरी । कदंब बिल्व अश्वत्थ ॥ ४७ ॥
कपित्थ जंबु औदुंबर । पलाश चिंचिणी देवदार ।
कृष्णागर आणि मलयागर । चंदन श्वेत रक्तादि ॥ ४८ ॥

नागचंपक हेमपंचक । पुन्नाग आमलकी पारिजातक ।
बकुल कांचन सुवासिक । हारोहारीं लाविले ॥ ४९ ॥
त्यांवरी अनेक वल्ली जाण । वेष्टित दिसती शोभायमान ।
रुद्राक्ष गुंज गरुत्मान । कापूरवेली साजिऱ्या ॥ ५० ॥
दाळिंबी बहुबीज सीताफळी । रामफळी आणि रायकर्दळी ।
पूगी खर्जुरी पनस नारळी । कर्पूरकेळी रातांबिया ॥ ५१ ॥
निंबोण्या खिरण्या द्रुम अंजीर । सफळेंशीं डोलती मनोहर ।
द्राक्षांमंडप अतिसुंदर । ठाईं ठाईं विराजती ॥ ५२ ॥
ऐसा भोंवता परीघ देखा । मधीं लाविली पुष्पवाटिका ।
तेणें सुवासें अलोलिका । कोंदलें अंबर अहर्निशीं ॥ ५३ ॥
जाई जुई चमेली मालती । श्वेत पीत सहस्रकळी शेवती ।
बटमोगरे तगर केतकी । कोरांटी पीत कृष्ण पैं ॥ ५४ ॥
कुंकुम केसरी पीत आरक्त । धत्तूर द्रुम श्वेत आरक्त ।
करवीर अनंत विष्णुकांत । गुलचनी रक्त मधुमालती ॥ ५५ ॥
दवण शेवती मदनबाण । नवाळी शतपत्र गोकर्ण ।
कल्हार पाटलाब्ज कंचन । श्वेत आरक्त सुवासी ॥ ५६ ॥
सोनटके भूमिचंपक । दवणा पाच सुवासिक ।
आणि तुळशीचीं बनें अनेक । स्थळोस्थळीं विराजती ॥ ५७ ॥
ऐशी पुष्पवाटिका सुंदर । लाविली अत्यंत मनोहर ।
त्या सुवासेंकरून अपार । कोंदलें अंबर अहर्निशीं ॥ ५८ ॥
जेथें वसंत ऋतु परम प्रीति । राहिला सदा घ्यावया विश्रांति ।
उष्णकाळ की शीत काळ हे चित्ता । पडे भ्रांति त्या ठायां ॥ ५९ ॥
जळमंदिरें शोभती बहुत । स्थळोस्थळीं कारंजीं उडत ।
देखतां पाहणाराचें चित्त । रमलें जाय अतिशयें ॥ ६० ॥
ठाईं ठाईं तडाग विशाळ । शोभती सागरातुल्य सखोल ।
माजी पद्मे आणि कुमुदें विपुळ । नानावर्णी विराजती ॥ ६१ ॥
महानदीस रखे प्रचंड । अक्षयी पाट वाहती उदंड ।
प्रतिवृक्षातळीं तोय अखंड । नमानुरूप लाविलें ॥ ६२ ॥

वापी कूप ठाईं ठाईं । शोभती विस्तीर्ण सुंदर पाहीं ।
वरी जळयंत्रें सर्वदाही । आपोआप फिरती कळेनें ॥ ६३ ॥
स्थळोस्थळीं विष्णुमंदिरें । विराजित दिसती येकसरें ।
अनेक दामोदऱ्या गोपुरें । झळकती परम साजिरीं ॥ ६४ ॥

एकादशीमाहात्म्य, अ. ३०

रुक्मांगद राजा मोठा विष्णुभक्त होता; त्याच्या भक्तीनें प्रसन्न होऊन श्रीविष्णु त्यास आपलें इंद्रपद देईल कीं काय, अशी भीति इंद्रास पडली; त्यासंबंधानें कवि म्हणतातः—

ओव्या.

'जेसें बहुवित्त असतां गांठीं । तों परकी मनुष्य देखिलें दृष्टी ।
कपट नसतां तयाचे पोटीं । तरि धनिक उगाचि भीतसे ॥ ७० ॥
कां लावण्यरूप तरुण योषिता । परपुरुष तिशीं भाषण करितां ।
पापमति तया चित्तीं नसतां । तरी संशयीं भर्ता व्यर्थ पडे ॥ ७१ ॥
तेंवी विष्णुप्रीति व्हावयाकारणें । रुक्मांगद निष्कामबुद्धीनें ।
अर्पितां प्रतिदिनीं सुमनें । पावला शक्र भय वायां ॥ ७२ ॥
जे विष्णुभक्त प्रेमळ भाविक । सत्क्रियावान आणि सात्त्विक ।
सत्यसंध नामधारक । नैष्ठिक मति जयांची ॥ ७३ ॥
ऐसे कृष्णभजनीं रत अखंड । ते मोक्षाचीही न धरिती चाड ।
तेथें इंद्रपदाचा पाड । कैसेनी गणिती सांग पां ? ॥ ७४ ॥
जो क्षीराब्धितटीं रात्रंदिवस । तो तक्राची काय करील आस ? ।
कीं जो नित्य सेवी सुधारस । कांजी तयास नावडे ॥ ७५ ॥
ज्याचे घरीं कामदुहा गाय । तो अजा प्रतिपाळील काय ? ।
जेणें गभस्तीचा केला आश्रय । तो दीपइच्छा करीना ॥ ७६ ॥
ज्यासी प्रसन्न अब्धितनया । तो आगांतुकी करील कासया ।
ज्याची पद्मिनीतुल्य स्वजाया । तो प्रेत काय आलिंगी ? ॥ ७७ ॥
तेंवि विष्णुभजनीं जे रंगले । भाविक प्रेमळ सत्त्वागळे ।
ते तुच्छ मानिती मोक्षसोहळे । तेथें कोण पुसे शक्रपदा ? ॥ ७८ ॥

किती.

गंधर्वांच्या उपदेशावरून राजा रुक्मांगद एकादशीव्रत आचरूं लागला; त्यामुळें मृत्युलोकींचे सगळे प्राणी विष्णुलोकास जाऊं लागले. हा प्रकार पाहून यमास मोठी चिंता उत्पन्न झाली व रुक्मांगद राजास एकादशीव्रताचरणापासून कसें परावृत्त करावें, या विचारांत तो पडला. इतक्यांत नारदमुनींची स्वारी त्या ठिकाणीं प्राप्त झाली; त्या वेळीं त्या दोघांचा जो संवाद झाला, तो फार मनोरंजक आहे.

ओव्या.

'म्हणे ' आजी वैवस्वता । स्वस्थता न दिसे तुझ्या चित्ता ।
आणि मुखश्री म्लान तत्त्वता । जाली कोणत्या कारणें ? ॥ ४१ ॥
ऐशी ऐकोन मुनींची वाणी । येरू बोले जोडूनि पाणी ।
म्हणे ' माझिया लोकातें कोणी । पातकी प्राणी न येती ॥ ४२ ॥
याचें कारण म्हणशी काय । तरि तेंही सांगतों सत्य पाहीं ।
कोणी मृत्युलोकाचिये ठाया । पुण्यात्मा नृप वसतसे ॥ ४३ ॥
रुक्मांगद तयाचें नाम । सात्विक आणि नैष्ठिक परम ।
महाप्रतापी सार्वभौम । विष्णुभक्त निस्सीम जाण पैं ॥ ४४ ॥
तो सर्वपापक्षयकारक । ऐसें एकादशी व्रत अलोलिक ।
स्वकीयांसह प्रीतिपूर्वक । अखंड करीतसे ॥ ४५ ॥
आणि महीवरील अवघे जन । आबालवृद्ध सकळ वर्ण ।
निजसत्तेनें तयांकडून । हरिदिन व्रत करवीतसे ॥ ४६ ॥
त्या पुण्यप्रभावेंकरून । पूर्वजांसह लोक संपूर्ण ।
माझ्या नगरीतें त्यजून । जाते जाले वैकुंठा ॥ ४७ ॥
ज्यांचे पूर्वज पडले नरकीं । त्यांहीं व्रत करितां मृत्युलोकीं ।
ते नरक त्यागूनि एकाएकीं । जाते जाले वैकुंठा ॥ ४८ ॥
जेंवी उदक घालितां वृक्षामुळीं । तें शाखांस पोंचोन तात्काळीं ।
तेणें जीवन होऊन सकळीं । पावती जाण वृद्धीतें ॥ ४९ ॥
का उदरीं पोंचतांचि अन्न । सकळ इंद्रियें तेणेंकरून ।
म्लानत्वविरहित होऊन । होती पुष्ट तात्काळ ॥ ५० ॥

की लोहदंडाप्रीं परिस लागतां । सकळ हेमरूप होय तत्त्वता ।
तेंवि एकें हरिदिनी व्रत करितां । पूर्वज अनेक उद्धरती ॥ ५१ ॥
ऐसे होतां कितेक दिवस । सकळ नरक पडिले ओस ।
आणि एकही प्राणी यमपुरीस । नये प्रस्तुत मुनींद्रा ! ॥ ५२ ॥
आतां मीं काय करावें ? । कोणाशी हें दुःख सांगावें ? ।
अथवा कोठें निघोन जावें । केंवी बसावें निरुद्योगी ? ॥ ५३ ॥
ऐसा अंतरीं विचार करित । अहोरात्र चिंताक्रांत ।
निरुद्योगी उगाच निश्चित । स्वस्थ बैसता जाहलों" ॥ ५४ ॥
ऐसा वृत्तांत विस्मयकारक । ऐकोनि तोषला मुनिनायक ।
म्हणे " जेणें होय करमणूक । तैसेंचि विंदान करावें " ॥ ५५ ॥
यापरी विचार आणुनी मनीं । कृतांतास म्हणे नारदमुनी ।
ऐसें वाटे मजलागुनी । कीं ज्ञान तुजसी असेना ॥ ५६ ॥
तूं चिंताक्रांत आपुले जागीं । म्हणशी बैसलों निरुद्योगी ।
तरी महापराक्रम असोनि अंगीं । उपाय तुजलागीं सुचेना ॥ ५७ ॥
रुक्मांगद तो मानव प्राकृत । त्यातें काय तूं भितोसि व्यर्थ ! ।
त्याचा पराक्रम अत्यद्भुत । मनुष्यांतचि वर्णावा ॥ ५८ ॥
तो तुजसमोर युद्धाशी । कैसा ठरेल, सांग मजशीं ।
जेवीं मृगेंद्रापुढें जंबुकाशीं । तग सर्वथा निघेना ॥ ५९ ॥
कीं कुंभोद्भवापुढें सागराचें । न चले बळ लेशही साचें ।
कीं गरुडासन्मुख पन्नगाचें । आयुष्य उरेल, घडेना ॥ ६० ॥

\+ \+ \+ \+ \+

तुझा प्रताप अति प्रचंड । क्षणें जिंकिशील ब्रह्मांड ।
तेथें रुक्मांगद मानव म्याड । काय पाड तयाचा ? ॥ ६२ ॥
ऐसें असतां दंडधरा ! । केंवि बैसशी स्वस्थ मंदिरा ।
तरी आतां शीघ्र करोनि त्वरा । जाय संगरा मृत्युलोकीं " ॥ ६३ ॥

**किस्ता, अध्याय ३१.**

यमाच्या विनंतीवरून ब्रह्मदेवांनीं रुक्मांगद राजाचें सत्त्वहरण करण्याकरितां मोहना नामक एक सुंदर स्त्री पाठविली. तिनें

राजास इतकें मोहित करून टाकलें कीं, तो तिच्या अर्ध्या वचनांत राहूं लागला. पुढें, एकादशीचा दिवस येतांच, त्या दिवशीं अन्न-ग्रहण करण्याचा राजास तिनें आग्रह केला. राजा व्रत मोडावयास तयार होईना. शेवटीं, आपल्या पुत्राचें शिर मोहनेस द्यावयास तो कबूल झाला, पण एकादशी व्रत मोडण्यास प्रवृत्त झाला नाहीं. मोहनेस दिलेल्या वचनांत गुंतून आपल्या सद्गुणी पुत्राचा वध करण्याचा प्रसंग आपण आपल्यावर ओढवून घेतला, या विचारानें राजा रुक्मांगद मूर्च्छित झाला! नंतर जो हृदयद्रावक प्रकार घडला, त्याचें वर्णन पहाः—

ओव्या.

नेणों काय कडकडोनी अंबर । पडलें अवचित अंगावर ।
तैसें नृपासि भासोनि अपार । दुःखें मूर्च्छित पडियेला ॥ ५० ॥
तदा हें वृत्त धर्मांगदाशी । कळतां गजबजोन मानसीं ।
धावोनि शीघ्र रायापाशीं । येता जाला त्या ठायीं ॥ ५१ ॥
तों पिता देखिला अचेतन । तेणें व्याकुळ झाला पूर्ण ।
मग धैर्य मोहिनीलागून । पुसत 'काय झालें वो!' ॥ ५२ ॥
येरी म्हणे 'आज एकादशी । मी उपवास करूं नेदीं तयासी ।
तेणें खेद पावोन चित्तासी । बैसला उगाचि न बोले' ॥ ५३ ॥
तेव्हां धर्मांगद म्हणे 'माते! । सोडून देईं दुराग्रहातें ।
आजी सेवन करितां अन्नातें । दुरितें असंख्य जोडती' ॥ ५४ ॥
तंव ते म्हणे 'मी सर्वथा । उपवास करूं न दें नृपनाथा' ।
ऐशा निग्रहातें पाहतां । दुःख पावला धर्मांगद ॥ ५५ ॥
मग निज मातेजवळी येऊन । कथिलें साकल्य वर्तमान ।
म्हणे त्वां मोहिनीस बोध करून । करावें सावध नृपासी ॥ ५६ ॥
मग ते पतिव्रता संध्यावळी । वेगें येऊन मोहिनीजवळी ।
लोटांगण लागोन चरणकमळीं । म्हणे 'ऐक साजणी! वचनातें ॥ ५७ ॥
आजि एकादशीचें उपोषण । करिती आबालवृद्ध संपूर्ण ।
आणि नृपास म्हणसी 'सेवीं अन्न । तरी दोषा कारण त्वां होशी ॥५८॥

यास्तव आग्रह सोडूनी समग्र । रायाचें समाधान करीं सत्वर ।
मी तुज पसरोनी पदर । मागतें साचार दे हेंची' ॥ ५९ ॥
मोहिनी म्हणे ' बहुतांपरी । कथितां मी नायकेंच निर्धारीं ।
रायें मजशीं सत्योत्तरीं । भाष्यदान दिधलेंसे ॥ ६० ॥
' कीं त्वां जें सांगशी वचन । तसाचि सर्वकाळ वर्तेन ।
यांत अंतर जालिया देईन । शिर कापून पुत्राचें ' ॥ ६१ ॥
ऐशी मज प्रतिज्ञापूर्वक । रायें दिधली असे भाक ।
तरी हरिदिनी व्रत मोडावें एक । कीं द्यावें पुत्रमस्तक छेदुनी' ॥६२॥
यापरी मोहिनीची वाणी । संध्यावळीने श्रवण करूनी ।
चिंताग्रस्त दुःखित मनीं । होउनी व्याकुळ पैं जाली ॥ ६३ ॥
जेवि प्राणसंकट पाडसाशी । पडतां मृगी दुःखित मानसीं ।
कां गर्तेत पडतां देखोन वत्सासी । धेनु मोहें झळंबत ॥ ६४ ॥
कीं निजजनाचें देखोन संकट । कळवळे अंतरीं वैकुंठपीठ ।
तेंवी पुत्रप्राणासी विघ्न अचाट । ऐकतां दुःखित संध्यावळी ॥ ६५ ॥
मग मोहिनीच्या लागून चरणीं । म्हणे ' पुत्रदान देई मजलागुनी ।
याविरहीत तुझिया मनीं । असेल तेंचि मागें कां ॥ ६६ ॥
माझा एकुलता एक कुमर । जो वंशसदनाचा स्तंभ थोर ।
तरी तुवां घेउनी भाष्यकुठार । न पाडावाच छेदुनी ॥ ६७ ॥
कीं पुत्र माझी आंधळीची काठी । न न्यावी हिरोन उठाउठी ।
कीं ते मज कृपणाची धनगांठी । न अभिलाषावी सर्वथा ॥ ६८ ॥
कीं तें मज दुर्बळीचें अन्नपात्र । न ओढावें पुढोनि त्वरित ।
कीं पुत्र माझा प्राणचि निश्चित । नाकळावा भाष्यपाशें ॥ ६९ ॥
तुजशीं काकुळती येउन । मागतें पदर पसरोन ।
न वधीं माझें बाळ सगुण । निष्ठुर मानसीं होउनी ॥ ७० ॥
याचे पालटा जें मागशी । तें देईन निश्चयें तुजशी ।
तरी मम तान्हयाचे जिवाशी । न इच्छीं घात सर्वथा ' ॥ ७१ ॥
ऐसें बोलोन तिच्या चरणीं । लोळण घातली तये क्षणीं ।
तथापि तियेच्या अंतःकरणीं । कळवळा नुपजे दयेचा ॥ ७२ ॥

सिकता शिजविली बहुकाळ । तथापि ते न होय मवाळ ।
तेवि मोहिनीचें चित्त दयाळ । न होय जाण सर्वथा ॥ ७३ ॥
कीं वंध्या धेनुसी उत्तम चारा । घालितां न फुटेचि दुग्धधारा ।
तेंवि मोहिनीचे हृदयांतरा । नये ओलावा दयेचा ॥ ७४ ॥
असो, तेव्हां ते संध्यावळी । अश्रु ढाळित नेत्रकमळीं ।
पडोनि थोर चिंतानळीं । पुत्राजवळी पातली ॥ ७५ ॥
म्हणे पुत्रराया ! वचन ऐक । वोढवलें संकट दुस्तर देख ।
मोहिनीनें महादुःखदायक । अनर्थ थोर मांडिला ॥ ७६ ॥"

× × × ×

तेव्हां धर्मांगदें तियेतें । संबोखोनि निज हस्तें ।
म्हणे कां दुःख मानुनी चित्तातें । करिशी शोकातें व्यर्थचि ॥ ७७ ॥
जाईल तरि जावा प्राण । परी करावें सत्त्वरक्षण ।
हा नाशवंत नरदेह जाण । काय उपयोग ययाचा ? ॥ ७८ ॥
आज अथवा उद्यां साचार । कधीं तरी निश्चयें जाणार ।
तरी सत्त्व रक्षोनी सत्वर । द्यावें शिर मोहिनीतें ॥ ७९ ॥

**किता, अध्याय ३२.**

याच्या पुढील कथाभागही फार मनोवेधक आहे, परंतु विस्तार-भयास्तव त्याचा समावेश येथें करितां येत नाहीं. कृष्णदास कवीच्या श्लोकबद्ध प्रकरणापेक्षां, त्याचा ओवीबद्ध 'एकादशी-माहात्म्य' हा ग्रंथ अधिक सरस आहे व तो वाचकांनीं एकवार अवश्य वाचावा.

बळरामाची कन्या वत्सला ही अभिमन्यूस देण्याचा ठराव झाला होता; परंतु बळरामाचा ओढा कौरवांकडे असल्यामुळें, त्यानें दुर्योधनपुत्र लक्ष्मण यास वत्सला देण्याची योजना केली. पांडव वनवासांत आहेत, अशा वेळीं लक्ष्मणाचें लग्न उरकून घ्यावें, या हेतूनें दुर्योधन आपल्या परिवारासह द्वारकेंत जाण्यास निघाला. त्यावेळच्या त्याच्या थाटाचें वर्णन कृष्णदासांनीं केलें आहे:—

## कटाव.

कौरवेंद्र दुर्योधन राजा, निघता झाला विवाहकाजा, ज्याचा महिवर थोर अगाजा, संगें चालति असंख्य फौजा, अग्रीं धावति भाट रथाचे दाट गजाचे थवे मागुनी किंकाट तयाचे शब्द ऊठती अचाट उष्ट्रं मागें त्याचे, वाट दिसेना ऐसी दाटी, कोतवाल हय त्याचे पाठीं, थै थै नाचति वाटोवाटीं, तयामागुनी स्वार कचाटी, वाजि तकाटित गाजी धावति, आजि चला हो हाजी म्हणती, डंका नौबति मागुनि येती, ढोल तुताऱ्या अमित वाजती, चौघडे बाजे अनेक गर्जती, ताशे मर्फे मृदंगाचा किलकिलाट बहु वाजंत्रांचा नाद नभीं तो न माय त्याचा, त्याचेमागुन पायदळाचा थाट चालला वाट दिसेना, अचाट सेना पाय धसेना, भाट कीर्ति बोभाट करिती, दंडपाणि सन्मूख धांवता, नरयानांची नव्हेच गणती, चोपदार कनकदंड घेउनी, उदंड धावति मार्ग करोनी, प्रचंड गज हय मानव यानीं असंख्य कामिनि जात बसोनि । यापरी द्वारकेतें । पातले कौरवजन ते ॥ १ ॥

### वत्सलाहरण

सुभद्रा आणि अभिमन्यु रथांतून द्वारकेस जात असतां वाटेंत घटोत्कच आणि अभिमन्यु यांचें जें युद्ध झालें त्याचें वर्णन:—

## श्लोक.

विदूराची आज्ञा त्वरित मग घेवोनि निघती ।
पथीं जातां लागे वन विकट घोरांदर अती ॥
थवे शार्दूलांचे विचरति मृगेंद्रादिक महा ।
अशा आरण्यातें क्रमितिहि बळें निर्भय पहा ॥ १ ॥
वृक्षांची बहु दाटि मार्ग न चले तै दिव्य एका शरें ।
नाना वृक्ष समूळ ते उडवुनी केलें सुपंथा त्वरें ॥
फोडोनी नग मार्गणें सरळशा पंथे तदा चालती ।
तों त्या काननिं आसपीं अडविलें जातां त्वरीता गती ॥ २ ॥
येथें असे स्थान घटोत्कचाचें । सुरासुराहि भय फार ज्याचें ॥
विध्वंसिलें कानन पाहुनीयां । आले बहू राक्षस धांवुनीयां ॥ ३ ॥

अस्नप लोचनिं पाहति सुरथीं बाळक आणि स्त्रियेतें ।
म्हणती दैवें आमिष धाडुनि दिधलें भक्षण आमुतें ॥ ४ ॥
वदती त्यातें वन हें मूर्खा। विध्वंसीलें कायी ।
रक्षक आम्हीं घटोत्कचाचे मारूं तुज या ठायीं ॥ ५ ॥
असें ऐकतां अभिमन्यू तैं सुतीक्ष्ण सायक सोडी ।
सकळांचेही सव्य हस्त ते क्षणमात्रेंची तोडी ॥ ६ ॥
दशदिशा मयें पळति तेथुनी । पति घटोत्कचा कथिति येउनी ।
पातला महावीर तो अरी । घेउनी पळा प्राण सत्वरीं ॥ ७ ॥
हेडंबीचा सुत तैं परिसुनि वृत्तांत क्रुद्ध बहु झाला ।
दशकोटि कव्यादा घेउनि संगें तया स्थळीं आला ॥ ८ ॥
देउनि हाक भयंकर, म्हणत ' उभा प्राण वाचवीं, राहें ।
करिसी अर्भकचेष्टा, न सहे परि मज कदापि वीरा हें ' ॥ ९ ॥
ऐसें वाक्य ऐकोनि कृष्णभाचा । सिंहनादें गर्जुनी वदे वाचा ।
म्हणे 'आतां दुर्जना ! साहिं बाणा । क्षणें तुझ्या घेईन जाण प्राणा'॥१०॥
आला देखोन तीक्ष्ण शर । घाबरला बहु राक्षसेश्वर ।
मग अंबरीं उडोन वरचेवर । वर्षाव करी शिळांचा ॥ ११ ॥
त्याचें शरें पिष्ट करूनी । अभिमन्यें प्रेरिली गदा गगनीं ।
तेणें घटोत्कचा घेरी येउनी । महीवरी आपटला ॥ १२ ॥
मग शस्त्रास्त्रें युद्ध करिती । परी एकमेकां नाटोपती ।
अभिमन्यें सहा कोटि गणतीं । राक्षस क्षितीं पाडिले ॥ १३ ॥
किती एक ते बाणवातें उडाले ।
किती एक ते प्राणभाकें दडाले ॥
असें देखतां नाथ रात्रिंचरांचा ।
अति क्षोभुनी घात इच्छी तयाचा ॥ १४ ॥
गगनिं मग उडोनी टाकिली दिव्यशक्ती ।
क्षणहि न लगतांची आकळी प्राणशक्ती ॥
जननि सुत-अवस्था पाहुनी फार भ्याली ।
धरित हृदयिं वत्सा दुःखडोहीं बुडाली ॥ १५ ॥

रिपू गेला मारूनि बाळकातें ।
करी शोका काननीं सुभद्रा ते ॥
मुखावरी ठेवुनी वदनासी ।
म्हणे ' बाळा टाकुनी मज जाशी ॥ १६ ॥
करूं कैसी बा गत काय आतां ।
नूठतां तूं करिन रे प्राणघाता' ॥
वदुन ऐसें फोडि ती हंबरडे ।
बडवोनी वक्ष ते बहू रडे ॥ १७ ॥

यापरि विलाप करुनि सुभद्रा दुःखें रोदत भारी ।
कुलदेवीतें स्तवोनि प्रार्थी, अंबे ! दुःख निवारीं ॥ १८ ॥

पद ( बाळा जो जो रे० या चा० )

येई येई वो जगदंबे ! । माते विश्वकदंबे । ।
धांवुनि उडि घालीं अविलंबें । दीनाप्रति न विसंबें ॥ ध्रु० ॥
कौरवीं हारविलें राज्यासी । छळिलें द्रौपदीसी ।
दुःख भोगितसों वनवासी । नयनिं कैसें पहासी ॥ १ ॥
माझें बालक हें एकुलतें । वधिलें राक्षसिं यातें ।
आता करुं कायी, दुःखातें । निरसुन तारीं मातें ॥ २ ॥
तूं तंव दीनाची माऊली । जाशी वत्सा गाऊली ।
धावुन उचालत ये पाऊलीं । करिं करुणासाउली ॥ ३ ॥

किस्ता.



# श्रीकृष्ण जगन्नाथभट्ट बांद्कर.

श्लोक ( शिखरिणी )

यतोऽव्यक्तात्सर्वे गुरुलघुनृदेवादि निवहाः
प्रभूताः संभूता अजहरिहराः शक्तिवशगाः
ततोऽह सवाद्यं त्रिदशनुतपाद्यं खलजनै-
रनाद्याद्यं कृष्णं गुरुवरमनाद्यंतममलम् ॥ १ ॥

श्रीसद्गुरुमहिम्नस्तोत्रम.

आपली भाषा व आपला धर्म यांचा अभिमान व उन्नतीची इच्छा ज्यास नाहीं, असे लोक " मनुष्यरूपेण मृगाश्चरंति " याच कोटींतले होत. प्रत्येकास आपल्या भाषेचा व धर्माचा सर्वत्र विस्तार व्हावा, अशी महत्त्वाकांक्षा असतेच; परंतु, मनुष्य स्वतंत्र असला म्हणजे तो आपणास हवी असेल तशी आपली सुधारणा व उन्नति करून घेतो; व तोच परतंत्र झाला, आणि परक्यांच्या जुल-माचें जखखड जूं त्याच्या मानेवर पडलें, म्हणजे मग निरुपायास्तव परकी शिकवितील ती त्याची भाषा, परकी म्हणतील ती त्याची सुधारणा व परकी करूं देतील तेवढी त्याची उन्नति, असाच प्रकार व्हावयाचा. एका काळीं वैभवाच्या उच्च शिखरावर विहार करणाऱ्या या आमच्या भूमीस आजची ही करुणस्थिति प्राप्त होण्याचेंही हेंच मुख्य कारण होय.* आमचा गोमांतक प्रांत पोर्तु-गीज सरकारच्या हातांत जाऊन आज चार शतकांवर वर्षे झालीं. तितक्या अवधींत, आमच्या धर्माची, भाषेची व स्वातंत्र्याची जी

* प्रस्तुत लेख गोमांतकांतील एका लेखकानें लिहिला आहे, अर्थात् तेथील परिस्थितीस अनुलक्षून त्यानें हे उद्गार काढले आहेत, हें सांगावयास नकोच.—ग्रंथकर्ता.

भयंकर पायमल्ली झाली, तिचें वर्णन करणें अगदीं अशक्य आहे ! त्या राक्षसी जुलमाचें व सुलतानी कारकिर्दीचें वर्णन इतिहासांत वाचलें असतां प्रत्येक हिंदु म्हणविणाऱ्याच्या अंगावर रोमांच उठतील, यांत शंका नाहीं.

जिंकलेल्या लोकांस एखाद्या पाळीव जनावरापेक्षां जास्त स्वातंत्र्य न देण्याची कांहीं जेत्यांस नेहमी हौस असते; व याच कारणामुळें स्वाभिमानजनक व उन्नतिकारक असें शिक्षण न देतां, नेहमीं ते त्यांस अज्ञानस्थितींत ठेवीत असतात. गोवें प्रांतांतही वरील कारणास्तव सरकारानें लोकांस मराठी शिक्षण देण्याकडे साफ दुर्लक्ष्य केलें. सरकारचा आश्रय मुळींच नसल्यामुळें, लोकांच्या आश्रयावर उभारलेल्या ज्या कांहीं थोडया शाळा हात्या, त्याही हळुहळु नामशेष झाल्या; व मराठी भाषेसंबंधानें समाजांत पराकाष्ठेचें अज्ञान व्यापून राहिलें. अशा रीतीनें मराठी शिक्षण नसल्यामुळें लोकांस आमच्या पवित्र धर्मग्रंथांचें अवलोकन घडेनासें झालें; व त्यामुळें आमच्या आधुनिक व प्राचीन साधुसंतांची आणि कवींची त्यांस ओळख मिळणें दुरापास्त झालें आमचा सनातन धर्म म्हणजे काय व तो कशाबरोबर खातात याची कोणास ओळखही राहिली नाहीं व अशाच अनेक पिढ्या अशिक्षित राहिल्यामुळें, उत्तरोत्तर तें अज्ञान अधिकच बळावलें; आणि पुढें पुढें तर ज्या आमच्या पवित्रतम धर्मग्रंथांस सुधारणेच्या शेंड्यास पोंचलेल्या जर्मनी, अमेरिकेसारख्या राष्ट्रांतील निर्मत्सर विद्वानांनीं व तत्त्ववेत्त्यांनीं माना डोलविल्या, त्यांसंबंधानें आमचा अगदीं उलटा व विपरीत ग्रह झाला. येथील एका गर्भश्रीमंताची एक सखेदाश्चर्यजनक गोष्ट ऐकिवांत आहे, ती ऐकिली असतां, गेल्या पन्नास वर्षांपूर्वीचें गोमांतकांतील शिक्षण व धर्मश्रद्धा यांचें सहज अनुमान होण्यासारखें आहे. ती गोष्ट आम्हीं येथें देतों.

एकदां येथील एका कुलीन गर्भश्रीमंताचे घरीं एक गरीब ब्राह्मण कांहीं याचना करण्याकरितां आला. ब्राह्मण दुरून आला असल्यामुळें बराच थकून गेला होता; यास्तव त्या श्रीमंतानें त्यास एक तपेली देऊन आपल्या गोठ्यांत भात करून जेवण्यास सांगितलें. ब्राह्मण मोठा कर्मनिष्ठ व पवित्र आचरणाचा होता. भगवद्गीतेचा नित्य निदान एक अध्याय तरी वाचल्यावांचून तो अन्नग्रहण करीत नसे. ब्राह्मणानें भात चुलीवर ठेविला व संध्यावंदनादि करून भगवद्गीता वाचण्याकरितां बसला. ब्राह्मण भगवद्गीता वाचतो हें कळतांच यजमान रागानें धांवत धांवत गोठ्यांत आले व म्हणाले "अहो! आमच्या भरलेल्या घरांत ही गीता कां वाचतां? तुम्हांस वेडबीड तर लागलें नाहीं ना? कोणी आसन्नमरण असेल तर त्याच्या जवळ मात्र गीता वाचतात. बऱ्या बोलानें येथून निघून चला; नाहीं तर हांकून लावूं." अशी हीं श्रीमंतांचे तोंडचीं शब्दमौक्तिकें पाहून ब्राह्मणास काय वाटलें असेल, त्याची कल्पनाच केली पाहिजे! बिचारा ब्राह्मण तसाच उठून चंबूगवाळें घेऊन चालता झाला! श्रीमंत व कुलीन घराण्यांत जर अशिक्षितपणामुळें असें घनघोर अज्ञान भरलेलें होतें, तर मग सामान्य जनसमूहाची शोचनीय स्थिति काय वर्णन करावी!

दुःखामागून सुख या सृष्टिनियमानुसार अज्ञानाचाही काल मधून मधून येत असतो. आमच्या प्रांतांत सर्वत्र असें गडद अज्ञान पसरल्यावर भगवंतास आमची करुणा येऊनच कीं काय, वेदप्रतिपादित सनातन धर्माचा प्रसार करण्याकरितां भक्तिज्ञानसंपन्न महानुभाव श्रीकृष्ण भट्ट बांदकर यांचा अवतार झाला. त्यांचें संक्षिप्त चरित्र आम्ही येथें देतों.

गोव्याची राजधानी जें पणजी शहर, त्यापासून सुमारें तीन कोसांवर डोंगरी या नांवाचा एक लहान गांव आहे. हा गांव

लहानशा एका डोंगराच्या पायथ्यासभोंवतीं वलयाकार वसला असल्यामुळें, त्यास डोंगरी हें अन्वर्थक नांव प्राप्त झालें आहे. या गांवांत जगन्नाथ भटजी या नांवाचे अत्यंत सात्विक, कर्मनिष्ठ व पवित्र आचरणाचे एक ब्राह्मण रहात असत. ते रुक्मिणी—पांडुरंगाचे निःसीम भक्त होते. ते कीर्तन करीत तेव्हां विठ्ठलनामाच्या गजरांत देहभान विसरून जाऊन त्यांची पगडी देखील खालीं पडत असे. ते नित्य पांडुरंगाचें भजन करीत व त्या वेळीं त्यांच्या नेत्रांतून एक-सारख्या प्रेमाश्रूंच्या धारा चालत असत. भजन करितेवेळीं ते पांडुरंगास बसण्याकरितां म्हणून समोर एक पाट ठेवीत व त्यावर फुलें टाकित असत. आणि भजन समाप्त झाल्यावर पांडुरंगाचा प्रसाद म्हणून तीं फुलें लोकांस वांटून देत. असें सांगतात कीं, त्या वेळीं त्या फुलांचा नैसर्गिक गंध नाहींसा होऊन त्यांस बुक्याचा घमघमाट येत असे. ही गोष्ट प्रत्यक्ष पाहिलेली कांहीं वृद्ध मंडळी अजून डोंगरीवर आहे. जगन्नाथ भटजींस एका प्रसिद्ध ज्योतिष्यानें " तुमचा देह अमुक वर्षी अमुक तिथीस कोणत्याही एका पुण्यक्षेत्रीं पडेल " असें सांगितलें होतें. पुढें जगन्नाथ भटजी शके १७१७ विश्वावसु संवत्सरांत नवरात्राच्या सुमारास श्रीवेंकटगिरीवर यात्रेस जावयास सहकुटुंब निघाले. तेथें सहस्र ब्राह्मणभोजन घालण्याचा त्यांचा विचार होता; परंतु सांपत्तिक स्थिति तशी नसल्यामुळें त्यांनीं फक्त मानसिक ब्राह्मणभोजन घालण्याचा निश्चय केला व आश्विन शुा ५ दिवशीं प्रातःकाळीं स्नानसंध्या वगैरे करून ते पूर्वाभि-मुख ध्यानस्थ बसले. त्यांनीं आपल्या मनांतच स्वयंपाकसिद्धता करून पात्रें वाढिलीं व मानसिक ब्राह्मणांच्या अनेक पंक्ती अनेक खेपा जेवविल्या. प्रतिक्षणीं " घ्या ! गोविंदा ! " एवढाच काय तो ब्राह्मणांस भोजनसूचना देणारा त्यांचा शब्द लोकांस ऐकूं येत होता. बाकी त्यांचें सर्व मानसिकच चाललें होतें. शेवटीं, त्यांच्या

संकल्पाप्रमाणें सहस्र ब्राह्मणांचें भोजन झाल्यावर "पुंडलीकवरदा हरिविठ्ठल !" असें म्हणून एकदम त्या सत्पुरुषानें आपला पवित्र देह, पवित्र तिथीस, त्या अत्यंत पवित्र क्षेत्रीं ठेवून आपण निर्याण केलें ! हेच आमच्या प्रस्तुत चरित्रनायकाचे तीर्थरूप होत.

कांहीं अपवादक स्थळें वेगळीं केलीं असतां साधुसंतांचें जन्म नेहमीं पवित्र कुलांतच झालेलें आढळतें. "अथवा योगिनामेव कुले भवति धीमतां" या भगवदुक्तीप्रमाणें सज्जनास अवतार घेण्यास योग्याचेंच कुल पाहिजे असतें. शिवाय, ज्यांनीं प्रेमबळानें भगवंतास आपलासा करून घेतला आहे, त्या आपल्या हृदयरंजक भक्तोत्तमास भगवान् विषयलुब्ध व अपवित्र मातापितरांच्या उदरांत जन्म कसें देईल ? याचसाठीं श्रीकृष्ण भटजीमहाराजांस परमात्म्यानें जगन्नाथभटजींच्या पोटीं जन्म देऊन आपलें वचन व भक्तवात्सल्य स्पष्ट करून दाखविलें.

श्रीकृष्ण भटजीमहाराजांचें जन्म शके १७६६ क्रोधी संवत्सरांत आषाढ शु० ११ एकादशीच्या महापर्वणीस झालें. मागें सांगितल्याप्रमाणें वेंकटगिरीवर जेव्हां जगन्नाथ भटजींचें निर्याण झालें, त्यावेळीं भटजी महाराज तेथें होते तेव्हां त्यांचे वय अवघें पंधरा महिन्याचें होतें. तीर्थरूप निवर्तल्यावर भटजीमहाराजांचें लालनपालन त्यांचे चुलते मुकुंदभटजी हे करीत होते. "प्रसादचिन्हानि पुरःफलानि" या कविकुलगुरूक्तीप्रमाणें भटजीमहाराजांचें भावी प्रच्छन्नभाग्य लहानपणींच त्यांच्या खेळांतही दिसून येऊं लागलें. नारळीच्या पिंड्यास लहान लहान काठ्यांच्या खुंट्या लावून त्यांस काथ्याच्या दोऱ्या बांधाव्या आणि त्याचा तंबोऱ्याऐवजीं उपयोग करून इतर मुलांस जवळ बसवावें व आपण कीर्तन करावें, हाच त्यांचा लहानपणींचा आवडीचा खेळ होता ! "मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात" म्हणून म्हणतात तें खोटें नव्हे.

भटजीमहाराजांची बुद्धि उपजतच महातीव्र होती. त्यांचें मराठी शिक्षण अक्षरांची ओळख पटण्यापुरतेंच झालें होतें. डोंगरीवरील प्रसिद्ध विद्वान् गृहस्थ कै० हरिबाबा मुकुंडीकर यांचेजवळ त्यांनीं रूपावली व रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गाचे फक्त १४ श्लोक काव्यपद्धतीनें म्हटले होते. याशिवाय दुसरीकडे कोठेंही त्यांनीं कसलेंच अध्ययन केलें नाहीं; तरीही भागवतासारख्या दुर्बोध ग्रंथाचा ते सहज अर्थ लावीत असत, यावरून भटजीमहाराज हे खचित कोणीतरी योगभ्रष्ट सत्पुरुष होते असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. " तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदहिकं " या भगवदुक्तीप्रमाणें त्यांच्या तीव्र पूर्वसंस्कारांचा या जन्मांत उदय झाला, हेंच खरें नाहीं तर, संस्कृतासारख्या दुर्जेय भाषेंत कांहींच अध्ययन नसतां इतकी गति होणें अगदीं दुरापास्त आहे.

भटजीमहाराजांचा कुलपरंपरागत धंदा भिक्षुकीचा होता. त्यांचे चुलते मुकुंदभटजी हेही याज्ञिकीच करून कुटुंबाचा निर्वाह चालवीत होते. भटजीमहाराजांचा स्वभाव फार तेजस्वी असल्यामुळें, त्यांस परक्याच्या द्वारावर याचना करून पोटाची वीतभर खळगी भरण्याची ही याचकवृत्ति अगदीं आवडत नसे. पण, " पळत्यापाठीं ब्रह्मराक्षस " या न्यायानें भटजीमहाराज १८।१९ वर्षांचे असतां त्यांच्या चुलत्यांनीं आपली इहलोकची यात्रा संपविली; व कुटुंबपोषण अर्थातच भटजीमहाराजांवरच येऊन पडलें. त्यांस निर्वाहाचें दुसरें कहींच साधन नसल्यामुळें जरी भिक्षुकीचा कंटाळा येई, तरी मुकाट्यानें तीच कुळपरंपरागत वृत्ति स्वीकारून कुटुंबभरण करणें भाग झालें. आपल्या वृत्तीची त्यांस मनस्वी चिळस येत होती, हें त्यांच्याच कवितेंतील अनेक उक्तींवरून सिद्ध होतें. त्यांनीं स्वतः आपल्या हकीकतीचें एक पद केलें आहे, त्यांत त्यांचे " भिक्षुकें वृत्ती करितां आला मनिं कंटाळा " असे स्पष्ट उद्गार आहेत. अशा

रीतीनें त्रासून त्रासून पांच सहा वर्षें त्यांनीं कसेंबसें कुटुंबपोषण केलें. या जाचांतून देवानें आपणास सोडवावें म्हणून रात्रीच्या रात्री जागरण करून त्यांनीं ईश्वराचा धांवा करावा व मोठ्यानें भजन करून देवास आळवावें. तरीही त्रासांतून मोकळें होण्याचा कांहीं मार्ग दिसेना. जिचा मनापासून त्यांस तिरस्कार वाटत होता ती वृत्ति चालवून तरी निर्वाह होता तर बरें होतें. परंतु, तसें न होतां उपवास काढण्याचेही अनेक प्रसंग जेव्हां येऊं लागले, तेव्हां मात्र भटजीमहाराज फारच गांजून गेले व दारिद्र्य आणि मनस्ताप यांनीं त्यांस अगदीं वेडें करण्याच्या बेतांत आणिलें.

दुःखाचा अतिरेक झाल्यावांचून सुखाची खरी गोडी समजत नाहीं. उन्हांतून श्रमून आलेल्या तृषित पांथस्थास पाण्याची जी गोडी असते ती गोडी घरांत बसून असलेल्या सुखवस्तु गृहस्थास असणें शक्य नाहीं; तसेंच, अनेक संसारतापांनीं ज्यांचें हृदय पोळून गेलेलें असतें त्यांसच भगवत्स्वरूपसाक्षात्काराच्या शाश्वत सुखाची खरी किंमत कळून येते. समर्थांनीं दासबोधांत म्हटलें आहेः—

संसारदुःखें दुखवला, त्रिविधतापें पोळला ।
तोचि एक अधिकारी झाला, परमार्थासी ॥ १ ॥

भटजीमहाराजही अनेक प्रकारच्या संसारदुःखांनीं पोळून गेले असल्यामुळें परमार्थाचे खरे अधिकारी बनले होते, हें निराळें सांगण्याची गरज नाहीं.

गोमांतकांतील प्रसिद्ध देवस्थान श्रीक्षेत्र बांदिवडें येथें रा. रा. मण पै या नांवाचे एक परम सात्त्विक व अंतर्निष्ठ गृहस्थ राहत असत. ते भटजीमहाराजांचे प्रेमळ मित्र होते. एके दिवशीं भटजीमहाराज त्यांचे येथें गेले होते, तेव्हां रा. मण पै हे यथार्थदीपिका वाचित होते. त्यावेळीं "तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया" या श्लोका-

वरील पंडितांचें सुरस व्याख्यान रा. मण पै आपल्या रसाळ शब्दांनीं श्रोत्यांस समजावून देत होते. संतांचा महिमा असा अनिर्वचनीय आहे व त्यांस शरण गेलें असतां ते तत्काळ जीवांस भवबंधमुक्त करितात, हें ऐकतांच भटजीमहाराजांस फार आनंद झाला. वाचून संपल्यावर मण पैजवळ भटजीमहाराजांनीं मोठ्या उत्सुकतेनें प्रश्न केला कीं "असे जगदुद्धारक संत आज या जगतीतलावर आहेत काय?" मण पैनीं उत्तर दिलें "होय, पुष्कळ आहेत!" भटजींनीं विचारिलें "कोठें आहेत तें कृपा करून आम्हांस सांगा." त्यावर मण पै म्हणाले, "भवबंध नाहींसा करणारे दीनदयाळ संत सर्वत्र भरलेले आहेत. आम्हां विषयांधांस मात्र त्यांची परीक्षा होत नाहीं." हें ऐकून भटजींनीं लागलेंच मण पैचे चरण धरिले व म्हणाले, "असें आहे तर, आपणच कृपा करून मला भवबंधापासून मुक्त करण्याजोगें उपदेशामृत पाजा." त्यावर मण पै म्हणाले, "कृष्णभटजी! मीं तुम्हांस भवबंधविच्छेदक ज्ञानोपदेश केला असता; परंतु आपण विद्वान् व संस्कृतज्ञ आहां. आपल्या कांहीं शंका असल्यास, त्यांचें समाधान करण्याचें कदाचित् मला जड जाईल; व असें झालें म्हणजे सहजच माझ्यावरील श्रद्धा कमी पडेल. पंडितांनीं याविषयीं आपल्या यथार्थदीपिकेंत सांगितलें आहे.

शिष्यसंदेह न शके हरूं। तो अनुभवीही न म्हणवे गुरु।
कल्पिले पदार्थ नेदी तरु। तो कल्पतरु कैसा म्हणावा? ॥ १ ॥
म्हणोनि शास्त्रज्ञ आणि अनुभवी। साजे त्याला गुरुत्वपदवी।
तोचि जगद्गुरु गोसावी। कीं शास्त्रज्ञ आणि अनुभवी परिपक्व ॥ २ ॥

यास्तव, आपण तशाच प्रकारचे शास्त्रसंपन्न आणि अनुभवी सत्पुरुष पाहून त्यांस शरण जावें हें बरें आतां असा सत्पुरुष तुला पाहिजे तर वेंगुर्लें येथें विष्णुबुवा सोमण या नांवाचे एक प्रसिद्ध

व अनुभवसंपन्न रामदासी संत आहेत, त्यांस शरण जा, म्हणजे तुझा कार्यभाग होईल."

मग पैची ही अमृततुल्य वाणी ऐकून, भटजीमहाराजांचा आनंद गगनात मावेनासा झाला. ते तसेच उठून घरीं आले, व दुसऱ्याच दिवशीं म्हणजे शके १७९१ शुक्ल संवत्सर आषाढ व।। ७ शुक्रवारीं पहाटेस कोणास नकळत एकटेच वेंगुर्ल्यास जावयास निघाले. त्यावेळीं खुद्द त्यांची गृहिणी दोन दिवसांची बाळंतीण होती व घरांत एक दाणाही शिल्लक नव्हता. असें असून मागचा पुढचा कसलाच विचार न करितां भटजीमहाराजांची स्वारी एकदम बाहेर पडली.

मनुष्यास एकदां तीव्रतर विरक्ति झाल्यावर मग घरदार, बायकापोरें यांवरचा मोह पार उडून जाऊन त्यास, आपण केव्हां एकदां शाश्वतसुखसंपन्न होऊं, असें होऊन जातें. बायकापोरांचा मोह सोडणें हें आमच्यासारख्या प्राकृतांस जरी कठीण वाटतें तरी सत्पुरुषांस एका परमात्म्यापुढें त्याची कांहींच मातबरी दिसत नाहीं. समर्थ म्हणतातः—

> सांडुनि आपली संसार कांता । करीत जावी देवाची चिंता ।
> निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्याच सांगाव्या ॥ १ ॥
> देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ।
> सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेंचावा ॥ २ ॥

हरिभक्तीचें खरें लक्षण हेंच होय. प्रऱ्हादानें आपल्या बापाची आज्ञा मोडिली खरी, परंतु त्यानें भगवंताची प्राप्ति करून घेतली. ध्रुवानें आईबापांचा त्याग केला पण अचल असें परब्रह्मपद मिळविलें. भरतानें आपल्या आईचा उपमर्द केला परंतु परमात्मा श्रीरामाचे ठायीं अनन्यत्व संपादन केलें. समर्थ रामदासस्वामींनीं बंधु, आई व घरदार

यांचा त्याग केला, परंतु आपण कृतार्थ होऊन सर्व भरत—भूमीच्या लोकांस चिरकाल स्मरण राहील अशी अजरामर कीर्ति संपादिली. भटजी महाराजांनींही आपल्या प्रसूतपत्नींची उपेक्षा केली पण, निरतिशयानंदपरिपूर्ण अस परब्रह्मस्वरूप साध्य केलें. " देव जोडे तरी करावा अधर्म " असें तुकोबांचें म्हणणें आहे तें यासच अनुसरून होय.

आषाढ महिना, भरपावसाळ्याचे दिवस! बरोबर एक कागदाची फाटकी छत्री; भागवत. यथार्थदीपिका वगैरे दोनचार पुस्तकें पाटीस बांधलेलीं; अंगावर एकच पैरण व एक धोतर; अशा सामग्रीनें, भटजीमहाराजांची स्वारी पूर्वी कधीही न पाहिलेल्या अशा गांवांतून व रानांतून प्रवास करीत करीत जाऊं लागली. रात्र पडली कीं कोठेतरी एका गोठ्यांत निजावें, व सकाळ झाली कीं चालावें. अशा रीतीनें, पोटांत अन्नाचा लेश नसतांहि पावसांतून भिजत भिजत दोन दिवस प्रवास केला व तिसऱ्या दिवशीं वेंगुर्लें गांठिलें भटजीमहाराज घरांतून बाहेर निघून वेंगुर्ल्यास येईपर्यंत पावसानें एकसारखी वृष्टि चालविली होती, त्यामुळे, अंगावरील सर्व कपडे भिजून चिंब झालेले होते. क्षुधेमुळें पायांत अगदीं त्राण राहिलें नव्हतें. अशा स्थितींत हळु हळु चालत व बोवांचें घर विचारीत विचारीत भटजीमहाराज अगदीं नेमकेच आपल्या इष्टस्थळीं आले; परंतु, तेंच विष्णुबोवांचें निवासस्थान हें मात्र भटजी-महाराजांस ठाऊक नव्हतें. बाहेर ओटीवरच विष्णुबोवा पंचदशीचें पुस्तक घेऊन त्यावर व्याख्यान करीत होते व जवळ बरीच शिष्य-मंडळी श्रवणार्थ बसली होती. भटजीमहाराजानीं खुद्द बोवांस हाक मारून त्यांकडे " विष्णु बोवा सोमण म्हणतात त्यांचें घर कोठें आहे ? " असा प्रश्न केला. ते म्हणाले " कां ? त्यांच्याकडे आपलें काय काम आहे ? " भटजी महाराज आधींच प्रवासामुळें थकून

गेले होते. त्यांत, त्यांच्या सरळ प्रश्नास हें विचित्र उत्तर ऐकून त्यांस फार वाईट वाटलें व ते पुनः म्हणाले, "महाराज ! ते कोठें राहतात तेवढें मला कृपाकरून सांगा. मला त्यांचेकडे थोडें नाजूक काम आहे." हें ऐकून बोवांच्या शिष्यमंडळींस भटजीमहाराजांची करुणा आली व ते त्यांस म्हणाले, "अहो ! ज्यांचेजवळ आपण बोलत आहां तेच आपले उद्दिष्ट गृहस्थ होत व हाच त्यांचा आश्रम आहे." हें ऐकून, ज्यांचेकरितां आपण इतके त्रास सोसून आलों ते सद्गुरु आपणास भेटले म्हणून भटजीमहाराजांस जो आनंद झाला त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.

त्या आनंदातिरेकासरसा पावसाचें पाणी खळखळां वाहत असलेल्या त्या आंगणांतच त्यांनीं बोवांस दीर्घदंड नमस्कार घातला. हस्तादिकांचा आश्रय सुटतांच जसा एकादा अचेतन दंड एकदम खालीं पडतो, तसें भटजीमहाराजांनीं निरभिमानत्वानें सद्गुरूंस लोटांगण घातलें. अशा प्रणिपाताचें वर्णन वामन पंडित आपल्या यथार्थदीपिकेंत करितातः—

शरणागतीचें लक्षण । प्रथम हें कीं आपण ।
काहीं नेणे टोणपा अविचक्षण । सर्वज्ञ तूं मज उद्धारीं ॥ १ ॥
या भावें प्रणिपात । करावा प्रकर्षें शरीराचा निपात ।
तो दंडवत्‌ कीं अकस्मात्‌ । पडे जैसा टोणपा ॥ २ ॥
तो टोणपा ढकलितां पडों जाणे । परी पडला उठों नेणे ।
कीं मस्तकीं पद्महस्त बाणे । उठे प्रभावें तयाच्या ॥ ३ ॥
अचेतन दंड पडला । तो टोणपा सचेतनें उचलिला ।
तैसा जडात्मत्व जाणणार याला । उचलो कोण चिदात्मत्वें त्यावांचुनी ॥ ४ ॥

भटजीमहाराजांनीं असें पावसांतच लोटांगण घातलेलें पाहून विष्णुबुवांस परमाश्चर्य वाटलें. हा कोणीतरी परमविरक्त व संसारतप्त गृहस्थ असावा अशी बोवांची खात्री झाली. बोवांनी बराच वेळ वाट

पाहिली. पण, भटजी कांहीं उठेनात! तो त्यांचा दृढ निश्चय पाहून स्वतः विष्णुबोवांनीं पावसांतच जाऊन त्यांस उठविलें व घरांत घेऊन आले. भटजीमहाराजांचें सर्व वृत्त समजून घेतल्यावर बोवांस अत्यंत हर्ष झाला. कारणः—

सद्गुरूवीण सच्छिष्य । तो वांयां जाय निःशेष ।
का सच्छिष्येंवीण विशेष । सद्गुरु शिणे ॥ १ ॥
उत्तम भूमी शोधिली शुद्ध । तेथें बीज पेरिलें कीडखाद ।
कां तें उत्तम बीज परी संबंध । खडकेसीं पडला ॥ २ ॥
× × × ×
तैसें एकावीण एक । होतसे निरर्थक ।
परलोकींचें जें सार्थक । तें दुरी दुरावे ॥ ३ ॥
म्हणोनि सद्गुरु आणि सच्छिष्य । तेथें न लगती सायास ।
त्या उभयताचा इव्यास । पुरे एकसरां ॥ ४ ॥

सच्छिष्यास जशी सद्गुरूची, तशीच सद्गुरूस सच्छिष्याची फार गरज लागते. हें श्रीसमर्थांच्या वरील वचनावरून स्पष्ट दिसत आहे. असा अधिकारी शिष्य देवानें आपणास दिला, हें पाहून विष्णुबोवांसही परमानंद झाला व दुसऱ्याच दिवशीं त्यांनीं भटजी-महाराजांस महावाक्योपदेश केला. सद्गुरूनीं जें काय त्यांस सांगितलें तें त्यांनीं आपल्या "स्वात्मतत्त्वामृतशतक" नांवाच्या ग्रंथांत मुमुक्षुजनांच्या हितार्थ श्लोकबद्ध करून ठेविलें आहे. हा ग्रंथ प्रत्येक मुमुक्षूनें वाचण्याजोगा आहे.

विष्णुबोवांनीं याप्रमाणें भटजीमहाराजांवर अनुग्रह करून त्यांस प्रपंचव्यवहार दक्षपणानें चालविण्याविषयीं बराच उपदेश केला व श्रीसीतारामचंद्राची प्रतिमा पुजून तिचा सांप्रदायाप्रमाणें नित्य भजनपूजनविधि करण्यास सांगून, त्यांस घरीं जाण्यास आज्ञा दिली. भटजीमहाराजांची घरीं जाण्याची मुळींच इच्छा

नव्हती. परंतु घराकडून त्यांच्या शोधार्थ दोन तीन मंडळी आली होती, त्यांनीं विष्णुबोवांस विनंति केल्यावरून बोवांनीं भटजींस घरीं जाण्याविषयीं आग्रह केला; त्यामळें, निरुपाय होऊन ते परत घरीं आले.

गोमान्तकांतील बोरी या नांवाच्या गांवांत सांवळा म्हणून एक अत्यंत हुशार कारागीर आहे. त्यास भटजीमहाराजांनीं गुर्वाज्ञेप्रमाणें श्रीसीतारामाची लांकडी प्रतिमा करण्यास सांगितलें. तो एके दिवशीं श्रीसिद्धनाथ पर्वतावर कांहीं कामाकरितां जात असतां, वाटेंत त्याच्या मनांत अकस्मात् असा विचार आला कीं, भटजींनीं लांकडी प्रतिमा सांगितली आहे खरी, पण आपण त्यांस काळ्या पाषाणाचीच प्रतिमा करून द्यावी. असा संकल्प करून तो आपल्या कामास गेला. परत येतांना, ज्या ठिकाणीं पूर्वी त्याच्या मनांत प्रतिमा पाषाणाची करावी असा विचार आला होता, त्याच जागी पोंचल्यावर, पुन. तोच विचार त्याच्या मनांत आला व तो तसाच पुढे चालून जाऊं लागला. तो त्या जागेपासून पांच दहा हात पुढे गेला तोच त्याचे पाय आंखुडल्यासारखें त्यास वाटूं लागले. खालीं पायांकडे पाहिलें तेव्हां पाय बरेच सुजल्यासारखे दिसूं लागले! तरीही तो तसाच आणखी दहावीस हात पुढें गेला. तो जितका जितका पुढें गेला, तितकी तितकी त्याच्या पायास जास्त कळ लागूं लागली व पाय तर फुगून खांबासारखे झाले!! शेवटीं, जेव्हां पायच पुढें टाकता येईना, तेव्हां तो मागें फिरला. मागें फिरतांच कळ थोडी हलकी झाली व तसाच परत मूळच्या जागेवर येईतोंपर्यंत क्रमाक्रमानें ठणका कमी होत जाऊन कळा अगदीं बंद झाल्या व पाय पूर्ववत् झाले! हा काय चमत्कार असावा, याचा त्यास कांहींच अजमास होईना. त्यानें चोहोकडे न्याहाळून पाहिलें, तों जवळच एक लहानसा काळा

पाषाण पडलेला त्याला दिसला. तो कारागीर मोठा धूर्त होता. त्यानें मनांत असा विचार केला कीं, ज्या अर्थी एकाएकीं याच स्थानीं आपणास पाषाणाची प्रतिमा करण्याची स्फूर्ति झाली व त्याच प्रतिमेजोगी शिलाही येथें आहे, त्याअर्थी, याच शिलेची ती प्रतिमा करण्यासंबंधानें ही मला श्रीरामाची सूचनाच झाली असावी व त्या सूचनेचा अनादर करून मी पुढें गेलों म्हणून मला हा प्रतिबंध झाला असेल. असा विचार करून त्यानें ती शिला आपले बरोबर घेतली व मग निर्विघ्नपणें घरीं आला. दुसऱ्या दिवशीं दुपारीं जेव्हां त्यानें त्या मूर्तीच्या कामास आरंभ केला तेव्हां, बरोबर बारांची तोफ झाली. ती रामजन्मकालसूचक तोफ ऐकून त्या कारागिरास तो शुभशकुनच वाटला व त्यानें मोठ्या उत्साहानें व काळजी-पूर्वक ती सीतारामाची प्रतिमा तयार केली. ती प्रतिमा, त्यानें भटजीमहाराजांकडे देऊन त्यांस घडलेलें सर्व वर्तमान निवेदन केलें. तें ऐकून भटजीमहाराजांस परमानंद झाला. तीच प्रतिमा प्रस्तुत डोंगरी येथील श्रीराममंदिरांत उच्चासनावर विराजमान असून सकल सद्भक्ताचे मनोरथ पूर्ण करीत आहे. त्या प्रतिमेच्या साक्षात्काराच्या अनेक गोष्टी आम्हांस ठाऊक आहेत त्या सर्व स्थलसंकोचास्तव येथें देतां येत नाहींत. यासाठी त्यांपैकीं एकच महत्त्वाची गोष्ट खाली देतों-

भटजीमहाराजांच्या घरांत त्यांचीच एक चुलतसासू आहे. तिला सर्व डोंगरीवरील लोक "आजीबाई" म्हणतात. ही स्वभावानें श्रद्धाळू व देवभोळी आहे. तिची म्हाडदोळ येथील श्रीमहालसेवर फार श्रद्धा होती. तिच्या जत्रेस ती कधींच गेल्यावांचून राहत नसे. एकदां तिच्या जत्रेच्या पूर्वदिवशीं भटजीमहाराजांस कांहीं सद्भक्तमंड-ळींच्या विशेष आग्रहावरून दूरच्या एका गांवीं जावें लागलें. जातांना भटजीमहाराजांनीं आजीबाईस सांगितलें कीं, "पहा! मी तर हा निघालों. घरांत तुझ्यावांचून जाणतें कोणी नाहीं. कोणाही पूजा

जाणणाऱ्याकडून श्रीरामाची पूजानैवेद्य वगैरे संपादून घे. तुला उद्यां तुझ्या वार्षिक नियमाप्रमाणें महालसेच्या दर्शनास जातां येणार नाहीं, त्याबद्दल वाईट वाटूं देऊं नकोस. श्रीराम व महालसा हीं कांहीं निराळीं नाहींत. एकाच परमात्म्यानें प्रसंगोपात्त घेतलेले हे निर-निराळे अवतार होत. यास्तव, हीच महालसा समजून तूं उद्यां इकडे रहा." भटजीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणें आजीबाई म्हाडदोळास न जातां घरींच राहिली, परंतु, वार्षिक महालसादर्शन चुकलें म्हणून तिच्या मनास फार वाईट वाटलें. तिनें गांवांतील देवपूजा येत असलेला एक मुलगा पाहून त्याचेकडून श्रीरामाची षोडषोपचारें पूजा करविली. नैवेद्य दाखवून झाल्यावर मंगलार्तिक्याचे वेळीं आरती फिरवितांना त्या मुलास श्रीरामाच्या मूर्तीऐवजीं दुसरीच मूर्ति दिसूं लागली! आजीबाई आंत होती. तिला हांक मारून तो मुलगा म्हणाला, "आजीबाई! इकडे येऊन हा काय चमत्कार आहे तो पहा." आजीबाईनीं बाहेर येऊन पाहिलें, तों श्रीराम महालसा नटलेला आहे! आजीबाईचा आनंद गगनांत मावेनासा झाला. तिनें प्रेमाश्रूंनीं आपलें हृदय भिजवून टाकिलें! आपणाकरितां भगवंतास हे श्रम घ्यावे लागले असें जाणून तिचा कंठ भरून आला व तिनें महालसारूपधारी श्रीरामाचे आपल्या भावड्या भोळ्या शब्दांनीं पुष्कळ स्तुतिवाद गाइले. तिनें गांवांतील अनेक लोकांस जमवून हें कौतुक दाखविलें. ही गोष्ट दुपारीं १२ वाजतां घडली. आजीबाई महालसारूपधारी रामाजवळ बसून होती. शेवटीं, सुमारें सायंकाळचे चार वाजतां अकस्मात् महालसारूप नाहींसें होऊन पूर्ववत् श्रीरामाची मूर्ति दिसूं लागली!! आपल्या भोळ्या भक्तांकरितां देव काय करील आणि काय न करील, याचा नेम नाहीं! ही आजीबाई अजून हयात आहे. ती अतिशय वृद्ध झाली आहे,

तरीही तिच्याकडे वरील गोष्ट कोणीं विचारिली असतां तिला मोठें स्फुरण येतें व ती फार प्रेमानें घडलेली सर्व हकीकत सांगते.

पाश्चात्य शिक्षणामुळें विचारभ्रष्ट व धर्मश्रद्धाहीन होऊन भौतिक सुधारणेच्या पोकळ लखलखाटानें ज्यांचे डोळे दिपून गेले आहेत, अशा कांहीं आधुनिक सुधारकांस पूर्वींचीं आमचीं पुराणें व तत्तदवतारविशिष्ट भगवल्लीला अगदीं खोट्या वाटतात. सीताविरहमिषानें श्रीरामांनीं वृक्षपाषाणादिकांस आलिंगन देऊन त्या त्या रूपानें असलेल्या देवगंधर्वादिकांस शापापासून मुक्त केलें; तसेंच आपल्या भक्तांच्या हेतुस्तव परमात्मा अनेक वेळां अनेक अवतार घेत असतो; हें ऐकून प्रस्तुतचे सुधारक लागलेच "इंपोस्सिबल" किंवा "नोन्सेस" म्हणून नाकें मुरडितात. परंतु असे चमत्कार आज देखील घडत असलेले पाहून सुधारक आपला हेका सोडित नाहींत, हें मोठेंच आश्चर्य नव्हे काय ? भटजीमहाराज नेहमीं म्हणत असत कीं, "आमच्या सीतारामाच्या प्रतिमेची शिला हा कोणातरी शापभ्रष्ट देवादिकाचा देह असून, त्याचा शापमोक्षकाल जेव्हां जवळ आला, तेव्हां परमात्म्यानें त्यास आत्मस्वरूप केलें." म्हणजे श्रीसीतारामाचा दिव्य देह देऊन नित्य पूजाअर्चाश्रवणकीर्तनरूप आत्मभाग्य त्यास अर्पण करून मुक्त केलें.

शके १८९३ प्रजापति संवत्सरांत भटजीमहाराजांनीं आपल्या घरांतच श्रीसद्गुरु विष्णुबोवा यांच्या हातानें श्रीसीतारामाच्या प्रतिमेची प्रतिष्ठा केली. श्रीसद्गुरु विष्णुबोवा यांचें भटजीमहाराजांवर निःसीम प्रेम होतें. ते डोंगरीवर आले म्हणजे आपल्या हातानें माती आणून भटजीमहाराजांच्या घराचीं बिळें व भिंतीच्या भेगा पुरून नीट करीत असत. भटजीमहाराजांनीं सद्गुरूंस साष्टांग नमस्कार घालून तसें न करण्याविषयीं परोपरी विनंति करावी, पण ते म्हणत कीं, "कृष्णा ! अरे, तुला या जाग्याचा महिमा ठाऊक नाहीं. येथें

अनेक संत येऊन आपल्या पवित्र चरणरजांनीं ही जागा पुनीत करितील व हिचा महिमा यावच्चंद्रदिवाकरौ सर्व भूमंडळांत गाजत राहील. यास्तव या संतमंदिराची मी जी ही अल्पसेवा करितों, तिचा तूं मुळींच निषेध करूं नकोस."

भटजीमहाराजांचें घर अगदीं जुन्या पद्धतीचें असल्यामुळें तेथें श्रीरामनवमीचा वगैरे उत्सव होण्यास फारच अडचण पडूं लागली. नवीन देऊळ बांधावें, तर गोव्यांत देऊळ बांधण्याचा कडक प्रतिबंध. यास्तव घरास घर राहून देवळास देऊळ तयार व्हावें म्हणून मोठ्या चातुर्यानें भटजीमहाराजांनीं तें तशा रीतीनें नवीन बांधविलें, व त्या मंदिरांत शके १८०६ तारण संवत्सरांत ज्येष्ठ शु०९ मीस पूर्वी घरांत स्थापन केलेली श्रीसीतारामाची प्रतिमा आणून ठेविली व त्या दिवशीं मोठ्या थाटानें उत्सव केला. अशा रीतीनें गुर्वाज्ञेप्रमाणें भजन पूजन इत्यादि सांप्रदायाचा विस्तार करून अनेक संसारतप्त मुमुक्षूंस आपल्या अमृततुल्य रसाळ वाणीच्या सदुपदेशानें भवबंधनापासून मुक्त केलें व जडमूढांचा उद्धार करून लोकास श्रीरामभजनी लाविलें.

लक्ष्मण या नांवाचा एक कुंभार भटजीमहाराजांचा एकनिष्ठ शिष्य होता. तो भक्तिज्ञानवैराग्याचा केवळ पुतळाच असून त्यानें आपलें बहुतेक आयुष्य गुरुसेवेतच घालविलें होतें. श्रीरामाचा जसा हनुमान अत्यंत प्रेमळ भक्त व सेवक, तसाच लक्ष्मण कुंभारही भटजी महाराजाचा निष्ठावंत शिष्य व नम्र सेवक होता. भटजी महाराजांनीं त्याचेवरितां खालील साधनोपदेशपर अभंग तयार केला होता:—

गुरुराज बोले, अरे शिष्यराया । । एकांतीं बैसाया उबगूं नये ॥ १ ॥
उबगूं नये कधी साधन करिता । क्षण एक रिता राहूं नको ॥ २ ॥
राहुं नको दासबोध ग्रंथावीण । आत्मा हा आपण अनुभवावा ॥ ३ ॥
अनुभव साधीं आपण एकला । सकल दृश्याला साक्षी तो मी ॥ ४ ॥

साक्षी तो मी जो हा वायु उठे त्याचा । उठल्या वृत्तीचा मीच साक्षी ॥५॥
मीच साक्षी एक वृत्ती या अनेक । पाहतों कौतुक एकला मी ॥ ६ ॥
एकला मी पाठीं, वृत्ती पुढें दिसे । संग मज नसे या वृत्तीचा ॥ ७ ॥
या वृत्ती ऊठती मजपुढें साऱ्या । देखणा मी बऱ्या वाईटाचा ॥ ८ ॥
बऱ्या वाईटाचा संग नसे मज । साक्षी मी सहज दिसे त्याचा ॥ ९ ॥
दिसे त्याच्या पाठीं आहे मी एकला । पाहणार झाला मोकळा मी ॥१०॥
मोकळा मीं देह इंद्रियांचा साक्षी । आपणातें लक्षी आपणची ॥ ११ ॥
आपणासी लाभ आपणाचा परी । अभ्यास हा करी गुरुबोधें ॥ १२ ॥
करी गुरु बोध ऐसा सच्छिष्यास । म्हणे कृष्ण दास वैष्णवांचा ॥ १३ ॥

वरील अभंगांत वर्णन केल्याप्रमाणें साधनसपन्न होऊन लक्ष्मण कुंभार भटजी महाराजांच्या सेवेंत नित्य तत्पर असे.

एकदां भटजीमहाराजांच्या स्वप्नांत ब्राह्मणरूपानें श्रीमारुतिराय येऊन त्यांनीं भटजींस आपल्या उच्चासनावर बसवून घेतलें व म्हणाले " आपल्या जवळ राहून नित्य आपल्या मुखानें अध्यात्म-रामायण ऐकण्याची आम्हांस फार इच्छा झाली आहे. तर आम्ही येत्या महाएकादशीस इकडे येऊं. " इतकें सांगून ब्राह्मणरूपधारी मारुतिराय गुप्त झाले. भटजी महाराजांनीं दुसऱ्या दिवशीं तें स्वप्न सर्वांस सांगितलें. इकडे लक्ष्मण कुंभार यासही त्याच रात्रीं स्वप्न पडलें कीं, " मीं सांगें येथें अमुक अमुक ठिकाणीं मृत्तिकेंत पुरलेला आहें, माझा मुकुट तेवढा वर दिसत आहे मला तिकडून डोंगरीवर पोंचीव. मला भटजींच्या मुखानें अध्यात्मरामायण श्रवण केलें पाहिजे." हें व भटजीमहाराजांचें स्वप्न यांचा मेळ बसला व लक्ष्मण कुंभार सांगें येथें श्रीमारुतिरायास आणण्याकरितां निघाला. डोंगरीवरून सांगें सुमारें ४९ मैल आहे. तेथें गेल्यावर त्यास ती खुणेची जागा मिळाली; परंतु, दिवसा मूर्ति काढिल्यास कोणी तरी गांवकरी निषेध करितील, यास्तव लक्ष्मण कुंभार रात्र पडेपर्यंत तेथेंच राहिला व

काळोख होतांच तो ती मूर्ति उकरून वर काढूं लागला. मूर्ति मातींतून वर काढतेवेळीं " भों-ओं-ओं ओं " असा एक भयंकर ध्वनि झाला. तो ऐकून हें कांहीं तरी विघ्न आहे, असें समजून मारुतीस तसाच तिकडे टाकून तो कुंभार पळाला व एका देवळांत हरिभक्तिपरायण मुकुंदबोवा भागवत यांचें कीर्तन चाललें होतें, तेथें येऊन बसला. कांहीं वेळानें तेथेंच त्यास सडकून ताप भरला. व थोडा वेळ गेल्यानंतर निद्रा लागली आणि पुनः स्वप्न झालें कीं, " अरे वेड्या ! मी आतां डोंगरीवर जाणार म्हणून आनंदाचा ध्वनि केला, त्यास तूं इतका भ्यालास काय ? ऊठ लवकर ! मला आतांच घेऊन डोंगरीवर चल. नाहींतर तुझा नाश करीन " असें स्वप्न होतांच लक्ष्मण खडबडून जागा झाला व पहांटेस उठून श्रीमारुतीस घेऊन पणजीस येण्याकरितां आगबोटीवर चढला. लक्ष्मणानें मारुतिरायास एका मोठ्या पांटींत घालून त्यावर वस्त्र झांकून घट्ट बांधिलें होतें. मारुतिरायांची पांटी आगबोटीवर चढतांच आगबोट भाराक्रांत होऊन बरीच खालीं गेली. हें पाहून तो [illegible]वरील कप्तान वगैरे लोकांस हें काय झालें तें समजेना. ते त्या पांटींत काय आहे तें पाहण्यासाठीं पांटीजवळ आले. परंतु, लक्ष्मणानें पांटी घट्ट पोटाशीं धरिली व त्यांस हात लावूं दिला नाहीं. त्यानें सांगितलें कीं, यांत ब्राह्मणाचे सोंवळे पापड आहेत, त्यांस तुम्ही शिवतां कामा नये. पणजीस लक्ष्मण कुंभार याचे ओळखीची एक शूद्र बाई होती. तिला पूर्वरात्रीं स्वप्न झालें कीं, " उद्यां मी येणार. जागा चांगली सारवून वगैरे स्वच्छ करून मला पाट मांडून ठेव. " ती बाई फार श्रद्धाळु होती, तिनें विश्वासपूर्वक सर्व तयारी केली, इतक्यांत, लक्ष्मण कुंभार आगबोटीवरून उतरून तिच्याच घरीं आला. ही सर्व तयारी पाहून त्यास आश्चर्य वाटलें. बाईनें घडलेलें सर्व वर्तमान लक्ष्मणास सांगितलें. तें ऐकून त्यास फार आनंद झाला. मग त्या

रात्रीं तो तिजकडे राहून दुसऱ्या दिवशीं सकाळीं, म्हणजे शके १८०७ पार्थिव संवत्सर आषाढ शु० एकादशीस श्रीमारुतिरायासह डोंगरीवर आला. भटजीमहाराजांस परमानंद झाला. त्यांनीं मारुतिरायास प्रेमालिंगन दिलें व श्रीरामाच्या गर्भगृहाबाहेरच्या बाजूस उजवीकडे याची स्थापना केली. हे मारुतिराय अत्यंत जागृत असल्यामुळें त्यांस डोंगरीवरील सर्व लोक मोठ्या श्रद्धेनें भजतात. कांहीं चोरी वगैरे झाली असतां मारुतिरायास केळ्यांच्या घडाचा नवस केला आहे, असें जर चोरास कळेल, तर तो एका क्षणाचाही विलंब न लावितां चोरून नेलेली वस्तु जेथल्या तेथें आणून टाकतो. नवसाच्या केळ्यांचे घड नित्य मारुतीकडे लोंबलेलेच असतात व मारुतिरायही नवसाप्रमाणें सर्व भक्तांचे मनोरथ पूर्ण करितात.

भटजीमहाराजांस लहानपणापासून गायनाचा मोठा नाद होता. कोणी कांहीं पद वगैरे म्हटलें, तर यांनीं तें अगदीं तस्सें म्हणून दाखवावें. शब्दानुकरण करणारे भटजीमहाराज हे चालते बोलते ग्रामोफोनच होते असें म्हटल्यास चालेल. या त्यांच्या अलौकिक गुणामुळें पुढें ते चांगले गायक निपजले. आधींच भगवद्भक्तीनें फुलून गेलेलें हृदय, त्यांत अत्युत्कृष्ट संगीत गायन; या दोहोंचाही मेळ झाल्यावर तिकडे आनंदास काय उणें असेल? भटजीमहाराज कीर्तन करूं लागले म्हणजे आपल्या अर्थपूर्ण रसभरित निरूपणानें व अपूर्व गायनपद्धतीनें श्रोतृसमुदायाचें अन्तःकरण गार करून सोडीत असत. भजनांत ते एकादें करुणरसप्रचुर पद म्हणूं लागले, तर सर्वांच्या डोळ्यांतून खळखळ प्रेमाश्रू लोटवीत. त्यांच्या कीर्तनास बसलेल्या श्रोत्यांस, तासाचे तास नुसत्या एका पळाप्रमाणें वाटत असत. समर्थांनीं दासबोधांत सांगितल्याप्रमाणें, जेथें "सांग महंती" आणि "संगीत गाणें" आहे, तेथें "वैभवास काय उणें" असणार? ज्यांचा कंठ सुस्वर असून ज्यांस उत्तम गातां येतें, त्यांनीं आपल्या

वाणीचा उपयोग हरिगुणसंकीर्तनाकडे केला, तर किती बरें फायदा होईल? नुसत्या साध्या गायनानें जर मनुष्याचें चित्त गारीगार होऊन जातें, व क्षणभरच कां होईना, पण, शांतिसुखाचा अनुभव येतो; तर ज्यावर हरिभक्तीचीं अनेक पुटें चढलीं आहेत. अशा गायनानें लोक तत्काल शाश्वतसुखानुभवास पात्र होतील हें निराळें सांगण्याची गरज नाहीं. गायनकलेचें असें महत्त्व जाणूनच समर्थांनीं श्रीरामरायांकडे "संगीत गायन दे रे राम! आलाप गोडी दे रे राम" म्हणून आस्थापूर्वक गायनाची याचना केली आहे.

भटजीमहाराजांच्या कीर्तनाची सर्वत्र प्रख्याति झाल्यामुळें जो तो त्यांस आपले घरीं नेऊन कीर्तनभजनादिक उत्सव करूं लागला. ही त्याची दिगंत पसरलेली कीर्ति व लोक गात असलेले त्यांचे स्तुतिवाद, कांहीं परोत्कर्षासहिष्णु श्रीमंत मंडळींस सहन न होऊन, भटजीमहाराज त्यांच्या डोळ्यांत खुपूं लागले व त्यांनीं त्यांचा छळ करण्याचा निश्चय केला गोकर्णमठाधीश स्वामिमहाराज श्रीमत्पद्मनाभतीर्थ श्रीपादवडेर हे त्यावेळीं संचारार्थ फिरत फिरत पणजी येथें श्रीमंत धेंपे यांचे येथें पोंचले होते. तेव्हां वरील श्रीमंत मंडळीनें श्रीस्वामींकडे भटजीमहाराजासंबंधानें भलतीच कांहीं कागाळी करून, त्यांस बहिष्कृत करावें, अशी विनंति केली. श्रीस्वामींनीं भटजींस पणजी येथें बोलावून आणून चौकशी केली त्यावेळीं, भटजीमहाराजांनीं जें अलौकिक भाषण केलें, त्यामुळें श्रीमंतांच्या भ्रमाचा सर्व भोपळा फुटला व भटजी महाराज निष्कलंक ठरून ते कुटिल श्रीमंत मात्र उलट श्रीस्वामींच्या रोषास पात्र झाले दोन तीन दिवस लाजेमुळें ती श्रीमंत मंडळी स्वामीदर्शनास देखील आली नाहीं. श्रीस्वामींनीं भटजीमहाराजांस आठ दहा दिवस ठेवून घेऊन कीर्तन, पुराण वगैरे मोठ्या थाटाचा उत्सव केला. भटजीमहाराजानीं श्रीस्वामींवर त्यावेळीं केलेलीं अनेक पदें आहेत,

तीं विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहींत. त्या कुटिल श्रीमंतांसंबंधानें देखील भटजीमहाराजांनीं केलेलें " बहु मला गांजिति नि:सीम दुष्ट, ज्यां श्रीमद अतिबलभीम मारुति " हें पद प्रसिद्ध आहे.

इंग्रजसरकारानें ज्यावेळीं इकडील मिठाचें कंत्राट घेतलें होतें, त्यावेळीं कै० अण्णा किर्लोसकर हे गोव्यांत आले होते व त्याच संधीस डोंगरीवर श्रीरामनवमीच्या उत्सवाप्रीत्यर्थ नाटकें होत होतीं. हीं नाटकें खुद्द भटजीमहाराजांनींच पुराणांतील बोधप्रद आख्यानें निवडून काढून संगीतांत तयार केलीं होतीं. कै० अण्णा किर्लोसकरांस भटजीमहाराजांची कीर्ति ऐकून ठाऊक होती. यास्तव, तेही एके दिवशीं या नाटकास आले. त्या दिवशीं "शुकरंभासंवाद" नाटक असल्यामुळें प्रयोगास अप्रतिम रंग आला. भटजीमहाराजांनीं रचिलेलीं तीं मनोहर पदें व लाटानुप्रासयुक्त गद्यपद्धति पाहून, कविवर्य किर्लोसकर जागच्या जागींच विरघळले. नाटक केव्हां संपलें हें देखील त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. नाटक संपल्यावर कै० अण्णा किर्लोसकर यांणी भटजीमहाराजांस तीं नाटकें घेऊन आपणाबरोबर मुंबईस येण्याची विनंति केली. परंतु, नाटकें करून पैसे अगर कीर्ति मिळविण्याचा आपला हेतु नसून, फक्त भगवल्लीलांचा विस्तार करण्याचाच आहे, असें त्यांस उत्तर मिळालें. आपण येत नाहीं तर तीं नाटकें तरी आपणास द्यावीं अशी कविवर्य अण्णांनीं पुनः नम्रतापूर्वक विनंति केली. परंतु, तीं नाटकें पुस्तकरूपानें स्वतंत्र नसून प्रत्येक पात्राकडे त्या त्या वेळीं तयार करून दिलेले त्यांचे खर्डे मात्र होते; त्यामुळें, तींही त्यांस नेतां आलीं नाहींत. शेवटीं, आपणास नाटकें करण्याची याच ठिकाणीं स्फूर्ति झाली, यास्तव आपल्या हातचा प्रसाद तरी आम्हांस मिळावा, अशी विनंति केल्यावरून, भटजींनीं श्रीरामाकडे व श्रीमारुतिरायाकडे त्यांची इच्छा सफल करण्याबद्दल प्रार्थना करून, त्यांस आपल्या

हातानें नारळ व पुष्पप्रसाद दिला. इकडून गेल्यावर अण्णांनीं शाकुंतल वगैरे नाटकें रचून रंगभूमीवर त्यांचे अनेक प्रयोग केले व दिगंत कीर्ति मिळविली, हें सर्वविश्रुत आहेच. आपल्या एकाद्या तरी नाटकाच्या प्रस्तावनेंत कविवर्य अण्णांनीं या गोष्टीचा नुसता उल्लेख देखील केला नाहीं, याचें आम्हांस फार वाईट *वाटतें !

भटजीमहाराजांनीं पंढरपूर, पंचवटी, अयोध्या, काशी, वेंकटाचल वगैरे अनेक यात्रा केल्या. ते पंढरपुरास एकसारखे तीन महिने श्रीविठ्ठलाचा प्रेमरंग पाहण्याकरितां राहिले होते. पंढरपुराहून घरीं आल्यावर त्यांनीं श्रीरामासन्निध भजनीसप्ताह सुरू केला. त्या वेळीं बोरी येथील प्रसिद्ध महंत जगन्नाथबोवा हे भटजीमहाराजांच्या अतुल स्नेहामुळें वारंवार डोंगरीवर येत असत. त्यांस ती भटजीमहाराजांची अपूर्व भजनपद्धति व तो अनिर्वचनीय सात्त्विक प्रेमरंग पाहून पराकाष्ठेचा आनंद झाला. जगन्नाथबोवा भटजीमहाराजांस गुरुस्थानीं मानीत असत व आपणास कांहीं तरी सेवा सांगावी म्हणून ते वरचेवर भटजींस विनंति करीत. त्यांस भटजींनीं भजनीसप्ताहाचा सर्वत्र विस्तार करण्याची आज्ञा करून, हीच आपली सेवा असें सांगितलें. तेव्हांपासून, जगन्नाथबोवांनीं सर्व गोमान्तकभर फिरून जिकडेतिकडे भजनी सप्ताह सुरू केले ते अजूनही सर्वत्र अव्याहत चालू आहेत. जगन्नाथबोवांवर भटजीमहाराजांचें खालील पद प्रसिद्ध आहे.

---

* किर्लोस्कर संगीत मंडळीचे सेक्रेटरी रा० शंकर बापुजी मुजूमदार यांचें असें म्हणणें आहे कीं, कै० अण्णा किर्लोस्कर हे गोव्यांत कधींही गेले नव्हते. परंतु ते तिकडे गेले होते, अशी माहिती गोव्यांतील आणखी एकदोन गृहस्थांनीं आम्हास दिली. ग्रंथकर्ता.

पद.

धन्य धन्य अवतारचि केवळ जगन्नाथ दासाचा ॥
ज्ञानभक्तिवैराग्यविराजित जगदोद्धारक साचा ॥ ध्रु० ॥
पतित पावन व्हाया देशोदेशीं वास जयांचा ॥
जिकडे तिकडे थाट चालविति कीर्तन सप्ताहांचा ॥ १ ॥
निरहंकारी प्रेमळ भारी स्वभाव शांत मनाचा ॥
इंद्रियनिग्रह बळकट जैसा परिसों योगि शुकाचा ॥ २ ॥
नरनारी आबालवृद्ध यां जिवलग होय जिवाचा ॥
निंदास्तुति सम अद्वय भावें भोक्ता भजनसुखाचा ॥ ३ ॥
कोणी कांहिं म्हणो आवडता कृष्णजगन्नाथाचा ॥
भला भला सत्पुरुष लाभला पुतळा भक्तिरसाचा ॥ ४

वरील विवेचनावरून भटजीमहाराजांनीं भजनांचा गोव्यांत केवढा विस्तार केला, हें सहज कळण्यासारखें आहे. छिद्रान्वेषक काकदृष्टि दुर्जनांनीं त्यांचा पुष्कळ छळ केला! परंतु "मणिः शाणोल्लीढः" या न्यायानें भटजीमहाराजांचें त्यापासून कांहींच नुकसान न होतां उलटा त्यांच्या निर्मल कीर्तीचा दिगंत विस्तार मात्र झाला! भटजीमहाराजांच्या दर्शनास दूरदूरच्या प्रांतांतून अनेक सद्भक्त येऊन त्यांची अमोघ वाणी श्रवण करीत असत. त्यांचें अन्तःकरण प्रेमानें गदगदां हालवून सोडणारें भजन ऐकिलें असतां, पाषाणासदेखील द्रव फुटेल, असें वाटत असे. एकदां भटजीमहाराजांचा कट्टा निंदक असा एक श्रीमंत गृहस्थ सहज भटजीमहाराजांच्या भजनास बसला असतां, भटजींनीं त्याच्या डोळ्यांतून प्रेमाश्रु लोटविले व त्यानें निरभिमानपणें भटजींस लोटांगण घालून क्षमा मागितली.

भटजीमहाराज उत्तम ज्ञानमार्गोपदेशक व प्रेमळ भजनरंगाची केवळ प्रतिमाच होते. त्यांचें भजन "घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं" अशापैकींच होतें. श्रीमंतांपासून थेट तेल्यातांबोळ्यांपर्यंत व ब्राह्मणापासून शूद्रापर्यंत त्यांनीं उंचनीच भेदभाव

सोडून देऊन, सर्वत्र एकसारखा ज्ञानमार्गाचा विस्तार केला. व बहुतेकांचें अज्ञान दूर करून त्यांच्या हृदयांत ज्ञानाचा प्रकाश पाडिला. अशा रीतीनें "यथेमां वाचं कल्याणी" या श्रुतिवाक्यरूप भगवदनुशासनाप्रमाणें त्यांनीं भगवंताच्या यथार्थ ज्ञानाचा विस्तार करून शके १८२४ शुभकृत् संवत्सर आश्विन वद्य प्रतिपदा युक्त पौर्णिमेदिवशीं शुक्रवारीं, रात्रौ दहा वाजतां सर्व गोमांतकास नव्हे महाराष्ट्रास ललामभूत असा आपला पुण्यदेह टाकून दिला व आपण परब्रह्मीं लीन झाले!

देह ठेवण्यापूर्वीं त्यांनीं सर्व गांवांतील सद्भक्तांस आपणाजवळ बोलावून आणून ३।४ तासपर्यंत त्यांस सदुपदेश केला व रामभजनाचें माहात्म्य त्यास मोठ्या कळकळीनें समजावून दिलें. आणि आपणावर जसें प्रेम ठेविलें तसेंच आतां मुकुंदराजावरही ठेवा, असें सांगून त्यांनीं भाषण बंद केलें आपण अमुकच दिवशीं निर्याण करणार असें त्यांनीं पूर्वींच सांगितलें होतें. कोजागरी पौर्णिमेचा उत्सव निर्विघ्नपणें पार पडल्यावर ते म्हणाले "आतां अवधी नाहीं. कारण, पुढें दिपवाळीच्या उत्सवास अवघे तेरा दिवस राहिले. आमचें और्ध्वदेहिक वगैरे होऊन दिपवाळीचा श्रीरामाच्या मिरवणुकीचा उत्सवही तसाच निर्विघ्नपणे झाला पाहिजे" वगैरे सांगून आश्विन वद्य प्रतिपदा रोजीं स्वेच्छेनें "जय जय राम कृष्ण हरी" या सद्भक्तांनीं केलल्या भजनाच्या गजरांत त्यांनीं देह ठेविला. प्रेमातिशयामुळें शोकव्यग्र होऊन लोक आपल्या देहावसानकालीं आपणाजवळ भजन करणार नाहींत, हें त्यांस पक्कें ठाऊक होतें. म्हणून, त्यांनीं पूर्वींच "डोळ्यांतून अश्रु न काढितां रामकृष्णहरी असें भजन करूं" अशी सर्वांकडून श्रीरामाची शपथ घेतली होती! सर्व गोमान्तकास आपला आईबाप गेल्यासारखें परमदुःख वाटलें! विशेषतः त्यांच्या सद्भक्तांस

त्यांच्या परिणामकारक सदुपदेशाचें स्मरण होऊन, त्या वेळीं जें दुःख झालें, त्याचें वर्णन करण्याचें आमच्या लेखणींत सामर्थ्य नाहीं! अशा रीतीनें भक्तिज्ञानवैराग्यरूप तेजोमय किरणाचा सर्वत्र विस्तार व प्रकाश करून अज्ञानांधकारास देशोधडीस लावणाऱ्या या सत्पुरुषरूप सूर्याचा अकल्पित अस्त झाला. निर्याणकालीं त्यांचें वय अवघें ५८ वर्षांचें होतें.

येथपर्यंत साधुत्वासंबंधानें भटजीमहाराजांचे वर्णन झालें, आतां त्यांच्या कवितेकडे वळूं. भटजीमहाराज हे उत्तम कवि होते. त्यांची कविता सरळ, सुबोध व सद्यःपरिणामकारक अशी आहे. त्यांनीं केलेला स्वात्मतत्त्वामृतशतक या नांवाचा एक लहानसा श्लोकबद्ध वेदांतग्रंथ आहे, असें आम्ही मागें सांगितलेंच आहे. हा ग्रंथ म्हणजे वेदांताचा केवळ गर्भ असें म्हटलें तरी चालेल. यांतील विषय इतक्या सुलभ रीतीनें प्रतिपादिला आहे कीं, तो एकाद्या लहान मुलास देखील सहज समजेल. वेदांतग्रंथांत वारंवार आढळणाऱ्या पारिभाषिक शब्दांची भानगड यांत मुळींच नसल्यामुळें कोणाही मुमुक्षूस या ग्रंथाच्या अभ्यासानें दुर्निवार अशा मोहाचा निरास करितां येईल. त्यांतील कांहीं वेंचे खालीं देतों.

आपण वस्तुतः आनंदस्वरूप असून आपणास कसा भ्रम होतो तें सांगतातः—

आनंद आपण असें न कळे मनातें। घेऊनि विस्मृति धरी विषयासि नातें॥
कीं होय सौख्य तुज तें विषयांत आहे। वाटे उगा भ्रम तुझा तुज बाधताहे १२

विषय कल्पुनि जें सुख भोगिसी। स्वरुप तेंचि तुझें परि नेणसी।
म्हणुनि दुःख अनावर वाटलें। तुजवरीच तुझें तम दाटलें॥ १३॥

भटजीमहाराजांच्या वरील दोनच श्लोकांवरून त्यांची कविता किती सुबोध व सोपी आहे, याची वाचकांस सहज कल्पना होईल.

न दृश्य तूं साक्षि असे तयाचा । मागे पुढें भास दिसे मनाचा ।
सर्वांसि या आपण मूळ साचा । अलक्ष सच्चित्सुखलक्षणाचा ॥ ३२ ॥

अशा अलक्ष्य परब्रह्माचा अभ्यास करितेवेळीं तुला हें दृश्य आडवें येईल तेव्हां, त्रासून जाऊन तूं या दृश्याचा त्याग करण्याची खटपट करूं नकोस, तरः--

दिसे तें तूं पाहें, परि वळख द्रष्टयासि वळुनी ।
असे जो सत्यत्वें सुखमयसदावृत्ति त्यजुनी ॥
दिसे भासे सारें तुजवरिच हें तूं न दिससी ।
तुला तूं लक्षाया सहज समजानेंचि असती ॥ ३३ ॥

वेदांतासारखा गहन विषय बोलतांना भटजीमहाराजांच्या भाषणांत एकदेखील कठीण शब्द येत नसे. "आत्मा" हा शब्द संस्कृत आहे. याचा अज्ञ लोक विपरीत अर्थ कल्पितील म्हणून "आत्मा" म्हणण्याऐवजीं ते "आपण" असेंच म्हणत असत. यावरून त्यांची वेदांतविवेचनपद्धति किती सुगम होती हें समजण्यासारखें आहे. याचा प्रत्यय पाहिजे असेल तर त्यांचे वरील उद्गार किती सोपे व सरळ आहेत तें पहावें.

अनेक उपायांनीं जर चित्त स्थिर होऊन स्वसुखानुभव येत नाहीं तर त्यास काय करावें, तें सांगतातः—

सुखाची जे इच्छा त्यजुनि वळ मागें परतुनी ।
स्थिरत्वानें राहीं सुखमय निजात्मा समजुनी ॥
उठों नेदीं वृत्ती, सहज सुख येईल उदया ।
तदाकारें पोटीं स्फुरत सुख जें आपण तया ॥

अहाहा ! किती सहज व गोड उद्गार हे ! संसाररोगग्रस्त जीवास वरील श्लोक ही दिव्य मात्राच होय.

विषयांपासून सुख प्राप्त होतें, असें जर कोणास वाटत असेल तर खालील श्लोक पहावाः—

पदार्थ सुखसे तुला जरि दिसे सुषुप्ती पहा ।
अपार सुख निद्रिता, न विषयीं जिवाची स्पृहा ।।
प्रपंच सुख हा जरी, तरि निजेंत कैचें सुख ? ।
न तै विषयवृत्ति, जागृतिंत जे[1] दिसे सन्मुख ॥ ७६ ॥

स्वात्मतत्त्वामृतांतील प्रत्येक श्लोक वाचनीय असल्यामुळें त्यांतील वेंचे म्हणून देतां येत नाहींत. प्रत्येक मुमुक्षूनें एकवार तरी हा ग्रंथ अवश्य वाचून प्रत्यय पहावा. आतां फक्त त्यांतील आणखी एकच श्लोक देऊन, भटजीमहाराजांच्या इतर कवितेकडे वळूं.

चित्त विषयांतून काढून आत्मस्वरूपांत स्थिर केल्यानंतर आपली स्थिति कशी होते तें सांगतात:––

जे वासना वळविसी स्वसुखैक ठाया
वाटेल त्या कठिण तेथुनिया उठाया ॥
जे तें स्फुरेल सुख आपण विश्व सारें
दुःखें न राहतिल या निज सद्विचारें ॥ ७८ ॥

भटजीमहाराज स्वतः चांगले गायक असल्यामुळें, त्यांनीं अनेक रागांवर अनेक सुंदर पदें केलीं आहेत. भगवद्भक्तिविरहित जें गाणें तें त्यांस अगदीं आवडत नसे. कीर्तनांत विश्रांतीसाठीं म्हणून अप्रासंगिक हिंदुस्थानी पदें ठुंबऱ्या वगैरे ते कधींच म्हणत नसत. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, कोणतीही कविता भगवद्गुणवर्णनपर किंवा ज्ञानवैराग्यपर असावी. उगीच "तननन" करून त्यांत काय अर्थ आहे ? भटजी महाराजांचे चिरंजीव मुकुंदराज हे अगदीं लहान असतां, त्यांची आई वगैरे त्यांस खेळविण्याकरितां म्हणून कसलें तरी एकादें क्षुद्र गीत म्हणत असे. तें भटजीमहाराजांस न आवडून मुद्दाम त्यांनीं खालील रसभरित पद तयार करून त्यांस म्हणावयास दिलें:––

---

१ विषयवृत्ति.

**पद** ( गुरुकृपांजन पायो मेरा भाई० या चालीवर ).

मुकुंद राजा ! तूं प्रिय माझा, । लावीं देह तूझा रामभक्तिकाजा ॥ ध्रु० ॥
तुझा आई बाप राम सीतापती । ओळखी घे त्याची साधूंचे संगती ॥१॥
नवविधा भक्ति करि राघवाची । रामासन्मुख नित्य दासबोध वाचीं ॥२॥
विवरुनि अर्था साधीं परमार्था । निशिदिनि भज तूं राम समर्था ॥३॥
तरिच वंशाचा होइल उद्धार । विष्णु कृष्ण जगन्नाथा आवडासि फार ॥४॥

असा आपला मुलगा निपजावा, अशी इच्छा करणारे आजमितीस आमच्या या भरतभूमीवर कितीसे आईबाप असतील, याचा वाचकांनींच विचार करावा. भटजीमहाराजांच्या या गोड शब्दांची तारीफ करावी, कीं त्यांच्या या पृथ्वीच्या मोलाच्या सद्धेतूची शिफारस करावी, हेंच आम्हांस समजत नाहीं. आम्हांस सांगावयास अत्यंत आनंद वाटतो कीं, त्यांच्या या पवित्र व निर्मळ वासनेप्रमाणें, त्यांचे चिरंजीवही, श्रीरामाची नवविधा भक्ति करून, त्यासन्मुख नित्य दासबोध वाचणारे व त्याच्या अर्थाचें विवरण करून आत्मवंशाचाच काय, पण जनांचाही उद्धार करणारे निपजले आहेत !

भटजीमहाराजांची वामनपंडितांच्या यथार्थदीपिकेवर फार भक्ति होती. यथार्थदीपिकेच्या तोडीचा–गीतेचें हृदय उकलून देणारा–दुसरा ग्रंथ नाहीं, असें ते म्हणत असत. एकदां एका निर्गुणवादी शास्त्रीबोवांनीं “ वामनानें यथार्थदीपिकेंत सगुणाचें उगीच ढोंग माजविलें आहे ” वगैरे पंडितांची बरीच निंदा केली. त्या वेळीं भटजीमहाराजांस फार वाईट वाटून त्यांनीं त्यावर खालील पद केलें:–

सच्चित्सुख जगलहरींत स्फुरसि आत्मपाणी, तुजविण मज कोणि नावडे चापपाणि । हितगुज माझें तूंचि एक, जो अनेक । विश्वव्यापक कनकनगापरीं । तूं जननि–जनक माझा सनकादिस्तुत प्रभु तूं राघव रामराजा । दिव्य सिंहासनि शोभे यद्वामांकिं जानकि भाजा । ध्यान निरंतर करि त्याचें देहभान हरुनि । अद्वयात्म सुख स्फुरविसि अंतरीं । हें बिज त्वद्भक्तचि जाणति, अन्य नेणति फुकट शिणति ज्ञानोपायीं ।

सगुण–निर्गुण भेद नाहीं लवहि कांहीं । अवयव मिथ्या भासति, आपण निरवयवालक्ष न लक्षिति खुण सच्चिदानंदस्वरूप जे मुळिंची । तरि ते बुद्धि खुळिच त्यांचि । द्वैतभावना निरसलि नाहीं मानसाचि । "सगुण ढोंग" म्हणति अद्वय स्थिति कशाची ? । चरणिं शरण मी अनन्य, स्वपदभक्तिभाग्यें धन्य–। करुनि, तूंचि कळविसि मज आत्मस्थिति बरी । राम विष्णु कृष्णजगन्नाथ ! तुला हात जोडुनि प्रार्थितों मि ऐसें ॥ १ ॥

वरील पदाची चाल भटजीमहाराजांच्या स्वयंस्फूर्तीची असल्यामुळें तें पद कोणाही जाणणाऱ्याकडूनच ऐकिलें पाहिजे. भटजीमहाराजांचीं बहुतेक पदें अशींच आहेत कीं, त्यांची चाल अमुक अशी मुळींच देतां येत नाहीं व ती चाल कळल्याशिवाय तीं अगदीं नीरस वाटतात. मीठ न घातलेला कोणताही पदार्थ प्रथम चाखून पाहिला असतां जसा बेचव लागतो व मीठ घालतांच रसभरित होतो, तशींच, भटजीमहाराजांचीं पद, त्याची खरी धाटी ठाऊक नसलेल्यांकडून ऐकिलीं असतां गचाळ वाटतात व तींच जाणत्याच्या मुखांतून ऐकिलीं असतां अगदी तन्मय करून सोडितात. वरील पदांत निर्गुणवाद्याची अद्वैतस्थिति भटजीमहाराजांनीं मोठ्या गमतीनें उडवून टाकिली आहे !

अत्यंत मधुर असें जें रामनाम, त्याच्या जपाचें रहस्य भटजीमहाराज सांगतात:—

पद–( दादरा ).

जप तूं रामनाम किती मधुर ! मधुर ! मधुर ! मधुर ! ॥ ध्रु० ॥
रामनामध्वनि उमटे, तेथें लक्ष लाविं नेटें ।
ब्रह्मानंद सहज भेटे, प्रचुर ! प्रचुर ! प्रचुर ! प्रचुर ! ॥ जप० ॥ १ ॥
दृश्य देखतांचि दिठी, देईं द्रष्टयासि मिठी ।
आपुलें आपण सौख्य घोंटिं, न दुर ! न दुर ! न दुर ! न दुर ॥ २ ॥

रामविष्णुकृष्णध्यान, त्यासि दे मुकुंद ज्ञान।
जेणें होय समाधान, चतुर! चतुर! चतुर! चतुर। ॥ ३ ॥

त्यांचें खालील प्रसिद्ध पद किती हृदयंगम आहे पहा!

पद–( कित्‌ना थमालले, थमाल आपुल्या गाई० या चालीवर ).

रामा! दयाघना! क्षमा करुनि मज पाहीं ॥
जरि बहु अपराधी खराच मी अन्यायी ॥
तुजविण पाहतां रे! संसारीं सुख नाहीं, निमिषभर कांहीं ॥ रामा० ॥ ध्रु० ॥
कोठिल कोण मीं न जाणिला हा पत्ता।
आजिवरि अज्ञानें मिरविली विद्वत्ता।
देहात्मत्वाची स्थिति झाली उन्मत्ता।
येउनि जन्मा रे! व्यर्थ श्रमविली आई, हेंचि मनिं खाई। ॥ रामा० ॥ १ ॥
नाथ अनाथा तूं माय–बापही तैसा।
परि मी उद्धवलों पतित पापी ऐसा ॥
तरी निज नामाचें महत्त्व सांडिसि कैसा।
पावननामा रे! जाच देति रिपु साहि; साच वपु दाही ॥ रामा० ॥ २ ॥
करुणासागरा! राघवा! रघुराजा!।
विषयीं पांगला नका करूं जिव माझा।
भजनीं चांगला मिळवीं साधुसमाजा।
भुलुनि प्रपंचा रे! भ्रमुनि भ्रमुनि ठायिं ठायिं, हरुनि वय जाई॥ रामा० ॥ ३ ॥
सच्चित्सुख जो तूं परब्रह्म केवळ।
विश्वीं व्यापला तरंगीं जैसें जळ
अवतारतोसि हें उपासकांचें बळ।
भक्तजनाला रे! चित्रविचित्र उपायीं, सतत सुखदायी ॥ रामा० ॥ ४ ॥
विष्णु! कृष्ण! जगन्नाथ! तुझा मी लेक।
चरणीं शरण; दे स्मरण आपुलें एक।
हातीं संतांची सेवा घडविं अनेक।
जगदभिरामा रे! मानस हें तव पायीं, जडविं लवलाहीं ॥ रामा० ॥ ५ ॥

हें पद, व भटजीमहाराजांसारखा म्हणणारा मिळाला, तर कोण मायेचा पूत या मायिक प्रपंचसुखावर लाथ मारून विरक्त होणार नाहीं ?

मारुतिरायाचें खालील रहस्यार्थप्रचुर पद पहा:—

**पद.**

धन्य। एक मारुती सेवक रामाचा ॥
अन्य नाहीं त्रिभुवनीं ! काया-मनें-वाचा ॥ ध्रु० ॥
देहलंकेमाजी शोधी जाणीवे सितेला ॥
जाणतां अशोकमुळीं, भेटावया गेला ॥ धन्य० ॥ १ ॥
दाविली खूण तिसी निज राममुद्रा ॥
पाहतां तन्मय झाली आनंदसमुद्रा ॥ ध० ॥ २ ॥
अद्वय होउनी सीतारामीं लीन झाला ॥
रामनामस्मरणाचा नित्य नेम ज्याला ॥ ३ ॥
अभय वरदहस्त करुनियां उभा ॥
वाम कर कटिं ठेवुनि दावी दिव्य शोभा ॥ ४ ॥
मारुती संकटहारी रामभजकांचा ॥
विष्णुकृष्ण जगन्नाथा उपयोगी साचा ॥ ५ ॥

भटजीमहाराजांचें खालील वैराग्योत्पादक पद किती सरस आहे पाहा !

पद ( अखंड हरि हरि वदा रे बापांनो० या चालीवर )

सदैव राम राम म्हणा रे बापांनो। सदैव राम राम म्हणा।
नरतनु हे दुर्लभ गणा रे बापांनो ॥ स० ॥ ध्रु० ॥
तुम्हिं प्रपंच केला जरि निका।
तरि शेवटिं होइल हा फिका।
यम काढिल शोधुनि बहु चुका ॥
मार मारिल कठिण आइका, रे बापांनो ! सदैव राम० ॥ १ ॥
काय घालवितां वय फुका।

ध्यानिं आठवा रघुनायका ।
ब्रह्मत्वें आपणा तुका ।
जन्म-मरणाला मग मुका रे बापांनो । सदैव राम राम म्हणा ॥ २ ॥
देह पडेल कधिं न भरंवसा ।
निज आत्मा आपुला कसा ।
हें जाणत एकांतीं बसा ।
नकळे तरि गुरुला पुसा रे बापांनो । सदैव राम राम० ॥ ३ ॥
मोठेपणिंचा अभिमान सोडा ।
छी ! छी ! देहमीपण खोडा ।
दृढ असंगशस्त्रें तोडा ।
आहे अखंड सुख तें जोडा रे बापांनो । सदैव राम० ॥ ४ ॥
जगिं तारक वैष्णव गुरू ।
त्याचे चरण जाउनि दृढ धरूं ।
कृष्णजगन्नाथ सांगे, उद्धरूं ।
आपआपणा सावध करूं रे बापांनो । सदैव राम राम० ॥ ५ ॥

हें दिसणारें सर्व विश्व भगवत्स्वरूप आहे, हें सांगतातः—

पद ( हरि तुझि मंजुळ मुरली० या चालीवर )

उमज मनिं रामचि जग हें । रामचि जग, न धरीं
कांहीं उबग । कीं रज्जु भुजग जेवि कनक नग ॥ ध्रु० ॥
दृश्य पसारा द्रष्टा सारा । सूर्यकिरणिं मृगजल
जैसें झग झग ॥ रामचि जग० ॥ १ ॥
अद्वय आपण हे विवरीं खुण ।
ज्यापरि जलतरंग, तेविं अनुभविं मग ॥ रा० ॥ २ ॥
विष्णुगुरुचरणिं कृष्ण जगन्नाथ
सहज सुखाचा ढीग होय, जाय तगमग ॥ राम० ॥ ३ ॥

खालील अभंगांत संतसंगाचा महिमा उत्तम वर्णिला आहेः—

धन्य धन्य धन्य सज्जनाचा संग, । ज्ञानभक्तिरंग रंगावया ॥ १ ॥
रंगावया मन चैतन्यस्वरूपीं । नाहीं दुजा ओपी ज्ञान ऐसें ॥ २ ॥

ज्ञान ऐसें जागें जयाचे हृदयीं । नित्य त्याचे पायीं ठेवूं माथा ॥ ३ ॥
ठेवूं माथा अहंकार निरसोनी । सेवा संपादुनी राहूं तेथें ॥ ४ ॥
राहूं तेथें मन सर्वदा विश्रांती । संसाराची खंती आठवेना ॥ ५ ॥
आठवेना एका आपणावांचोनी । जनीं मनीं वनीं घनदाट ॥ ६ ॥
घनदाट सुखस्वरूप आपुलें । अंतरीं धरिलें आत्मभावें ॥ ७ ॥
आत्मभावें निजदर्शनाचा लाभ । दिधला स्वयंभ गुरुराया ॥ ८ ॥
गुरुराया स्वामी ! समर्था ! वैष्णवा ! । द्यावी निज सेवा कृष्णदासा ॥ ९

इकडे गोमान्तकांत कोणताही उत्सव झाला म्हणजे, त्याच्या सांगतेच्या वेळीं गौळणकाला करीत असतात. गौळणकाला म्हणजे भगवान् श्रीकृष्णांनी गोकुलांत केलेल्या लीलाविहाराचें वर्णन होय. हे गौळणकाले अनेक कवींनीं नाटकरूपानें तयार केलेले आहेत. परंतु, जगन्नाटकी मायाचक्रचालक श्रीकृष्णपरमात्म्यानें गोकुलांत केलेल्या लीला, कर्त्यांनीं, आपल्या स्वभावानुसार नुसत्या विषयासक्तीच्या शृंगाराप्रमाणें वर्णिल्या आहेत ज्या श्रीहरीच्या चारित्रश्रवणानें तत्काल भवबंध तुटून परमपदाची प्राप्ति होते, त्या मंगलकारक चारित्राचा असा हेतुविपर्यास झालेला पाहून, भटजीमहाराजांस फार वाईट वाटलें व त्यांनीं उत्तम रहस्यप्रकटार्थप्रचुर असे दोन गौळणकाले तयार केले त्यांतील पदें पाहिलीं म्हणजे कर्त्याच्या विलक्षण चातुर्याबद्दल तारीफ करावी तेवढी थोडीच वाटते. कारण, त्या काव्यांनीं विषयासक्तांची व विरक्त सज्जनांची सारखीच करमणूक होते. कल्पनेचा साक्षी जो चैतन्यघन आत्मा, तो श्रीकृष्ण; विवेक वैराग्यरूप आत्मसखे, ते गोपाल; इंद्रियवृत्ती, त्या गोपिका; व शुद्धसत्त्वात्मक ज्ञानमायारूप जी तुर्या किंवा निवृत्ति ती यशोदा; अशी त्यांत योजना केलेली आहे. त्यांतील कांहीं पदें खालीं देतों.

" गोकुलांत तूं अशा नानाप्रकारच्या खोड्या करून गोपिकांस व्यर्थ कां त्रास देतोस ? " असें यशोदेनें विचारिल्यावरून भगवान् श्रीकृष्ण तिला सांगतातः—

पद ( मलय गव्हरीं अद्भुत शोभा पाहुनियां शबरी० या चालीवर )

निर्विकल्प सच्चिदानंद मी नेणति या मातें ॥
केवळ जड तनु शाश्वत मानुनि कल्पिति कामातें ॥ ध्रु० ॥
मन्मूर्तीवरि बळकट प्रेमें लंपट मन करिती ।
विषयदृष्टिनें दिनानिशिं हा आकार हृदयिं धरिती ।
दृश्यचराचर चिन्मय एसी वृत्ति न तिळभरि ती ।
आत्मसुखास्तव आळविती बहु मज निष्कामातें ॥ नि० ॥ १ ॥
यद्यपि चिद्धन तो मी या अबलांसि नसें ठावा ।
केवळ सगुणी पूर्ण जयांही धरिलें सद्भावा ।
जाणुनि मी अवतारि होय सद्भक्तांच्या गांवा ।
मायाब्रह्मीं सहज घडे हा स्फुरणधर्म मातें ॥ नि० ॥ २ ॥
अवस्थात्रयातीत हरिन नवनीत कसा याचें ।
जसा तसा असताचि स्फूर्तिरुप जग नटलों साचें ।
तंतूपट मृद्धट दृष्टानें, कारण कार्याचें ।
कर्ता कृष्णजगन्नाथ नसुनि घेती नामातें ॥ ३ ॥

या एकाच पदावरून वाचकांस भटजीमहाराजांची कवित्वशक्ति, चातुर्य, अनुप्रास व अर्थगौरव या सर्व गुणांची सहज कल्पना होण्यासारखी आहे.

राधिका श्रीकृष्णास म्हणतेः—

पद ( दादरा. )

असुनी सुजाण कां न जाणत्या सम गोपी छळिशी ।
प्राणजीवना रे कृष्णा ! प्राणजीवना ॥ ध्रु० ॥

इंद्रियवृत्ति मज नावरती या, लक्षुनी प्रमाण, मी ।
रममाण व्हाया अंतरसाक्षी आणितें मना रे कृष्णा ॥ १ ॥
अनुसंधाना चुकविति कान्हा । या ।
चिद्रत्नाचि खाण आपण आण वाहुनि, मन्मन कथितें ॥
आनंदघना रे कृष्णा ! आनंदघना ॥ अ० ॥ २ ॥
चंचलचित्ता, कृष्णजगन्नाथा ! या । नव्हासि लहान
तूं महान सुमति पहाना कैसें ॥ मनमोहना रे कृष्णा ॥ मन० ॥ ३ ॥

गोपी यशोदेस कृष्णाची कागाळी सांगतात—

पद.

चटकी चपल मोठा नाटकी साच ।
घटचि नुरवि हट धरुनि मुरारि ॥ च० ॥ ध्रु० ॥
गोपकटकीं एकी एकट अनेकीं ।
व्यापक निकट करिं न मिळे कीं भारी ॥ च० ॥ १ ॥
सकल त्यजुनि तरि, धरिन मी श्रीहरि
करि नाना परि न वदवति कंसारि ॥ च० ॥ २ ॥
मुज निर्धारें आत्मविचारें ॥
कृष्ण जगन्नाथ ऐसा असतो संसारीं ॥ च० ॥ ३ ॥

वरील पदांत "ट" चा अनुप्रास आहे. भटजीमहाराजांस यमकें व अनुप्रास यांची मोठी हौस होती. त्यांच्या पदांत सर्वत्र अनुप्रास व यमकें यांची गर्दी आढळून येते. तरीही त्यांनीं अर्थगौरवाकडे पूर्ण लक्ष पुरविलेलें आहे हें वर दिलेल्या त्यांच्या थोड्या कवितेवरून वाचकांस सहज समजेल. भटजीमहाराजांस मयूरकवीप्रमाणें चित्रकाव्याचा फार नाद होता. खालील त्यांचें पतितपावन रामाष्टक पहा:—

### " पतितपावनराम " श्लोकाष्टक.

( उपजाति )

परात्पर श्रीपति रामभूप । पदीं रमे त्या सुख दे अमूप ।
परावर व्यापक चित्स्वरूप । परेश भक्तास्तव जो सरूप ॥ १ ॥
तीरें वधी शोधुनियां अराती । तात्रे गुणें सज्जन पक्षपाती ।
तीनीं गुणीं लिप्तनयत्प्रभाती । तीर्थस्पदं सद्गुण साधु गाती ॥ २ ॥
तद्रूप, ये नाम जरी मुखांत । तल्लीन होती जिव यत्सुखांत ।
तरावया यत्न असा भवांत । तथापि जाती जन रौरवांत ॥ ३ ॥
पावे स्मरूं त्या जरि मायबापा । पाहे प्रयत्नें हरुनि त्रितापा ।
पाळी कुशें ओढुनि आत्मचापा । पापा न ठेवी भजु त्या रमापा ॥ ४ ॥
वरिष्ठ जो एकचि रामदेव । वसेल मी त्या हृदयीं सदैव ।
वदेन तन्नाम अवश्यमेव । वसेन देऊनि तयासि खेव ॥ ५ ॥
न रत्न रामासदया समान । नरां सुरां माजि जगन्निधान ।
नभापरी रूप न होय मान । नमूनि ज्या देति समस्त मान ॥ ६ ॥
रात्रिंचरां देउनि तीव्र मारा । राजेश्वरें आणियला स्वदारा ।
राज्यासनीं बैसुनि कारभारा । राष्ट्रीय जो चाळवि भक्तधारा ॥ ७ ॥
मनीं मुखा ज्या प्रिय आत्मनाम । मवाळ त्याच्य वरी पूर्णकाम ।
मरामती वाढवि सौख्यधाम । मदोद्धतांचा करुनी विराम ॥ ८ ॥

( अनुष्टुप् )

पतितपावना रामा ! श्लोकाष्टक तुझें तुवां ।
विष्णू कृष्ण जगन्नाथा ! रचिलें स्फूर्तिने तुझ्या ॥

भटजीमहाराजांनीं केलेलीं एकंदर स्फुट पदें सुमारें आठशेंवर होतील. त्याशिवाय " स्वात्मतत्त्वामृत " हा लहानसा वेदांतग्रंथ व मानसपूजा या नांवाचें एक लहानसें प्रकरण आहे. त्यांनीं शुकरंभासंवाद, लोपामुद्रासंवाद, नटसुभद्राविलास व अहिल्योद्धार अशीं चार संगीत नाटकें तयार केलीं होतीं. परंतु फार खेदाची

गोष्ट ही कीं, त्यांतील एकच अहिल्योद्धार तूर्त उपलब्ध असून बाकीचीं सर्व नामशेष झालीं! त्यांनीं आनंदरामायणांतील कांहीं सुरस आख्यानें निवडून काढून तीं कीर्तनाकरितां म्हणून छंदोबद्ध करून ठेविलीं आहेत तीं येणेंप्रमाणें---

१ व्यासवरदान
२ शतस्त्रीणांवरदानम्
३ तुलसीपत्रसंधान
४ हास्यमुक्ति
५ यागकांड
६ यात्राकांड
७ चंपिकासुमतीस्वयंवर
८ यूपकेतूस्वयंवर
९ पिंगलाख्यान
१० दुर्वासभोजन
११ नागरिकोपदेश
१२ सुगुणाख्यान
१३ गुणवत्याख्यान

याशिवाय त्यांचे कांहीं अभंग व कोंकणीं भाषेंतील कांहीं स्फुट श्लोक वगैरे आहेत ; असो.

भाषाशास्त्राचें फारसें ज्ञान नसतां, उत्तम कवींच्या पंक्तीस बसण्याजोगी कविता भटजीमहाराजांनीं केली, यावरून त्यांची योग्यता सामान्य नव्हती, हें सहज लक्षांत येतें.

ईश्वरी कृपेवांचून असें घडणें फार कठीण आहे. कवितेंतील त्यांचे जिवंत उद्गार वाचून कोणाही विषयग्रस्ताचें हृदय परमार्थाकडे वळल्यावांचून रहावयाचें नाहीं. ते जरी आज प्रत्यक्षत्वानें हयात नाहींत, तरीही त्यांच्या या परिणामकारक वाणीमुळें त्यांचें बहुतेक सान्निध्य घडल्यासारखेंच होतें; असो. शेवटीं त्यांच्या चारित्र्यासंबंधानें त्यांनींच केलेलें एक पद आहे तें देऊन, त्यांच्या गोड व प्रासादिक वाणीनेंच या फार लांबलेल्या चरित्रलेखाचा उपसंहार करितों.

## पद.

यत्कुळदेव " लक्ष्मीनृसिंह " सुखदायी
पिता " जगन्नाथ " माता " नरसाई "
पितृव्य " मुकुंद " चुलती लक्ष्मीबाई
कृष्णद्विज मीं जन्मा आलों अचला ठायीं ॥ य० ॥ ध्रु० ॥
शिणलों प्रपंचिं फिरतां नकळुनि आयुष्यकाळा ।
भिक्षुकिवृत्ति करितां आला मनिं कंटाळा ;
मत्पत्नी जनित स्मरतां माझा पोरांबाळा ।
" मी " " माझें " मनि धरितां सांपडलों मोहजाळा ॥ १ ॥
त्रिविध तापाग्नीनें चित्त जई पोळलें ।
दारापुत्रीं गृहवित्तावरि कंटाळलें ।
संतमुखें जइं तारक ईश्वर मज कळलें ।
तइं पासुनि मन माझें तद्भजनिंच वळलें ॥ २ ॥
आळवितां रात्रंदिन किति वर्षें प्रभुला मी ।
सदयासि दया माझी येउनि अंतर्यामीं ।
साक्षात्सद्गुरु आपण प्रगटति विष्णुनामीं ।
दृश्य विलक्षण मज स्थिर केला आनंदधामीं ॥ ३ ॥
सद्गुरुनीं ज मजवरि केली करुणादृष्टी ।
सच्चित्सुख कनकनगासम समजाविलि सृष्टी ।
वदले बहु जन्मीं तूं होता बाळा कष्टी ।
आतां पूर्ण सुखी हो घेउनि आनंदवृष्टि ॥ ४ ॥
यच्छद्वें आनंद स्फुरला तो आपैसा ।
पिंडब्रह्मांडातें ग्रासी नेट ऐसा ।
अनुभव तो या वदनें बोलवेल कैसा ? ।
द्वैताद्वैतरहित; लहरीविण समुद्र जैसा ॥ ५ ॥
ऐशा सद्गुरुसी म्यां द्यावें तरी काई ? ।
तनु मन धन हें अर्पण झालें पूर्वीच पायीं ।
देण्याजोगी वस्तु ज्याविण दुसरी नाहीं ।
आतां कोण्यायोगें होईन मीं उतराई ? ॥ ६ ॥

विचार ऐसा जई मज अंतःकरणी आला ।
तैं सद्गुरुचा हृदयामाजी स्फुर झाला ।
" वर्णन करिं आनंदप्रद राघवचारिताला ।
सर्व सुखास्पद सेवा पावे तेचि आह्माला " ॥ ७ ॥
नाहं कर्ता, स्फूर्ती समर्थ गुरुरायाची ।
घडविलि सेवा वदवुनि सुकीर्ति राघवाची ।
श्रोता वक्ता अवघी सद्गुरुस्फूर्ती साची ।
कविताशक्ति न गुरुविण कृष्णजगन्नाथाची ॥ ८ ॥

जय जय रघुवीर समर्थ ।
श्रीबलभीम मारुतिराय समर्थ ।
श्रीमत्सच्चिदानंद कृष्णजगन्नाथ-
स्वामिसद्गुरुमहाराज की जय ।

भाग ३ रा समाप्त.